# कर्मवीर भाऊराव पाटील

( चरित्र व कार्य )



—: लेखक :—

एकनाथ केशवराव घोरपडे




किंमत सव्वादोन रुपये

# वाहिलेलीं चार फुलें.



कर्मवीर भाऊराव पाटील व कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे, हीं बहुजनसमाजांतील फार थोर माणसें. महात्मा फुल्यांच्या नंतर जनतेची प्रत्यक्ष सेवा करून ज्यांनीं आपल्या जन्माचें पारणें फेडलें. अशीं हीं थोर माणसें होतीं. हीं पांढरपेशा वर्गांत जन्माला आलीं असतीं, तर त्यांची राष्ट्रीय जयंती चालू झाली असती; वर्तमानपत्रांतून त्यांचा सारखा उदो उदो झाला असता; त्यांच्या कार्याला सरकारकडून भरपूर मदत मिळाली असती; व त्यांचा भरपूर गौरव झाला असता. स्वातंत्र्य मिळालं, पण तें आज वरच्याच वर्गाच्या हातांत पडल्यामुळें सर्वोदयसारख्या भोंगळ संस्थेवर लाखों रुपयांची उधळपट्टी लोकांच्या मनाविरुद्ध चालू आहे, पण भाऊरावांच्या संस्थेसारख्या खऱ्या राष्ट्रोद्धारक संस्थेकडे आपुलकीनें पाहिलें जात नाहीं. अशा बिकट स्थितींत आणि विरोधाची पर्वा न करतां भाऊरावांनीं चालविलेल्या कार्याबद्दल आजची पिढी व भावी पिढी कृतज्ञता-बुद्धीनें त्यांच्याकडे पाहिल्याखेरीज राहणार नाहीं.

अशा या थोर सेवकाची ओझरती ओळख करून देण्याचें पवित्र कार्य श्री. घोरपडे यांनीं या पुस्तकांत करून देऊन वस्तुतः बहुजनसमाजावर उपकार केले आहेत.

आपला समाज शिकलेला नसल्यामुळें त्याचा कसा अपमान होतो, त्याची कशी दुर्दशा होते, याची जाणीव स्वतःच्या जीवनावरून आल्यामुळें पदवीधर नसलेल्या व विद्वान नसलेल्या भाऊराव पाटलांनीं अनेक पदवीधर, अनेक विद्वान व पंडित निर्माण करून, एक सामान्य मनुष्य तळमळीच्या जोरावर केवढें कार्य करूं शकतो हें कृतीनें दाखवलें आहे. सर्व साधनें असलेल्या शिक्षणमंत्र्यानेंहि भाऊरावांच्या पासून धडे घ्यावेत, अशी लायकी भाऊरावांनीं संपादन केली आहे.

भाऊराव विद्वान नसले तरी तडफदार, तत्त्वनिष्ठ, सत्यासाठीं प्राण देणारे व संकटांना न डगमगणारे कसे आहेत, हें या पुस्तकांतील अनेक प्रसंगांवरून वाचकांना कळून येईल. यांतील डांबर—प्रकरण म्हणजे संस्थानी राजवटींतहि ब्रिटिशांचीं कुटील कारस्थानें कशीं चालत होतीं व त्यांना स्वार्थी लोक कसे बळी पडत होते याचें उदाहरण आहे.

भाऊरावांच्याबद्दल हे चार शब्द लिहीत असतांना माझी भूमिका अगदीं त्रयस्थाची अशी नाहीं. त्यांचे व माझे संबंध अगदीं जवळचे आहेत. जवळ जवळ रहात नसलों तरी आम्हीं हृदयानें जवळचे आहोंत, ध्येयानेंहि जवळचे आहोंत. कर्मवीरांच्या मनाचा मोकळेपणा, त्यांची धडाडी, त्यांचा दिलदारपणा आणि कोणाहि मोठ्या अधिकाऱ्यावर वाघाप्रमाणें तुटून पडणारी त्यांची कठोर वाणी, पोरक्या पोराला मातेच्या लडिवाळपणानें जवळ घेणारें त्यांचें वात्सल्य या विविध छटा मी डोळ्यांनीं पाहिल्या आहेत; कानांनीं ऐकल्या आहेत. एकाच वेळीं, एकाच व्यासपीठावर व एकाच कार्यासाठीं आम्हीं जवळ आलों आहोंत. ज्या अनेक गोष्टी मी माझ्या जवळच्या नातेवाईकांजवळ उघड्या करूं शकलों नाहीं, त्या मी भ्रातृभावानें भाऊरावांच्या समोर उघड्या करूं शकलों. भाऊरावांची देहयष्टी जशी सामान्य माणसाहून निराळी आहे, मोठी आहे तसेंच त्याचें हृदयहि मोठें आहे; आणि मुलासारखें कोवळेंहि आहे. म्हणून त्यांच्या संस्थेंतील सर्व मुलांना ते पित्याप्रमाणें वाटत असले तर नवल काय !

त्यांचे विद्यार्थी कोठेंहि असोत, कोणत्याहि मोठ्या जागेवर असोत, भाऊरावांचें नांव घेतलें' कीं त्यांची मान खालीं लवते व 'मी भाऊरावांचा आहें,' असें म्हणवून घेतांना ती ताठ होते.

शाहू छत्रपतींच्याबद्दल अभिमान वाटणारा असा मी एक त्यांचा भक्त आहे. भाऊरावहि 'मी छत्रपतींचा शिष्य आहे' असें मोठ्या अभिमानानें कबूल करतात व त्यांचेंच जातिभेद नष्ट करण्याचें काम त्यांनीं पुढें चालवलें आहे.

भाऊरावांचे विचारहि पुरोगामी आहेत. जातिभेद मोडण्याचा ते तर प्रत्यक्षच प्रयत्न करीत आहेत; पण राजकीय दृष्ट्याहि ते पुरोगामी आहेत. आर्थिक दृष्ट्या त्यांना समता हवी आहे; म्हणून त्यांचा ओढा शेतकरी कामगार पक्षाकडेच आहे. कारण हा प्रश्न श्रमजीवी बहुजनसमाजाच्याच आहे. पण शैक्षणिक कार्यालाच वाहून घेतल्यामुळें ते पक्षाचे सभासद नाहींत एवढेंच ! तथापि नवी समाजवादी पिढी निर्माण करण्याचें मोठें कार्य ते करीत आहेत.

स्वतःचें जीवन शुद्ध, सात्विक आणि त्यागी ठेवून त्यांनीं आपल्या प्रपंचाची मर्यादा महाराष्ट्रभर पसरवली आहे बहुजनसमाजाला भाऊराव हे आपल्या कुटुंबियाप्रमाणें वाटतात.

त्यांच्या जीवनांतले अनेक पैलू या पुस्तकांत वाचण्यास मिळत असल्यामुळें मी माझे चार शब्द आवरते घेतों.

कोल्हापूर,<br>२४-७-५१

**भाई माधवराव बागल**

# अनुक्रम

जिनें मला सत्य—संशोधनाचें व अन्यायाविरुद्ध
झगडण्याचें बाळकडू बाळपणापासून दिलें
ती माझी आई
तीर्थरूप

**हरीबाई भ्र. केशवराव घोरपडे**

व

ज्यांनीं दलितांच्या सेवेंत आपली उभी
हयात खर्च केली त्या
म. अण्णासाहेब शिंदे
यांच्या भगिनी
परमपूज्य

**जनाबाई शिंदे**

या उभयतां मातोश्रींच्या चरणीं समर्पण !

—एकनाथ

# जनताजनार्दनास—

जाणतां नेणतां घडले जे दोष
त्यांचा तुम्ही नाश करा वेगे
तुकाराम

१९३०–३१ सालची गोष्ट. देशांत कायदेभंगाची लाट उसळली होती. माझ्याहि जीवनांत 'शाळा किंवा घर' हें आंदोलन सुरू झालें होतें. तशांतच मी शाळेला रामराम ठोकून चळवळींत उडी घेतली. पण त्यामुळें आमच्या वर्धनगड गांवचें पाटीलिकीचें काम पहात असलेले माझे ज्येष्ट बंधू ती. निवृत्तिराव अप्पा यांना माझ्याबद्दल सरकारी रोषाला बळी पडावें लागलें. त्यांना ७५ रुपये दंड झाला व मला अज्ञान म्हणून 'समज' देण्यांत आली.

आतां माझी ब्याद वर्धनगडला राहणें हिताचें नाहीं हें पाहून अप्पांनीं मला कोल्हापुरास माझे दुसरे बंधू ती. ज्ञानेश्वर अण्णांनीं जे नुकतेंच एका राजद्रोहाच्या आरोपांतून मोकळे झाले होते, त्यांच्याकडे पाठविलें. मी सातारला आलों व कोल्हापूरपर्यंतचें भाडें देऊन मोटारींत बसलों. पण मोटारवाल्यानें कऱ्हाडमध्यें मला दुसऱ्या गाडींत बसवून पळ काढला. या नव्या मोटारवाल्यानें माझ्याकडे भाड्याची मागणी केली. मी सर्व भाडें चुकतें केलेलें आहे, असें त्यास परोपरीनें सांगितलें, पण तो आपला हेका सोडीना. उलट त्यानें मलाच खालीं उतरण्यास फर्माविलें. तेव्हां 'मी पुन्हां पैसेहि देणार नाहीं व खालींहि उतरणार नाहीं' असें ठासून सांगून थोडा सांवरूनच बसलों. इतक्यांत कंपार्टमटमध्यें बसलेल्या एका व्यक्तीनें माझा तो आविर्भाव पाहून अंमळ दटवणीच्या स्वरांत त्या मोटारवाल्याची समजूत घातली व माझी विशेष विचारपूस केली. मी पहिल्यांदांच घराबाहेर पडलों असल्यानें व वयानें पण लहान (सुमारें १५–१६) असल्यानें ती व्यक्ति कोण वगैरे कांहीं कळण्यास मला मार्ग नव्हता. पण ती व्यक्ति इस्लामपुरास उतरल्यावर तिच्या स्वागतासाठीं जमलेल्या जनसमुदायाच्या प्रचंड जयघोषावरून ती व्यक्ति म्हणजे कर्मवीर भाऊराव पाटील होत, हें कुणालाहि न विचारतां मी समजून चुकलों.

अण्णांची आणि माझी ही पहिली भेट, पण तेवढ्यावरूनच अण्णांची प्रतिमा माझ्या हृदयांत खोलवर कोरली गेली. कालांतरानें त्यांचा माझा घनिष्ट संबंध आला. कांहीं काळ मीं त्यांच्या संस्थेंत अध्ययन आणि अध्यापनहि केलें. त्या वेळेपासूनच आण्णांचें जीवनचरित्र जनतेसमोर ठेवावें, अशी मला रुखरुख लागून राहिली. परंतु ' लौकिकापुरती नव्हे माझी सेवा ' या तुकारामाच्या परंपरेंतील अण्णा असल्यामुळें मला कांहीं काळ कळ काढावी लागली.

तशांतच दुसऱ्या महायुद्धानें जगाचा नकाशा पार बदलून टाकला. आपल्या देशांतहि महत्त्वाचा बदल घडून आला. आम्ही स्वतंत्र झालों, पण तोंडपुज्यांची पोळी पिकून अण्णांसारख्या सच्च्या समाजसेवकाला घर-भेद्यांनीं मुद्दाम निर्माण केलेल्या परिस्थितीचे चटके बसूं लागले. कौतुक तर दूरच राहिलें, पण जाणत्या वर्गाकडून त्यांच्या कार्याची टवाळीच होऊं लागली. साहाय्याच्या ऐवजीं आपत्तीच अधिक भेडसावूं लागल्या. संस्थे-वर खोटे नाटे आळ घालण्यांत आले. या सगळ्या आपत्तींना तोंड देऊन संस्था आज आपला मार्ग चोखाळीत आहे अशा वेळीं ज्याच्यासाठीं अण्णांनीं आपली हयात झिजविली त्या बहुजनसमाजाचें एकहि वृत्तपत्र असूं नये कीं, ज्यांतून संस्थेची अगर बहुजनसमाजाचीं गाऱ्हाणीं वेशीवर टांगली जातील.

वर्तमानपत्र हें आजच्या सुधारणेचें अवश्यमेव साधन बनून राहिलें आहे; आणि नेमकी याच गोष्टीची उणिव बहुजनसमाजास असल्यानें कर्म-वीरांनीं किंवा त्या अगोदर होऊन गेलेले म. ज्योतिराव फुले किंवा महर्षि अण्णासाहेब शिंदे या महाभागांनीं बहुजनसमाजासाठीं ज्या खस्ता खाल्या, त्यांची जी बहुमोल सेवा केली त्याची कल्पना तमाम जनतेला कितीशी आहे, याची वानवाच आहे. बहुजनसमाजाच्या हिताचा मुखवटा धारण करून त्याच्याच हक्काची राजरोसपणें पायमल्ली करणारीं वर्तमानपत्रें महा-

राष्ट्रास अगदींच अपरिचित नाहींत. अर्थात्च दलितांसाठीं खपणाऱ्या या समाजसेवकांना हे लेखणीबहाद्दर अनुल्लेखानेंच मारणार, हें नवल नव्हे !

असा प्रकार अण्णांच्या बाबतींत तरी न घडावा या हेतूनेंच हें चरित्र लिहिण्याचें काम मी अंगावर घेतलें. खरा कार्यकर्ता हा नेहमींच प्रसिद्धि-पराङ्मुख असतो. आंगिरलेल्या ध्येयाशीं तद्रूप झाल्यामुळें प्रसिद्धि-अप्रसिद्धिची त्याला खंत वाटत नाहीं. आई आपल्या मुलाची जोपासना करते ती आपल्या वात्सल्याचा डंका जगभर पिटला जावा म्हणून ? छे ! केवळ कर्तव्य म्हणून. असें असलें तरी तिचे सुपुत्र तिच्या वात्सल्याची जाणीव शब्दानें तरी व्यक्त केल्यावांचून कसे राहतील ?

स्वतः पदवीधर नसतांहि आणि ज्या काळांत आजच्या इतकी शिक्षणाची महति वाढलेलेहि नव्हती, अशा वेळीं कर्मवीरांनीं शिक्षणाचें महत्त्व ओळखून आपली सारी हयात संस्थेच्या शैक्षणिक कार्यासाठीं झिजविली आहे. हेंच त्यांच्या चरित्रांतील वैशिष्ट्यपूर्ण सार होय. इतर समाजसुधारक विद्याविभूषित होते; पदवीधर होते. पण यांच्या वाट्याला यांपैकीं कांहीं नसतांहि त्यांनीं आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात अगदीं अल्प काळांत रयत शिक्षण संस्थेसारखी प्रचंड इमारत उभी केली, यांत त्यांचें मोठेपण सामावलेलें आहे. अण्णांचें चरित्र हें सर्वसाधारण माणसाला आकर्षक वाटणारें चरित्र आहे; म्हणूनच तें मी लिहिण्याचें ठरविलें.

या दृष्टीनें पहातां कर्मवीर भाऊराव पाटील हे आतां व्यक्ति नसून तें एक आंदोलन आहे ! समाजोद्धाराची ती हांक आहे ! महाराष्ट्र—वैभवाची ती सुप्रभात आहे ! जीर्ण समाजव्यवस्थेतील सामाजिक आणि आर्थिक विषमतेचे अनैसर्गिक बांध तोडून मोडून मानवतेच्या उद्धारासाठीं अखंडपणें वाहणारा तो प्रगतिप्रवाह आहे. !

**हजारो साल नरगीस अपने बेनुरी पे रोती है ।**
**बडी मुष्किल से होता है चमन में दिदावर पैदा ॥**

नरगीस पुष्प हजारों वर्षें आपल्या अंधत्वाचा आक्रोश करते. पण जीवनाच्या या फुलबागेंत महत्प्रयासानेंच महापुरुष जन्म घेतात. डॉ. इकबालच्या या उक्तीप्रमाणें कर्मवीर अण्णांच्या सारखा महापुरुष जन्माला येऊन त्यानें तीन तपांपेक्षां अधिक काळ सेवा करून बहुजनसमाजाचा जीवनबाग फुलविला. त्यांचा आस्वाद जनताजनार्दनास चाखतां यावा, म्हणूनच हा चरित्र–ग्रंथ लिहिण्यास मी उद्युक्त झालों. कर्मवीरांचें हिमालयप्राय चरित्र माझ्या या असमर्थ लेखणींतून कितपत सरस–निरस उतरलें आहे, तें सहृदय वाचक ठरवितील. या चरित्र–ग्रंथांत कर्मवीरांशीं संबंधित अशा स्थळांचा जो नामनिर्देश केला आहे, तीं स्थळें मी प्रत्यक्ष नजरेखालून घातलीं आहेत. आणि वास्तवावर आधारलेला असाच पुरावा गोळा करून तो मी येथें निर्भीडपणें मांडला आहे. त्यांत कोणा व्यक्तीचा अगर जमातीचा अवमान व्हावा हा हेतु नाहीं. तरीहि तशी शंका असल्यास शिरोभागीं लिहिलेल्या तुकोबाच्या अभंगवाणीकडे दृष्टीक्षेप टाकावा.

स्वतःच्या पाठीमागें अनेक कामांचा व्याप असतांहि केवळ कर्मवीरांच्या कार्याबद्दल आस्था म्हणून महाराष्ट्राचे आवडते आणि जाणते पुढारी कोल्हापूरचे भाई माधवराव बागल यांनीं जी हृद्य प्रस्तावना लिहून दिली त्याबद्दल त्यांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. तसेंच या चरित्र–ग्रंथास पुष्कळशी मूल्यवान सामुग्री मिळवून दिल्याबद्दल माझे स्नेही श्री. शं. कृ. उनउने, प्रा. छत्रपति शिवाजी कॉलेज, सातारा व श्री ना. रा. माने, प्रिन्सिपॉल, महात्मा फुले ट्रे. कॉलेज, सातारा, या उभयतांचा मी हार्दिक आभारी आहे. तसेंच जीवलग स्नेही कॉ. हरिश्चंद्रराव झेंडे व त्यांच्या मातोश्री तीं. कृष्णाबाई झेंडे, नगर, श्री. बाबासाहेब पाटील, चेअरमन जि. स्कूलबोर्ड, पुणें, श्री. द. स. दरेकर, क्राफ्ट ऑर्गनायझर, मध्यभाग, पुणें, श्री. ना. ध. पाटील, प्राध्यापक, ट्रे. कॉ. फॉर मेन पुणें, श्री. प्रतापराव व रवींद्रराव शिंदे बंधूद्वय पुणें, श्री. रा. ब. जाधव, संपादक ग्रामोद्धार, सातारा इत्यादि प्रेमळ मित्र, आप्त आणि वडील-

धारी मंडळी यांच्या कळकळीच्या प्रोत्सहनानेंच मी हा ग्रंथ लिहूं शकलों. या सर्वांचा मी ऋणी आहे. आणि ज्यांच्या सक्रीय पाठिंब्यानें हें चरित्र पुस्तकरूपानें जनतेसमोर येत आहे ते प्रसिद्ध साहित्यिक व प्रकाशक श्री. ग. ल. ठोकळ, श्री. तात्यासाहेब आंद्रे व नारायण छापखान्याचे मालक ग. म. नलावडे यांचे आभार मानणें तर प्राप्त कर्तव्यच आहे.

येवलेनिवास,<br>
५८४ शिवाजी नगर पुणें ४.<br>
विजयदशमी,<br>
शके १८७३; श्री शिवराज शके २७७<br>
ता. ९ आक्टोंबर १९५१.

ए. के. घोरपडे

## : १ : ओळख

बालमित्रांनो, आपल्या या महाराष्ट्र देशांत मराठी राज्याची स्थापना करणारे श्री. छत्रपति शिवाजी महाराज, लोकांना भक्ति-मार्गाची शिकवणूक देणारे ज्ञानदेव—तुकाराम आणि रंजल्या गांजलेल्या समाजाची मनापासून सेवा करणारे महात्मा जोतिबा फुले व महर्षि अण्णासाहेब शिंदे अशीं किती तरी थोरथोर माणसें होऊन गेलीं. आज मी तुम्हांला यांच्यासारख्याच एका थोर समाजसेवकाची ओळख करून देणार आहे. त्यांचें नांव कर्मवीर भाऊराव पाटील.

आपल्या या देशांत असंख्य खेडीं आहेत. या खेड्यांमधून फार मोठ्या संख्येनें शेतकरी आणि शेतावर मजुरी करणारे कामगार यांचाच भरणा आहे. हजारों वर्षांपासून हा बहुसंख्य समाज अज्ञानी आणि दरिद्री आहे. त्यामुळें तो सर्व बाजूंनीं नाडला गेलेला आहे. तरीहि तो रात्रंदिवस शेतावर राबून व गिरण्यांतून खपून धान्य व कापड उत्पन्न करतो. हा समाज असाच अडाणी आणि दरिद्री राहिला तर आपली उत्पादनशक्ति घटेल आणि देशाला फारच वाईट दशा प्राप्त होईल, याची जाणीव गेल्या शतकापासून बऱ्याच लोकांना झालेली आहे. पण त्या दृष्टीनें प्रयत्न करणारीं अगदीं थोडींच माणसें आप-णांस दिसून येतील. त्यांपैकींच भाऊराव पाटील हे एक होत.

भाऊरावांनीं स्थापन केलेल्या ‘ रयत-शिक्षण-संस्थेच्या ’ शाखा महाराष्ट्र व्यापून राहिलेल्या आहेत. आतां तर या वटवृक्षाच्या

पारंब्या भारताची सरहद्द ओलांडून परदेशापर्यंत पोहोचूं लागल्या आहेत; आणि या सर्व शिक्षणसंस्थांतून कोणते विद्यार्थी शिक्षण घेत असतील असें तुम्हांस वाटतें? ज्यांच्या अनंत पिढ्या कष्ट करण्यांतच खर्ची पडल्या, हजारों वर्षांपासून ज्यांना शिक्षणाचा गंधहि नाहीं; अज्ञान, हाल, अपेष्टा, दारिद्र्य आणि अपमान यांतून ज्यांना वर डोकें काढायची कधीं कुणी संधिहि लाभूं दिली नाहीं अशा महार, मांग, चांभारापासून ते मराठा, माळी, कुंभारापर्यंत सर्व जातींचे आणि हिंदु, जैन, मुसलमान, ख्रिस्ती इत्यादि निरनिराळ्या धर्मांचे विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. स्पृश्यास्पृश्य, उच्चनीच, ब्राह्मण-अब्राह्मण, हिंदु-मुसलमान, स्त्री-पुरुष कसलाहि भेदाभेद मनांत न आणतां साताऱ्याच्या पवित्र भूमींत अवतरलेली ही ज्ञानगंगा ' या रे या रे सानथोर । अवघ्या जातीचे नारीनर । अशी प्रेमळ हाक मारून आपल्या बाळांना न्हाऊं माखूं घालते आहे. आपणहि या ' भागीरथींत ' आंघोळ करून पवित्र होऊं या.

भाऊराव कधीं कधीं म्हणतात कीं, ' माझ्या जीवनांत साधुत्व व बंडखोरी यांचा संगम झाला आहे. ' सातारा बंडखोर म्हणून आजहि प्रसिद्ध आहेच. तसेंच त्याच्या ठिकाणीं संन्याशाचें वैराग्यहि भरून राहिलेलें आहे. म्हणून साताऱ्च्या इतिहासाची थोडीफार पानें आपण चाळलीं तर भाऊरावांच्या वरील उद्गाराची सत्यता आपणांस दिसून येईल.

फार लांब जायला नको. शिवछत्रपतींच्या बंडखोरीला याच भागातील मावळे-मराठ्यांनीं साथ दिली. छत्रपतींच्या निधनानंतर मराठेशाहीची झालेली वाताहत याच भागांतील शूर वीरांनीं शत्रूची ससेहोलपट करून थांबविली. पानिपतच्या युद्धानंतर परत मराठेशाहीला पडती कळा प्राप्त झाली. मराठी साम्राज्याचा कळस

ढासळला. एका बाजूनें निजाम तर दुसऱ्या बाजूनें हैदर आणि तिसऱ्या बाजूनें फिरंगी असे तिघे तिहींकडून मराठेशाहीचा नाश करण्यासाठीं टपलेले होते. पण याच भागांतील गनिमी फौजांनीं या राहू-केतूंचीं हाडें खिळखिळीं करून त्यांना दांतीं तृण धरायला लावलें.

इतकेंहि करून आपसांतील द्वेषभावामुळें आम्ही मराठी साम्राज्य गमावलें. मग इंग्रज आले. ज्यांनीं मराठी साम्राज्याचें उदक इंग्रजांच्या हातांवर सोडलें त्या रावबाजीचे सगेसोयरे इंग्रजांचा गोरा रंग पाहून दिपून गेले. इतकेंच नव्हे तर, ते त्यांच्या भजनीं लागले. पण फिरंग्यांच्या गोऱ्या रंगाखालीं दडलेल्या काळ्या करणीचें अचूक निदान करून बहुजनसमाजास सावध राहाण्याचा इषारा याच भागांतील समाजसुधारकांनीं दिलेला आहे. पुढें ब्रिटिशांची सत्ता या देशांतून हुसकून लावण्यासाठीं राष्ट्रीय सभेनें (कॉंग्रेसनें) जे जे लढे पुकारले त्या त्या लढ्याच्या आघाडीला राहून येथील लोकांनीं आपलें कर्तव्य बजाविलेलें आहे. सन १९४२ च्या क्रांतिकाळांतील या लोकांचा इतिहास तर अगदींच ताजा तसाच स्फूर्तिदायक आहे.

अशा प्रकारें शूर, लढवय्ये, राजकारणी, मुत्सद्दी व सर्वसंगपरित्याग करणारे संत-महात्मे याच टापूनें प्रामुख्यानें पुरविले आहेत, असें म्हटलें तर वावगें होणार नाहीं. अशा तेजस्वी पण सात्त्विक, स्वाभिमानी पण प्रेमळ व बंडखोर पण निष्ठावान भूमींत भाऊरावांचे पूर्वज वाढले. मग ते तरी या गुणांना अपवाद कसे ठरतील? 'खाण तशी माती'. भाऊरावांचें मातुलगृह बंडखोर तर पितृगृह साधुवृत्तीचें. अशा शुचिता व ऋजुता यांच्या प्रीतिसंगमांतून जन्मास आलेले भाऊराव पुढें कर्मवीर झाले नसते तरच नवल!

## : २ : साधूंच्या संगतींत

आज भारतांत ज्या अल्पसंख्य जमाती आहेत, त्यांपैकींच संघटित व संपन्न असा जैन समाज होय. दिगांबर, श्वेतांबर आणि ढुंडिया असे तीन प्रमुख पंथ या जैन समजांत आहेत. दिगांबर आणि श्वेतांबर हे मूर्तिपूजक असून ढुंडिया पंथांतील लोक मूर्तिपूजा मानीत नाहींत. दिगांबरांमध्यें पंचम व चतुर्थ हे दोन प्रमुख पोटभेद आहेत. यांपैकीं चतुर्थ जैनसमाज शेंकडा ९९ टक्के शेतकरी आहे. यांची वस्ती दक्षिणी संस्थानें व कर्नाटक यांमध्यें विशेष आहे.

भाऊराव साताराच्या दक्षिण भागांतील ऐतवडे गांवच्या पाटील घराण्यांतील. हें घराणें मूळचें विजापूर जिल्ह्यांतील मुळबिद्री गांवचें. तेथून त्यांना महाराष्ट्रांत पळून यावें लागलें. तो इतिहास मोठा मनोरंजक आहे. सतराव्या शतकाच्या प्रारंभीं अहमद अदिलशहा विजापूरच्या गादीवर बसून राज्यकारभार करीत होता. आज ऐतिहासिक पहाण्यासारखें ठिकाण म्हणून ज्याचा उल्लेख केला जातो तो विजापूरचा गोलघुमट याच सुलतानाच्या कारकीर्दींत बांधला गेला. मोठमोठ्या इमारती किंवा पूल बांधीत असतां त्याच्या पायामध्यें माणूस बळी दिला तर त्या कामाला खंबीरपणा येतो, अशी त्या काळच्या लोकांची समजूत होती. आजहि कांहीं ठिकाणीं ही भ्रामक समजूत थोड्याफार प्रमाणांत आहे. घुमटाच्या पायाभरणींत बळी देण्यासाठीं मूळबिद्री गांवच्या देसाई घराण्याकडे एका माण-

साची मागणी करण्यांत आली. अर्थात् अशा प्रकारें प्राण द्यायला कोण तयार होणार? म्हणून सबंध देसाई घराण्यानेंच जिवाच्या भीतीनें तेथून पळ काढला व कोल्हापूरनजीक पन्हाळगडावर ते येऊन राहिले. पुढें त्या ठिकाणीं वजनें व मापें ठेवून त्यांच्या उत्पन्नावर उपजीविका करण्याची 'महाजनकी' त्यांनीं संपादन केली. अशा प्रकारें देसायांचें महाजन घराण्यांत रूपांतर झालें.

पुढें या घराण्यांतील दोन भाऊ स्वतःच्या कर्तबगारीची पारख करण्यासाठीं सातारा जिल्ह्यांतील ऐतवडे गांवीं येऊन राहिले. तेथें त्यांनीं 'पाटीलकी' वतन मिळविलें. त्यानंतर एक भाऊ बेळगांवास गेला. तेथें पाटिलकी मिळविण्यासाठीं तो मराठा झाला. या परागंदा झालेल्या भावाला उन्हातान्हाचा व काट्याकुट्यांचा त्रास होऊं नये म्हणून ऐतवडे येथील भावांनीं त्याला पायांत घालण्यासाठीं जोडा व पांघरावयास एक घोंगडी दिली. अद्यापहि ही 'जोडा व घोंगडी' पाठविण्याची प्रथा ऐतवड्याच्या पाटील घराण्यांत आहे. मराठा आणि जैन या दोन जमातींचा किती जुना ऋणानुबंध आहे हा! भाऊराव पाटलांना कांहीं लोक मराठा समजतात तें कांहीं अगदींच वावगें नाहीं!

ऐतवडे गांवीं काळी कसदार जमीन, भरपूर पाऊस आणि कष्टाळू शेतकरी असल्यामुळें येथील लोक खाऊन पिऊन चांगले सुखी असत. आजहि या ऐतवड्याला 'केळाचें ऐतवडे' म्हणून लोक ओळखतात. केळींची आठवण झाली म्हणून सांगतों. भाऊराव सहज विनोदानें सांगतात कीं, "आमच्या वाटणीला वाडवडिलार्जित जमीन थोडी आली व तीहि बरीचशी पडीक. तेव्हां उगीच हातपाय चोळीत

न बसतां शेजारच्या तळ्यांतील गाळाची माती आम्हा आमच्या डोक्यावरून वाहून आणून त्या पडीक जमिनीवर पसरून दिली. त्याचा परिणाम असा झाला कीं, आमच्या बांधभावाच्या हिश्या-पेक्षां किती तरी पटीनें अधिक उत्पन्न त्या जमिनींतून आम्हांस मिळूं लागलें."

अशा सुपीक आणि संपन्न भागांत पन्हाळ्यावरून आलेल्या देसाई घराण्याची प्रतिष्ठा जैन लोकांत हळूहळू वाढूं लागली. ती इतकी कीं, कोल्हापूरच्या धर्मपीठाच्या मुख्य स्थानीं या घराण्यांतील लोक विराजमान होऊं लागले. हिंदु धर्मांतील श्रीशंकराचार्यांच्या पीठाप्रमाणें 'जिनसेन भट्टारक पट्टाचार्य' हें धर्मपीठाचें प्रमुख आधिपत्य आपल्या चरित्रनायकांच्या पणजोबांचे वडील श्री. नेमगौंड पाटील यांनीं विभूषित केलें होतें. सांसारिक जीवनानंतर सर्वसंग-परित्याग करून ते अक्षरशः दिगंबर झाले. इ. स. १८२० सालीं कृष्णानदीच्या काठीं भिलवडी येथें ते समाधिस्त झाले. त्या वेळे-पासून या भागांतील लोक दरसाल चैत्र शु० ५ ला त्यांचा उत्सव साजरा करतात.

त्यानंतर त्यांचे चिरंजीव शांतगौंड पाटील यांनीं जिनसेना चार्यपद विभूषित केलें. हे नांवाप्रमाणेंच शांत व मनामिळाऊ होते. त्यांनीं आपल्या कारकीर्दींत बऱ्याच जमिनी मठाला मिळवून दिल्या. शिवाय कांहीं ठिकाणच्या जप्त झालेल्या मिळकती त्यांनीं सोड-विल्या. शुद्ध चारित्र्य आणि प्रखर ध्येयनिष्ठा यांच्या जोरावर त्यांनीं पुष्कळ वर्षें जनसेवा केली. जैन व मराठा हे दोन्हीहि समाज त्यांना सारखाच आदर दाखवीत. कोल्हापूर व म्हैसूर दरबारीं त्यांना

मानाचें स्थान होतें. इ. स. १८९४ च्या सुमारास सांगली संस्थानांतील नांदणी गांवीं त्यांनीं निर्वाणपद प्राप्त करून घेतलें. दक्षिणी जैन समाजांत या दोन साधु पुरुषांना फार मोठें मानाचें स्थान आहे. याच थोर पुरुषांची परंपरा भाऊरावांनीं पुढें चालविली. फरक इतकाच कीं, हे दोघे संसार सोडून संन्याशी झाले तर भाऊराव संसारांत राहून संन्याशाप्रमाणें त्यागी ठरले. यानंतरच्या वंशजांनीं आपलें लक्ष शेतमाउलीची सेवा करण्यांत गुंतविलें.

शांतगौंडा नंतरच्या पाटील घराण्यांतील पुरुषांनीं जरी आपलें लक्ष शेतीकडे पुरविलें तरी जैन मठांशीं त्यांचा थोडाफार संबंध असेच. कारण धार्मिक क्षेत्रांत त्यांच्या घराण्याला लोक फार मान देत. अशाच एका प्रसंगीं कोल्हापूरच्या जिनसेन स्वामींच्या मठांत कोणा एका नवीन साधूचा धार्मिक दीक्षाविधि करावयाचा होता. त्या प्रसगीं भाऊरावांचे आजोबा देवगौंडा यांच्या हस्तें ते कागदपत्र तयार करावेत, अशी जमलेल्या मंडळींनीं इच्छा व्यक्त केली. पण ते पडले अक्षरशत्रू. त्यांना आपल्या निरक्षरतेची त्या वेळीं चांगलीच जाणीव झाली. कांहीं तरी निमित्त काढून ते तेथून निसटले व थेट घरीं आले. त्यांनीं ठरविलें कीं, आपल्याला जरी शिक्षण घेतां आलें नाहीं तरी आपल्या मुलाबाळांना शिकवावयाचेंच. या भावनेनें शाळेंतून काढून घरीं शेतीवाडी करावयास लावलेल्या आपल्या चिरंजिवांना—पायगौंडांना त्यांनीं १४ व्या वर्षीं पुन्हां शाळेंत घातलें.

पायगौंडा हेहि जात्या हुशार व मेहनती असल्यामुळें लौकरच ते मराठी सातवी पास झाले. जैन समाजांत मराठी सातवी पास

झालेले हेच पहिले विद्यार्थी. येवढें शिक्षणहि त्या काळीं फार जास्त समजत असत. आतां आपला मुलगा पुष्कळ शिकला. आतां त्याचें लग्न करावयास पाहिजे, असें त्यांच्या वडिलांना वाटूं लागलें. पाटलांचें घराणें प्रसिद्ध. घरची परिस्थिति चांगली. शिवाय मुलगा शिकलेला. त्यामुळें अनेक मुली त्यांना सांगून येऊं लागल्या. शेवटीं कुंभोजकर जिनगौंडा पाटील यांची सुशील व सुंदर कन्या गंगाबाई यांच्याशीं पायगौंडांचें लग्न झालें. शरीरानें कणखर, हाडापेरानें मजबूत, वर्णानें गौर व कर्तबगार सून आपल्याला मिळाली म्हणून सासूसासरे गंगाबाईवर अगदीं खूष असत. त्यांनींहि आपल्या नम्र स्वभावानें व उद्योगीपणानें सर्व घराचें लक्ष आपल्याकडे वेधून घेतलें.

त्या काळीं सरकारी नोकरीला फार मान असे. त्यास अनुसरून पायगौंडांना त्यांच्या वडिलांनीं सब-रजिस्ट्रार कचेरींत कारकुनाच्या नोकरीवर लावलें. सरकारी नोकरी म्हणजे राजदरबारी चाकरी असें त्या वेळचे लोक मानीत. त्यांतच पायगौंडांचा मनमिळाऊ पण मानी स्वभाव, काळींसावळीच पण धष्टपुष्ट आणि रुबाबदार शरीरयष्टी व टापटिपीची आणि सचोटीची वागणूक यांची भर पडली. त्यामुळें घरीं आणि दारीं त्यांचा चांगलाच दरारा बसला. अशा या गुणी आणि प्रेमळ पतिपत्नींचें कौटुंबिक जीवन अत्यंत सुखाचें गेलें. दोघांचाहि स्वभाव काटकरीचा व टापटिपीचा असल्यामुळें त्यांना संसारांत कधींहि कोणत्या गोष्टीची वाण पडली नाहीं.

२३ जून १८८६ चा तो पवित्र दिवस. सूर्यनारायण आपली समुद्रावरची सहल पुरी करून वसुंधरादेवीच्या अंकावर—विषुववृत्तावर—बसून अमळ विश्रांति घेत होते. प्रकाशदूत सूर्यदेवांचा संदेश सर्व

जगावर सारख्याच प्रमाणांत पोंचवीत होते. दीर्घ काळची अंधारी रात्र संपून समतेचें दिनमान आपलें अधिराज्य जगावर प्रस्थापित करीत होते. अशा पवित्र समयीं, सातारा प्रांतीं, वारणा नदीच्या अंकावर हरघडी बागडणाऱ्या कुंभोज गांवीं, जिनगौंड पाटील यांची कन्या गंगाबाई यांच्या पोटीं एक बालक जन्माला आलें. आईची शरीरयष्टी आणि वडिलांच्या वर्णाचें ऋण घेऊन हा सूर्य पृथ्वीतला-वर अवतरला. पाटलांच्या घरीं मुलगा जन्माला आला म्हणून जिकडे तिकडे आनंदी आनंद पसरला. योग्य वेळीं त्या बाळाचें ' भाऊ ' हें नांव ठेवण्यांत आलें. नांव ठेवावयास जमलेल्या बाया-बापड्यांना कल्पनाहि नसेल कीं, आपण ज्या बालकाचें नांव ' भाऊ ' ठेवलें तोच पुढें महाराष्ट्रांतील पददलित जनतेचा खराखुरा ' भाऊ ' होणार आहे !

हळूहळू हा बालक मोठा होऊं लागला. त्याच्या खोड्यांना ऊत येऊं लागला. त्याच्या अवखळपणाला घराच्या चार भिंती अपुऱ्या पडूं लागल्या. त्यानें आपली मजल गांव, गांवाच्या बाहेरची आंबराई व गांवाजवळून वाहणारी नदी येथपर्यंत मारली. कुंभोज हें गांवहि बऱ्याच मोठ्या वस्तीचें असल्यामुळें त्याचा मित्रपरिवारहि वाढला. गांवाच्या एका बाजूनें गाणें गात जाणारी वारणा माता तर पूर्वपश्चिमेच्या बाजूनें सतत उभे राहून गांवाचें संरक्षण करणारे आम्रवृक्ष आणि आपल्या या मित्रांना विशेष प्रसंगीं सूचना देण्यासाठीं गांवाच्या उत्तरेस खडा पहारा करीत असलेला बाहुबलीचा डोंगर अशी या गावाची निसर्गनिर्मित रचना आहे. भाऊरावांचा बालपणीचा काळ याच कुंभोज गांवीं मोठ्या मजेंत गेला. सकाळीं लौकरच उठावें, आपले

सवंगडी जमवावे, निरनिराळ्या तऱ्हेचे खेळ खेळावे, वारणा नदी-मध्यें मनमुराद डुंबावें, शेजारच्या वनराजींतून फळाफुलांचा आस्वाद घेत फेरफटका मारावा आणि बाहुबलीच्या शांत व स्फूर्तिदायक वातावरणांतून स्वच्छंदपणें बागडावें, असा त्यांचा दिनक्रम असे. धिप्पाड शरीरयष्टी आणि भरदार आवाज ही ईश्वरी देणगी भाऊरावांना मिळालेली असल्यामुळें सर्व मुलांचें पुढारीपण त्यांच्याकडेच असे. ' मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात ' या उक्तीप्रमाणें भावी आयुष्याच्या पुढारीपणाचे धडे भाऊरावांनीं याच ठिकाणीं गिरविले. बाहुबलीच्या सहवासामुळें त्यांचे बाहू बलवान झाले तर वारणा नदींतील जलविहारानें त्यांची छाती भरदार झाली. आसंमतांत बागडल्यामुळें त्यांचे पाय खंबीर झाले. या तीन शक्तींच्या जोरावरच भाऊरावांना पुढें अफाट कार्य करता आलें, हें या ठिकाणीं आपण ध्यानांत ठेवावयास पाहिजे.

बाल भाऊच्या कोवळया मनावर आणखी एक महत्वाचा संस्कार कुंभोज येथें असतांना घडून आला. कोल्हापूर संस्थानांतील प्रसिद्ध बंडखोर ' सत्या ' हा कुंभोजचाच. भाऊरावांचे मामा पार्श्वगौंडा व बालगौंडा यांचा तो जिगर दोस्त. यांच्या घरासमोरच त्याचें घर होतें. मध्यें काय तो फक्त रस्ताच. हा जातीनें मराठा असून मनानें मोठा दिलदार होता. त्याचा बहुतेक वेळ भाऊरावांच्या मामा-कडेच जायचा. त्याला कुस्तीचा नाद फार. त्या भागांतील तो एक नामांकित पहिलवान अशी त्याची प्रसिद्धी होती. भाऊरावांना तालमीचा नाद त्यानेंच लाविला. लहानपणापासून त्याला अन्या-याची फार चीड असे. कुंभोज गांवांत चौगुले आणि पाटील

अशा दोन फळ्या असायच्या. सत्याप्पा हा पाटलांचा मित्र असल्या-मुळें तो पाटील पक्षांतच असायचा. या दोन फळ्यांमध्यें वारंवार भांडणें होत. कधीं कधीं भांडणाचें रूपांतर मारामारींत व्हावयाचें. एकदां तर या भांडणानें फारच उग्र स्वरूप धारण केलें. चौगुले मंडळींनीं पाटलाकडील एका माणसाचा खून केला. 'जशास तसें' या न्यायानें सत्याप्पानें पुढाकार घेऊन चौगुल्याकडील दोनतीन माणसांचे खून केले. आणि त्यानंतर उघडपणें गांवांत वावरणें म्हणजे आपण होऊन पोलिसांच्या स्वाधीन होणें, असें समजून त्यापुढें तो फरारीच राहूं लागला. पुढें त्याला बरेच साथी-दार मिळाले. त्यांच्या जोरावर त्यानें एक बंडच उभारलें. पुढें भाऊरावांचे मामाहि या बंडांत सामील झाले. अन्याय करून गोरगरिबांना छळणाऱ्या गांवगुंडांना हा नेकजात मराठा कर्दन-काळ वाटायचा. सबंध कोल्हापूर संस्थानांत त्याच्या बंडानें अगदीं धुमाकूळ घातला. संस्थानी पोलीस पकडावयास आल्यावर तो शेजारच्या साताऱ्याच्या हद्दींत पळावयाचा आणि खालसा मुलखां-तील पोलिसांनीं पाठलाग केला कीं त्यांच्या हातावर तुरी देऊन संस्थानी मुलखांत दडी मारून बसायचा. कैक पोलिसांनीं व फौज-दारांनीं सत्याप्पाला पकडण्यासाठीं जंग जंग पछाडले, पण त्यांच्या पदरांत निराशेशिवाय कांहींहि पडलें नाहीं. त्याचें कारण लोकांचें त्याच्यावर फार प्रेम होतें. सरकार आणि समाजकंटक हे जरी त्याला शत्रू म्हणून ओळखीत तरी गोरगरीब जनतेचा तो मित्र होता. त्यानें चुकूनहि कधीं बायाबापड्यांना किंवा गोरग-रिबांना त्रास दिला नाहीं. म्हणून आजहि कोल्हापूरच्या उत्तर-

भागांतून आपण फिरलों तर सत्याप्याच्या शौर्याचे पोवाडे आपणांस ऐकावयास मिळतील. अशा 'बंडखोराच्या' सान्निध्यांत भाऊरावांचें बालपण गेलें. बंडखोराचे साथीदार जे भाऊरावांचे मामा त्यांच्याच घरीं ते जन्मले. मामा जैन तर सत्याप्पा मराठा. पण या दोघांनींहि जातीचें किंवा धर्माचें बंधन पाळलें नाहीं. सख्या भावासारखें जेवणखाण, उठणें, बसणें इत्यादि गोष्टी त्यांच्या एकत्र चालत. या सर्व गोष्टींचे संस्कार भाऊरावांच्या बालमनावर अगदीं खोलवर रुजले. 'सत्याच्या' बंडखोरीनें भाऊरावांच्या जीवनांत अढळपद मिळविलें. अशा प्रकारें बालपणीं सत्याप्पाच्या अंगाखांद्यावर खेळलेले भाऊराव पुढें बंडखोर झाले नसते तरच नवल !

बाल भाऊला वडिलांच्या घराण्याकडून तापसाचें औदार्य, त्याग आणि समता यांचा अमूल्य ठेवा प्राप्त झाला, तर आईच्या घराण्यांतून अन्यायाचा प्रतिकार, दुष्टांचा नाश व दलितांचा कैवार या गोष्टींचे प्रत्यक्ष पाठ गिरवावयास मिळाले. "माझ्या जीवनांत साधुत्व व बंडखोरी यांचें मीलन झालेलें आहे" असें भाऊराव म्हणतात त्याचें मूळ इथपर्यंत खोल गेलेलें आहे.

यापुढें भाऊरावांना या ठिकाणीं फार काळ राहतां आलें नाहीं. पण मामांच्या घरून जातांना धिप्पाड व पिळदार शरीर आणि खंबीर मन यांचा लाभ मात्र त्यांना भरपूर झाला. त्याचप्रमाणें मामांच्या घरीं निरनिराळ्या जातिधर्मांच्या लोकांचें येणें-जाणें असे. त्यामुळें त्यांच्या मनांतून इतक्या लहान वयांत जातिभेदाची किंवा उच्चनीचतेची हकालपट्टी झाली. या सर्व गोष्टींच्या बळावर त्यांनीं पुढें कोणकोणतीं कार्यें केलीं तें आपण पुढें पाहूं.

## : ३ : बालपण व शिक्षण

भाऊरावांचें थोडेंफार शिक्षण कुंभोजला झाल्यावर ते मग आपल्या वडिलांबरोबर राहूं लागले. त्यांची वारंवार बदली व्हायची. त्यामुळें ऐतवडें, इस्लामपूर, तासगांव, दहिवडी, विटे, कोरेगांव वगैरे ठिकाणीं सातारा जिल्ह्याच्या सर्व भागांतून त्यांना फिरावें लागलें. त्यामुळें मुलांच्या शिक्षणाची फार हेळसांड झाली; इतकी कीं, वयाच्या १६व्या वर्षी भाऊराव इंग्रजी दुसरींत होते. पण निरनिराळ्या ठिकाणीं फिरण्याचा त्यांना एक फायदा मात्र झाला. तो हा कीं, भाऊरावांना भरपूर मित्रसंग्रह करतां आला. या मित्रांचा उपयोग पुढें त्यांनीं उभारलेल्या प्रचंड कार्यांत फार चांगल्या प्रकारें झाला.

श्री. पायगौंडा पाटील हे मुलांच्या शिक्षणाच्या बाबतींत फार जागरूक होते. शिवाय नोकरीनिमित्त त्यांना निरनिराळ्या ठिकाणीं फिरावें लागल्यानें त्यांच्या विचारांत व आचारांत चांगलाच बदल घडून आला. त्यांनीं आपल्या मुलांना भरपूर शिक्षण द्यावयाचें ठरविलें. त्यांना एकूण सहा अपत्यें झालीं. चार मुलगे व दोन मुली. भाऊराव सर्वांत वडील चिरंजीव होत. आपल्या सर्व मुलांनीं इंग्रजी शिक्षण घेऊन एखादी उच्च पदवी मिळवावी, असें वडिलांना फार वाटे. पण त्यांच्या मुलांना हें वाघिणीचें दूध फारसें पचल्याचें दिसत नाहीं. कारण वडिलांची इच्छा त्यांच्या

एकाहि मुलानें किंवा मुलांच्याहि मुलांनीं पूर्ण केली नाहीं. पण त्यांच्या मुलींच्या मुलांमुलींनीं मात्र आजोबांचे मनोरथ पूर्ण केले. त्यांच्या मुलींची एक मलगी नुकतीच एम्. ए. झाली असून दुसरी बी. ए., बी. टी. आहे. शिवाय मुलांपैकीं एकजण बी. ए., एलएल. बी. झाला आहे.

तरीसुद्धां भाऊरावांची सर्व भावंडें इंग्रजी सातव्या इयत्तेपर्यंतचें शिक्षण घेऊन आपापल्या उद्योगाला लागलीं. एक मात्र श्री. तात्या-साहेब हे आज जयसिंगपुरला वकिली करतात. दुसरे श्री. बाळ-गौंडा हे अबकारी खात्यांत चीफ् इन्स्पेक्टर होते. ते नुकतेच सेवा-निवृत्त झाले आहेत. तिसरे श्री. बंडोबा हे पोलीसखात्यांत सब-इन्स्पेक्टर म्हणून काम करतात. याशिवाय श्री. शिवगौंडा हे भाऊरावांचे चुलतभाऊ. यांचे वडील लहानपणींच वारले, त्यामुळें त्यांचा सांभाळ श्री. पायगौंडा यांनींच केला. आपल्या सर्व मुलां-बरोबर यांनाहि त्यांनीं शिक्षण दिलें. पण शिक्षणांत त्यांनीं फारशी मजल मारली नाहीं. असें असलें तरी कोल्हापुरास धंद्यांत मात्र त्यांनीं चांगलाच जम बसविला आहे. मुलींपैकीं एकीचें नांव द्वारकाबाई व दुसरीचें नांव ताराबाई. यांनाहि त्यांनीं लिहिण्या-वाचण्यापुरतें शिक्षण दिलें. शाळेंत जाऊन शिक्षण घेणाऱ्या याच जैन समाजांतील पहिल्या मुली होत. मुलांच्या शिक्षणाच्या प्रगतींत भाऊरावांच्या मातोश्री गंगाबाई यांचा फार मोठा वाटा आहे. आपल्या मुलांमुलींनीं पुष्कळ शिकलें पाहिजे, असें आपल्या पतीप्रमाणें त्यांनाहि वाटे. सरकारी नोकरीमुळें मुलांकडे लक्ष द्यायला श्री. पायगौंडा यांना फारशी सवड मिळत

नसे. त्यामुळें घरकाम करून मुलांवर देखरेख ठेवणें हें सर्व गंगा-बाईनाच करावें लागे. त्यांचा स्वभाव फार करारी असे. शिक्षणाच्या बाबतींत टंगळमंगळ केल्याचें त्यांना मुळींच खपत नसे; आणि शाळेला बुटी मारून कुठें तरी हिंडण्यांत भाऊराव तर पटाईत. यामुळें त्यांना आईच्या हातचा प्रसाद वारंवार मिळे. पण हा पहिलाच आणि लाडका मुलगा असल्यामुळें त्या त्यांच्याकडे अंमळ दुर्लक्ष करीत. तरीसुद्धां भाऊरावांवर आईचा वचक दांडगा असे. ते लहानपणापासून इतके जरी द्वाड होते, तरी शाळेला जातांना आपल्या आईवडिलांना नमस्कार करावयास ते कधीं विसरत नसत. आजहि त्यांच्या पंचाण्णव वर्षांच्या वृद्ध मातोश्री हयात आहेत. आणि पूर्वीप्रमाणेंच आजहि भाऊराव सातारला घरीं असले कीं, दररोज सकाळीं उठून आईचें दर्शन घेतल्या-शिवाय दुसऱ्या कामाला प्रारंभ करीत नाहींत. आईच्या ठिकाणीं केवढी ही अढळ निष्ठा ! माझ्या आईच्या आशिर्वादानेंच मी हीं कामें करूं शकलों, असें आजहि भाऊराव मोठ्या विनम्रपणानें मान्य करतात.

भाऊरावांचा बाळपणींचा काळ मोठ्या मजेंत गेला. या वेळीं शाळेच्या चार भिंतीत कोंडून घेण्यापेक्षां मित्रांच्या संगतींत रानां-वनांत मोकळेपणानें फिरणेंच त्यांना फार आवडे. सकाळीं शाळा करावी, दुपारच्या वेळीं मित्रांच्या समवेत रानावनांत फिरावें, चिंचा, बोरें, आंबे, जांभळें इत्यादि रानमेवा भरपूर खावा, निरनिराळे खेळ खेळावेत, एखादी मोठी विहीर पाहून तिच्यांत मनमुराद डुंबावें आणि शेवटीं सांपडलीच तर दुपारची शाळा

करावी, असा त्यांचा वेळ आनंदांत जात असे. विशेषतः आंबे आणि बोरें भाऊरावांना फार आवडत. या कामांत मांग, रामोशी व मराठे यांचीं मुलें फार पटाईत. म्हणून हीं सर्व मंडळी भाऊरावांची जिगर दोस्त असायची. हे सर्वजण मिळून भरपूर आंबे पाडीत, ते रानांवनांतून फिरणाऱ्या गाढवांवर लादून गांवांत आणीत आणि शाळेंतील इतर सहकाऱ्यांशीं दोन आंब्यांस एक ताव याप्रमाणें व्यापार करीत. भावी काळांतील अस्पृश्यता नष्ट करण्याच्या कामांतील हा श्रीगणेशाच म्हणावयाचा !

विद्यास असतांना भाऊराव आपल्या एका महार मित्राबरोबर फिरत फिरत पाणी पिण्यासाठीं म्हणून एका विहिरीवर गेले. तेथें ते आपल्या महार मित्रांसह पाणी पिऊं लागले. तेव्हां तेथें असलेल्या लोकांनीं त्यांना पाणी पिण्यास विरोध केला; इतकेंच नव्हें तर त्यांचा अपमानहि केला. “वाटल्यास तूं एकटा पाणी पी. तुझ्याबरोबर या महाराच्या पोराला आम्ही पाणी पिऊं देणार नाहीं.” असे ते लोक म्हणाले. तेव्हां भाऊरावांना फार संताप वाटला. आपला मित्र महार म्हणून त्याला पाणी मिळूं नये याचें त्यांना फार वाईट वाटलें. ते म्हणाले, “या विहिरीवर आम्ही दोघेहि पाणी पिणार ! आणि पाणी पिऊं देत नसाल तर मीहि तुम्हास पाणी काढूं देत नाहीं.” लोकहि ऐकेनात. प्रकरण अगदीं हातघाईवर आलें. शेवटीं भाऊरावांनीं एका हिसक्यासरशीच विहिरीचा रहाट मोडून टाकला व दोर विहिरींत भिरकावून दिला. नंतर ते म्हणाले, “काढा लेकाच्यानों पाणी आतां कसें काढतां तें ! म्हणे आमचा धर्म बाटतोय्. असला धर्म लौकर बुडाला तर फार बरें होईल !”

कऱ्हाडास असतांनाहि असाच प्रसंग घडून आला. तेथें निर-निराळ्या जमातींचे हौद असत. भाऊराव आणि त्यांची आई ब्राह्मणाच्या हौदाचें पाणी आणीत. ब्राह्मणमंडळींनीं याला विरोध दर्शविला. तेव्हां भाऊरावांनीं ते सर्व हौदच दुसऱ्या जातीच्या मुलांना घेऊन 'विटाळून' टाकले. अशा प्रकारें लहानपणापासूनच भाऊरावांनीं या शिवाशिवीविरुद्ध बंड पुकारलें.

भाऊरावांचें प्राथमिक शिक्षण पूर्ण झाल्यावर इंग्रजी शिक्षणा-साठीं त्यांना कोल्हापुरास पाठविण्याचें ठरलें. पण भाऊरावांची शिक्षणापेक्षां दांडगाई करण्यांतच अधिक प्रगति असल्यामुळें त्यांच्या विट्याच्या शाळेंतील शिक्षकांनीं भाऊरावाच्या ऐवजीं तात्यालाच कोल्हापूरला पाठवावें, असें मत त्यांच्या वडिलांना सांगितलें. बिचारे मास्तर ! त्यांना काय ठाऊक कीं, जो मुलगा आपला अभ्यास नीट करीत नसला तरी पुढें हजारों विद्यार्थ्यांचा अभ्यास करून घेणार आहे ! शेवटीं तात्या आणि भाऊराव या दोघांनाहि कोल्हापुरास पाठविलें.

बहुजनसमाजाच्या शिक्षणाच्या बाबतींत महाराष्ट्रामध्यें कोल्हा-पूरचें स्थान पहिल्या प्रतीचें आहे. गेल्या पन्नाससाठ वर्षांत महा-राष्ट्राच्या राजकारणांत व समाजकारणांत जीं थोर थोर माणसें चमकलीं त्यांपैकीं ना. गो. कृ. गोखले, न्या. माधवराव रानडे, ना. भास्करराव जाधव, गु. गोविंदराव सासने, मुंबई राज्याचे विद्यमान पंतप्रधान ना. बाळासाहेब खेर, दे. भ. माधवराव बागल इत्यादि मंडळींचें शिक्षण कोल्हापुरास झालें. राजर्षि शाहू छत्र-पतींनीं कोल्हापुरांत शैक्षणिक दृष्ट्या आमूलाग्र क्रांति केली.

त्यांनीं अनेक धर्मांचीं व अनेक जातींचीं वसतिगृहें स्थापन करण्यास सक्रीय प्रोत्साहन दिलें. त्यासाठीं त्यांनीं आधुनिक पद्धतीच्या हवेशीर अशा इमारती बांधून घेतल्या. राजाराम कॉलेज, राजाराम हायस्कूल, ताराबाई गर्लस् स्कूल, टेक्निकल स्कूल, शेतकी शाळा, लॉ कॉलेज इत्यादि शिक्षणसंस्था त्यांनीं काढल्या. विद्यार्थि-वसतिगृहांसाठीं त्या त्या जातींनींहि थोडेंफार सहाय्य केलेलें आहे. अशा प्रकारें दक्षिण महाराष्ट्र जैन सभेच्या नेतृत्वाखालीं चाललेल्या जैन बोर्डिंगमध्यें भाऊराव व त्यांचे बंधु तात्या या दोघांनाहि ठेवण्यांत आलें. आतां संस्थान विलीन झालें आहे. त्याबरोबरच येथील कांहीं संस्थाहि सरकारी मदतीच्या अभावीं नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत.

ज्या जैन वसतिगृहांत राहून भाऊरावांचें शिक्षण झालें त्या वसतिगृहाविषयीं व सर्वसाधारण जैन समाजाविषयीं चार शब्द सांगितले तर ते अस्थानीं होणार नाहींत. कोल्हापूर संस्थानांत आणि साताऱ्याच्या दक्षिणभागांत जैन समाजाची वस्ती बऱ्याच प्रमाणावर आहे. थोडीफार व्यापारांत पुढारलेलीं आणि कांहीं घरंदाज सधन कुटुंबें सोडलीं तर बहुसंख्य जैनसमाज आपली उपजिविका शेतीवरच करतो. पुष्कळ गांवचीं पाटिलकीचीं वतनें याच समाजाकडे आहेत. कोल्हापुरांतील शाहुपुरी या व्यापारी पेठेंतील पुष्कळशा पेढ्या जैन आणि लिंगायत व्यापाऱ्यांच्याच आहेत. राहणी काटकसरीची, स्वभाव कष्टाळू व धार्मिक बंधनांमुळें निर्व्यसनी यामुळें सर्वसाधारणपणें हा समाज खाऊन पिऊन सुखी आहे. यांचें मूळचें वास्तव्य कर्नाटककडे. त्यामुळें त्यांची मातृभाषा कानडी. येथील वास्तव्य संपन्न प्रदेशांत म्हणून आर्थिक परिस्थिती बरी; आणि

धार्मिक मतभिन्नतेमुळें कर्मठपणा फार यामुळेंच कीं काय हा समाज हिंदु वगैरे इतर धर्मियांशीं थोडा फटकूनच वागतो. आपल्याकडे साधारणत: ब्राह्मणसमाज फार सोवळा समजला जातो; पण हे जैन लोक या सोवळ्या समाजाच्या हातचें पाणीहि पीत नाहींत. कांहीं गांवांतून तर जैनेतरांना विशेषत: स्त्रीवर्गाकडून अस्पृश्यासारखी वागणूक मिळते. देवळें, पाणवठे व धर्मपीठें या ठिकाणीं हिंदूंतील उच्चवर्णीय समजल्या गेलेल्या ब्राम्हणांनाहि प्रवेश मिळणें कठीण. मग मराठा-महारांचें नांवच सोडा. रस्त्यानें जातांना जैन भगिनी इतर धर्मियांचा स्पर्श झाला तर विटाळ होईल या समजुतीनें अगदीं सावधतेनें व मुठ्ठी मुठ्ठी शिवूं नको, असें म्हणत जातांना दिसतील. अशा कर्मठ समाजानें चालविलेलें वसतिगृह तरी या नियमाला कसें अपवाद असणार! तिथेंहि असे कांहीं निर्बंध होते कीं, ते पुरोगामी विचारसरणीच्या विद्यार्थ्यांना जाचक वाटतील. भाऊरावांना येथेंहि या जाचक निर्बंधांविरुद्ध झगडावें लागलें.

भाऊराव सरळ आणि सडेतोड स्वभावाचे, तसेंच प्रकृतीनें दांडगे व मनानें खंबीर असल्यामुळें ते कोल्हापुरांतील विद्यार्थ्यांच्या सर्व चळवळींत अग्रभागीं असत. त्यामुळें त्यांचें अभ्यासाकडे दुर्लक्ष होई. त्याचा परिणाम असा झाला कीं, भाऊराव कोणत्याहि परीक्षेंत सर्व विषयांत कधींच पास झाले नाहींत. ते पुष्कळ घोकंपट्टी करीत, पण मन एकाग्र नसल्यामुळें स्मरणशक्ति त्यांना आयत्या वेळीं धोका देई. तसे ते बुद्धीनें मंद म्हणावेत तर आज जे शेंकडों नवीन छोटे छोटे विद्यार्थी संस्थेंत येतात, त्यांना एकदां पाहिल्यानंतर प्रत्येकाचें नांव व गांव दोन्हींहि त्यांच्या ध्यानांत राहतात. निश्चित सन व तारखा देऊन ते जेव्हां

व्याख्यान करतात तेव्हां आपणांस त्यांच्या स्मरणशक्तीची कल्पना येते. अभ्यासाखेरीज इतर सर्व बाबतींत वर्गाचें पुढारीपण भाऊरावां-कडेच असे. यामुळें वर्गांतील दंग्याला इतका ऊत येई कीं, " Stand up on the bench, Bhau Patil "— ( भाऊ पाटील, बाकावर उभा राहा. ) असा शिक्षकाचा हुकूम झाला नाहीं असा दिवस विरळाच !

भाऊराव इंग्रजी शाळेंत असतांना छत्रपति शाहू महाराजांच्या प्रेरणेनें कोल्हापुरांत सत्यशोधक समाजाच्या चळवळीनें चांगलेंच मूळ धरलें होतें. बहुजनसमाजास धार्मिक गुलामगिरींतून मुक्त करण्यासाठीं महात्मा जोतिबा फुल्यांनीं ही चळवळ सुरू केली. सत्यशोधक समाजामार्फत कोल्हापुरांत निरनिराळ्या वक्त्यांचीं भाषणें होत. त्यांनीं प्रकाशित केलेलीं पुस्तकें विद्यार्थ्यांच्या वाच-नांत येत. भाऊरावांना तर ज्योतिबांचे विचार भयंकर क्रांतिकारक वाटले. गुलामगिरी, आसूड, सत्सार, ब्राह्मणांचें कसब, सार्वजनिक सत्यधर्म, जातिभेद विवेकसार इत्यादि ज्योतिबांचें वाङ्मय त्यांनीं वाचून काढलें. त्याचा त्यांच्या मनावर चांगलाच परिणाम झाला.

इ. स. १९०४ सालीं राष्ट्रीय सभेचें अधिवेशन मुंबईस भरलें होतें. त्या वेळीं ज्योतिबाच्या परंपरेचे वारस महर्षि अण्णासाहेब शिंदे यांनीं एक सर्वधर्मपरिषद् बोलाविली. त्या सभेच्या अध्यक्षस्थाना-वरून बडोद्याचे गुणज्ञ महाराज कै. सर सयाजीराव गायकवाड यांनीं मानवी समतेवर फार मोलाचे विचार प्रगट केले. तत्कालीन महाराष्ट्रीय वृत्तपत्रांतून या सभेचा बराच गाजावाजा झाला. त्या-मुळें अनेक तरुणांच्या विचारांत खळबळ निर्माण झाली. पुढें

अण्णासाहेब शिंद्यांनीं १९०६ सालीं ' डिप्रेस्ड क्लासेस मिशन ' ही मागासलेल्या वर्गाच्या उन्नतीसाठीं अखिल भारतीय संस्था स्थापन करून तिच्या मार्फत अस्पृश्यांच्या दुःखांना वाचा फोडली. शिंद्यांचें मानवी धर्माचें हें काम पाहून त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर सर जार्ज क्लार्क यांच्या मुलीनें नृत्याचा कार्यक्रम करून हजारों रुपयांची मदत त्या कार्याला मिळवून दिली. याच मुलीचें नांव पुढें कोल्हापूरच्या हरिजन विद्यार्थि वसतिगृहाला दिलें. या गोष्टींचा परिणाम भाऊरावांच्या मनावर चांगलाच झाला.

राजर्षि शाहू छत्रपतींनीं तर आपल्या राज्यांतून अस्पृश्यतेची हकालपट्टीच केली होती. त्याशिवाय शिक्षणविषयक व धार्मिक सुधारणाहि त्यांनीं धूमधडाक्यानें सुरू केल्या. या गोष्टी भाऊरावांच्या देखतच घडल्या. या त्रैमूर्तींच्या नवविचारानें भाऊरावांची विचारधारा बदलली. त्याचें प्रत्यंतर त्यांच्या शाळेंतील व वसतिगृहांतील वागणुकींत कसें उमटलें तें आतां आपणांस पहावयास मिळेल. भाऊराव या थोर पुरुषांचें विचारऋण कबूल करून मोठ्या अभिमानानें सांगतात कीं, " आधुनिक सामाजिक सुधारणांचा जनक ज्योतिराव फुले, हरिजनांचे थोर कैवारी महर्षि अण्णासाहेब शिंदे व बहुजनसमाजाचे वाली राजर्षि शाहू छत्रपति यांच्या थोर परंपरेचा मी पाईक आहे. ' आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणांशीं । बोलिले जे ऋषि । साच वर्ताया ' या तुकोबाच्या अभंगवाणीप्रमाणें या ऋषिवचनाचा प्रचार करणें हेंच मी माझें काम समजतों."

शाळेप्रमाणेंच वसतिगृहांतहि विद्यार्थ्यांचें पुढारीपण भाऊरावां-

कडेच असे. सोवळें नेसून प्रत्येक विद्यार्थ्यांनीं जेवावयास बसलें पाहिजे, असा जैन बोर्डिंगचा दंडक असे. कधींहि न धुतलेलें सोवळें नेसण्यापेक्षां पांढरें स्वच्छ धोतर नेसणें भाऊरावांना योग्य वाटे. म्हणून तो नियम धुडकावून लावून एके दिवशीं ते सोवळ्याशिवाय जेवावयास बसले. सुपरिंटेंडेंटनीं त्यांना नियम मोडल्याबद्दल जेवणावरून उठविलें, त्या वेळीं " हें कळकट सोवळें नेसण्यापेक्षां स्वच्छ धोतर नेसणें काय वाईट ? " असा सडेतोड सवाल भाऊरावांनीं सुपरिंटेंडेंटना विचारला. पण त्याचें समाधानकारक उत्तर मिळण्याऐवजीं त्यांना वसतिगृहाच्या नियमाप्रमाणें शिक्षा भोगावी लागली.

१९०७ सालीं मुंबईचे गव्हर्नर सर जार्ज क्लार्क यांच्या मुलीच्या स्मरणार्थ अस्पृश्य विद्यार्थ्यांसाठीं ' प्रिन्स क्लार्क हॉस्टेल ' या नांवाचें एक वसतिगृह उघडण्यांत आलें. उद्घाटन समारंभांत भाऊरावांनीं प्रामुख्यानें भाग घेतला, ही गोष्ट जैन वसतिगृहाच्या प्रमुखांना आवडली नाहीं. त्यांनीं भाऊरावांचें जेवण बंद केलें. पुढें अधिकाऱ्यांशीं वाटाघाटी झाल्यावर आंघोळ करून जेवण घेण्यास परवानगी देण्यांत आली. पण तें भाऊरावांनीं मान्य केलें नाहीं. रूढीचीं बंधन तोडलींच पाहिजेत, असें त्यांनीं मनापासून ठरविलें. म्हणून " मी अस्पृश्यता पाळावयास तयार नाहीं. अस्पृश्य हेहि मानवच आहेत. त्यांच्या स्पर्शानें विटाळ होतो आणि तो फिटण्यासाठीं आंघोळ करण्याचें कांहीं कारण आहे, असें मला वाटत नाहीं " असो जबाब भाऊरावांनीं दिला.

भाऊरावांच्या सरळ आणि सडेतोड स्वभावाचा फायदा इतर विद्यार्थीमित्र नेहमींच घेत असत. वसतिगृहांत दुपारच्या जेवणा-

नंतर विद्यार्थ्यांना दाढी करण्यास मनाई असे. पण सुपरिंटेंडेंट मात्र केव्हांहि दाढी करीत. हा नियम ब्र्याच विद्यार्थ्यांनां जाचक वाटत असे. पण उघड बोलून दाखविण्याचें धैर्य कुणाच्यानेंहि होईना. त्यांनीं भाऊरावांना पुढें करून भलत्याच वेळीं दाढ्या केल्या व संस्थेच्या नियमाचा भंग केला. त्या वेळीं वसतिगृहाचें सुपरिंटेंडेंट श्री. अण्णासाहेब लठ्ठे हे होते. त्यांच्या कानावर ही विद्यार्थ्यांची बंडखोरी गेली. तेव्हां त्यांनीं दाढी करणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला चार आणे दंड ठोठावला. त्या वेळीं "केव्हांहि दाढी करण्यांत अधर्म कसला ?" असा रोखठोक जबाब विद्यार्थ्यांनीं श्री. लठ्ठे यांना विचारला. "पण अधर्म नसला तरी संस्थेच्या नियमाचा भंग केल्यामुळें तुम्हाला दंड भरला पाहिजे किंवा वसतिगृहाला मुकलें पाहिजे" असें जेव्हां निक्षून सांगण्यात आलें तेव्हां ज्या मित्रांनीं भाऊरावांना पुढें केलें होतें त्यांनीच ताबडतोब दंड भरून टाकला. पण भाऊरावांनीं तसें करण्याचें नाकारलें. इतकेंच नव्हें तर, "आपण सोवळ्या समाजाला खूष करण्यासाठीं हा नियम पाळीत आहांत. मी केलें तें पाप नाहीं किंवा अधर्म नाहीं. मी संस्थेचा नियम मोडला असेन तर वाटल्यास मला संस्थेच्या बाहेर घालवून द्या. पण मी दंड भरणार नाहीं. ज्या बोर्डिंगमध्यें विद्यार्थ्यांना दाढी करण्याची मनाई करण्यांत येते त्याच बोर्डिंगमध्यें सुपरिंटेंडेंट मात्र केव्हांहि दाढी करतात. मग आम्ही केली तर कां चालत नाहीं ?" असा सवाल त्यांनीं प्रमुखापुढें मांडला. पण त्यांना तो बराच झोंबला. भाऊरावांची कैफियत विफल ठरली ! शेवटीं त्यांना आपलें चंबूगबाळें आटोपून बोर्डिंगच्या बाहेरचा रस्ता सुधारावा लागला !

भाऊरावांच्या शिक्षणाला येथेंच पूर्णविराम मिळाला. कशीबशी त्यांनीं इंग्रजी सहावीपर्यंत मजल मारली. पण पुस्तकी शिक्षणापेक्षां अन्याय्य रूढि व अनिष्ट धर्मसमजुती यांच्याशीं इतक्या लहान वयांत झगडून त्यांनीं सामाजिक अभ्यासाला येथेंच प्रारंभ केला. शाळा-कॉलेजांतील घोकीव शिक्षण, वसतिगृहांतील रूढिप्रिय बंधनें आणि प्रतिष्ठित समाजाचें गतानुगतिकत्व त्यांच्या मानी आणि सत्यनिष्ठ स्वभावाला मानवलें नाहीं; म्हणून ते वसतिगृहांतून कायमचेच बाहेर पडले.

## : ४ : छत्रपतींच्या सहवासांत

भाऊरावांनीं वसतिगृह सोडलें. पण आतां पुढें काय, या विवंचनेंत त्यांना मुळींच भटकावें लागलें नाहीं. शाहू महराजांचे मेहुणे श्रीमंत मामासाहेब खानविलकर यांनी भाऊरावांना आपल्या मुलाच्या संगतींत ठेवलें. मुलाचें नांव बाळासाहेब असें होतें. यांत मामासाहेबांचा हेतु हा होता कीं, भाऊरावांच्या सहवासांत आपल्या मुलाला शारीरिक व नैतिक दृष्टया चांगलें वळण लागावें. आतां भाऊराव बोर्डिंगमधून राजवाड्याकडे आले. त्यांचें जेवणखाण व राहणें ही सोय पण आंतच केली होती. पण भाऊराव पडले कट्टर शाकाहारी. त्यामुळें त्यांनीं राजवाड्यांतील जेवण कधींच घेतलें नाहीं. पण जेवणापेक्षांहि बाळासाहेबांच्या संगतींत त्यांना एक मोठा लाभ झाला. बाळासाहेबांच्या चहासाठीं दररोज दोन शेर उत्तम दूध येत असे. दिवसांतून फार तर अर्धा शेर दूध चहासाठीं उपयोगांत येई. बाकी राहिलेल्या शेर दीड शेराचा भाऊरावच फन्ना उडवीत, कारण बाळासाहेब चहाचे शोकी आणि भाऊराव तर चहाला शिवत नसत. मग भाऊरावांशिवाय दुधाचा मालक दुसरा कोण असणार ? शिवाय दुधाच्या जोडीला खडीसाखर, बदाम, पिस्ते इत्यादि पैलवानी खुराकहि मिळायचाच. सकाळीं उठावें, चारपाचशें जोरबैठका माराव्या आणि श्रीमंतांच्या वाटणीचा खुराक पचवावा हाच त्यांचा राजवाड्यांतील दिनक्रम असे. याचा इष्ट तोच परिणाम

झाला. भाऊराव अगोदरच धिप्पाड शरीराचे त्यांत आणखं खुराक व त्याच्या जोडीला व्यायाम. मग काय दुधांतच साख पडली. भाऊरावांची प्रकृति चांगलीच सुधारली.

शाहू महाराजांना तालमीचा नाद विशेष असे. त्यांनीं स्वतःहि आपलें शरीर उत्तम पैलवानासारखें बांधेसूद व पिळदार बनविं होतें. धिप्पाड शरीराचीं व उमद्या स्वभावाचीं मुलें दिसलीं कीं ते त्यांना आपल्या राजवाड्यावर आणीत, आपल्या आवडत्य तालमींत वस्तादाच्या हाताखालीं ठेवीत, पदरचेंच भरपूर खायल देत व त्यांना उत्तम पैलवान बनवीत. मग तो कुठल्याहि जातीच वा धर्माचा असो. भाऊरावांचा नियमित व्यायाम, पिळदार शरीर यष्टी व निर्व्यसनी स्वभाव पाहून महाराजांना फार आनंद वाटला. त्यांनीं भाऊरावांना जवळ बोलाविलें, मर्दानी पवित्र्यांत त्यांच्या पाठीवरून हात फिरविला व ते म्हणाले, "भाऊ पाटील, आत तुझ्या अंगांत बरीच रग आलेली दिसते आहे. तूं आमच्या ताल- मींत दररोज खेळायला जात जा बघूं." असें सांगून त्यांनीं आपल्या तालमींतील वस्तादास भाऊरावावर लक्ष ठेवण्यास सांगितलें. यापुढें छत्रपतींच्या तालमींतील वस्तादांचें भाऊरावांना मार्गदर्शन मिळालें. भाऊरावांचें आजचें धिप्पाड आणि खंबीर शरीर दिसत आहे त्याचें बरेचसें श्रेय छत्रपति शाहू महाराज व श्रीमंत बाबा- साहेब खानविलकर यांना आहे, असें म्हटलें तर कांहीं वावगें होणार नाहीं.

एके काळीं कोल्हापूरचा कुस्तीचा आखाडा सबंध हिंदुस्था- नांत गाजला. पेठापेठांतील तालमी, त्यांतून तयार होणारे शेंकडो

नवजवान आज कुठें आहेत ? पन्नास वर्षांपूर्वी कोल्हापुरांतून जर आपण पहांटे फेरफटका मारला असतां तर सबंध तालमी घुमत असल्याचा देखावा आपणांस दिसला असता. एका बाजूला तालमींतील पैलवानांचें घुमणें तर दुसऱ्या बाजूला गाई-म्हशींच्या धारांचा व जात्यावरील ओव्यांचा मंजूळ आवाज. गोकुळच जणुं ! हेंच त्या वेळच्या कोल्हापूरचें वैभव. मोठमोठे पंजाबी पैलवान मोठ्या दिमाखानें कुस्तीचें आव्हान देऊन महाराष्ट्रांत येत. अशा कैक धेंडांना शाहू महाराजांच्या तालमींत तयार झालेल्या दख्खनच्या पहाडांतील ‘ चुव्यांनीं ’ धूळ चारलेली आहे.

आज स्वातंत्र्याच्या काळांत त्या तालमी ओस पडायला लागल्या आहेत आणि पैलवानी पेशा संपुष्टांत येऊं लागला आहे. गणपत शिंदे, पाडोबा शिराळकर, सत्याप्पा धनगर, व्यंकप्पा बुरुड, बाळ पानारी, बाबू बिरें, कादर पंजाबी या नामांकित पैलवानांचीं नांवें महाराष्ट्र कधीं विसरणार नाहीं. कोल्हापुरांतील निरनिराळ्या तालमी व कुस्त्याचा प्रसिद्ध आखाडा—खासबाग मैदान—या गोष्टी अजूनहि पहाण्यासारख्या आहेत. पण पुढें काय? हे आखाडे आम्ही ठेवणार कीं बंद पाडणार ? या मर्द मराठ्यांची परंपरा जिवंत ठेवणार कीं मारून टाकणार ? हा कठीण प्रश्न आज आपल्या पुढें आहे. अगोदरच रेशनिंगचें अन्न खाऊन आजची प्रजा अशक्त व दुबळी झालेली आहे. भरपूर वैरणकाडी व कळणाकोंडा खायला मिळत नसल्यानें गाईगुरांचे गोठेहि ओस पडूं लागले आहेत ! मग हे आखाडे तरी कसे चालणार ? दैवदुर्विलास म्हणावयाचा. पण मर्दांनीं आखाडे ओस पडले तरी शाहू महाराजांच्या तालमींत

तयार झालेले भाऊरावांसारखे सत्‌शिष्य शैक्षणिक आखाड्यांत उतरून शेंकडों बालगोपाळांना बुद्धीची कसरत करावयास लावण्या-साठीं दंड थोपटून सज्ज आहेत, हें पाहिल्यावर आशेला जागा उरते. जीव उत्साहानें आणि उमेदीनें फुलून जातो. आज नाहीं उद्यां आपण या आखड्यांचा जीर्णोद्धार करूंच करूं, असा विश्वास वाटूं लागतो !

एकदां भाऊराव, बाळासाहेब खानविलकर, अण्णासाहेब गायकवाड व उपाध्ये ही मित्रमंडळी गप्पा झोडीत रस्त्यानें चालली होती. त्याच वेळीं इचलकरंजीकरांच्या बंगल्याला वळसा घालून महाराजांची घोड्याची गाडी आली. ती यांच्यापैकीं कोणालाच दिसली नाहीं. या वेळीं भाऊरावाशिवाय सर्वांच्या हातांत जळत्या सिगारेटस् होत्या. महाराजांनीं तें पाहिलें. त्यांना वाटलें हे सगळेजणच यांत तयार झालेले दिसतात. त्यांनीं प्रत्येकाला वेग-वेगळे बोलावून धमकी देऊन विचारलें. तेव्हां प्रत्येकजण म्हणाला, “ मी सिगारेट ओढीत नव्हतों. पण बाकीचे तिघेजण ओढीत होते आणि नेहमीं ओढतात.” शेवटीं सर्वांनाच बेदम मार दिल्यावर कळून चुकलें कीं, भाऊरावाखेरीज बाकीचे करमणुकीखातर धूम्रवलयें सोडीत असत. त्या वेळेपासून भाऊरावावर महाराजांची विशेष मर्जी बसली. ती इतकी कीं, पुढें भाऊराव एका परीक्षेंत नापास झाले असतां त्यांनीं पास होण्यासाटीं महाराजांचा वशिला लावला. तो प्रसंग मजेदार आहे.

भाऊराव राजाराम हायस्कूलमध्यें इंग्रजी सहावीच्या वर्गांत शिकत

होते. वार्षिक परीक्षेंत ते गणित विषयांत नापास झाले. भार्गवराम या नांवाचे त्यांचे वर्गशिक्षक होते. ते फार कडक व निस्पृह म्हणून प्रसिद्ध होते. कोणा लहानसान माणसाची येथें डाळ शिजणार नाहीं, हें भाऊरावांनीं ओळखलें. ते महाराजांच्याकडे गेले व, " गणित विषयांत नापास झाल्यामुळें मला सहावींतच रहावें लागत आहे. तरी आपण मास्तरांना सांगा " असें महाराजांना म्हणाले. महाराजांनीं भार्गवराम मास्तरांना राजवाड्यावर बोलाविलें व, "भाऊ पाटील यांस वरच्या वर्गांत घाला " असें सांगितलें. तेव्हां मास्तर म्हणाले, "पाटलाला कांहींहि येत नाहीं. त्याला पुढच्या वर्गांत ढकलून कांहींच उपयोग व्हाययाचा नाहीं. तुमची आज्ञा म्हणून मी त्याला वर घालतों. पण मला जर आपण खरें सांगायला परवानगी दिली तर पाटलाचा बाक मी वरच्या वर्गांत घालीन. पण पाटलाला घालणार नाहीं असेंच मी प्रामाणिकपणानें सांगेन. " भाऊरावांची अभ्यासांतील इतकी ' प्रगति ' पाहिल्यावर महाराजांनींहि त्यांना वर चढविण्याविषयीं विशेष आग्रह केला नाहीं. मग भाऊरावांनींहि " कशाला जावें दूर ? आतां इथेंच पंढरपूर " असें ठरवून आपली शिक्षणाची वारी इथेंच पुरी केली.

याच सुमाराला सुट्टीसाठीं भाऊराव आपल्या घरीं आले. त्या वेळीं त्याचे वडील इस्लामपुरास रहात असत. एके दिवशीं सहजच भाऊराव इस्लामपूरच्या शाळेंत गेले. तेथें एक गरीब मुलगा आपलें पाटीदप्तर घेऊन दाराच्या बाहेरच्या बाजूस पायरीजवळ बसलेला त्यांनीं पाहिला. मास्तरांची खुर्ची त्याच्यापासून बऱ्याच अंतरावर होती. मास्तर कोणता तरी विषय शिकविण्यांत अगदीं

दंग होऊन गेले होते. बिचारा तो विद्यार्थी आपलें सर्व लक्ष एक-वटून मास्तरांच्या शिकविण्याशीं तन्मय झाला होता. रस्त्यावरून येणाऱ्या जाणाऱ्यांची गडबड व मास्तरांचें त्याच्यापासूनचें अंतर यामुळें त्याच्या पदरांत किती ज्ञान पडत असेल हें त्याचें त्यालाच ठाऊक ! भाऊरावांनीं थोडा वेळ हा प्रकार शांतपणें उभा राहून पाहिला. नंतर त्यांनीं मास्तरांना विचारलें, "हा मुलगा एकटाच तिकडे कां बसला आहे ?" मास्तर म्हणाले, "तो महाराचा मुलगा आहे. शिकायला येतो. त्याला कसें आंत बसवावयाचें ?" लहानपणीं श्री शिवाजी महाराज विजापुरीं गेले असतां एका गाय कापीत असलेल्या कसायास पाहून त्यांना जितका संताप वाटला तितक्याच संतापानें भाऊरावांनीं त्या शिक्षकाची हजेरी घेतली. रूढीनें बांधलेला व परंपरेला चिकटलेला बिचारा शिक्षक काय उत्तर देणार ! "मला या मुलांस आंत बसवितां येणार नाहीं" असें त्यांनीं भाऊरावांना निक्षून सांगितलें.

आपला कैवार घेऊन मास्तरांशीं भांडणारा हा कोण अनोळखी गृहस्थ आहे, या विचारांत तो मुलगा गढून गेला होता. आतां तो अश्रू ढाळायला लागला. भाऊरावांनीं मोठ्या प्रेमानें त्याच्या पाठीवरून हात फिरविला व ते त्याला म्हणाले, "चल, या असल्या शाळेंत काय शिकतोस ? मी तुला दुसऱ्या शाळेंत घालतों." असें म्हणून ते त्याला आपल्याबरोबर घेऊन त्याच्या घरीं गेले व त्याच्या आईवडिलास त्यांनीं आपला बेत समजावून सांगितला. त्यांना आनंद वाटला. त्यांनीं आपल्या मुलास शिक्षणासाठीं पाठविण्यास मोठ्या आनंदानें रुकार दिला.

भाऊरावांनीं या मुलास कोल्हापुरास मिस् क्लार्क हॉस्टेलमध्यें ठेवलें. तेथील कुठल्याहि शाळेंत अशा प्रकारचा भेदाभेद नसल्या-मुळें त्याचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण या ठिकाणीं झालें. पुढें हाच विद्यार्थी मुंबई विधिमंडळाचा सभासद झाला. 'मूकनायक' या नांवाचें एक वर्तमानपत्र त्यानें पुढें चालविलें. त्या विद्यार्थ्याचें नांव ज्ञानदेव ध्रुवनाथ घोलप. श्री. घोलपांचीं मुलें आणि मुली आजहि भाऊरावांच्या शिक्षण संस्थेंत शिकत आहेत. ज्ञानदेव हा भाऊ-रावांच्या शिक्षणकार्यांतील पहिला ज्ञानदिवा!

ज्ञानदेव घोलप या विद्यार्थ्यास शाळेंतून त्याच्या घरीं नेल्या-नंतर त्याला घेऊन ते आपल्या घरीं आले. भाऊरावांना तो आपला मित्रच वाटूं लागला. त्यांनीं त्याला आपल्याबरोबरच जेवावयास घातले. एक महार विद्यार्थी आपल्या घरीं जेवला हें भाऊरावांच्या आईस ठाऊक नव्हतें. संध्याकाळीं शाळेंतील मुलें घरीं आल्यावर त्यांनीं सर्व हकीकत गंगाबाईस सांगितली. तोच मुलगा आपल्या घरीं जेवला आणि तो तर महार! कर्मठ गंगाबाईंना तें आवडलें नाहीं. त्यांनीं जवळच पडलेली फुंकणी घेतली व आपल्या चिरंजि-वांच्या पाठींत घातली. बरोबर चार दोन कानडी शिव्याहि त्यांनीं हासडल्या!

आज पंचाण्णव वर्षांच्या वृद्ध गंगाबाईंना संस्थेंतील स्पृश्य-अस्पृ-श्यांचीं सर्वच मुलें आपली वाटतात. त्या त्यांच्या हातचें पाणी पितात, जेवण घेतात व त्यांची प्रेमानें विचारपूस करून त्यांनाहि जेवूं घालतात. आज त्या भाऊरावांच्या मातोश्री राहिल्या नाहींत. संस्थेच्या हजारों बाळगोपाळांच्या त्या आजीबाई झाल्या आहेत!

## : ५ : शिक्षण सोडलें. पुढें काय ?

अर्धवट शिक्षण सोडून भाऊराव घरीं आले. त्यांच्या वडिलांना वाटत होते कीं, आमच्या थोरल्या मुलानें मॅट्रिक व्हावें व आपल्याच प्रमाणें राजदरबारीं रेव्हिन्यू खात्यांत नोकरी करावी आणि नांव व पैसा मिळवावा. पण भाऊरावांनीं वडिलांच्या आशा निष्फळ ठरविल्या. अशा स्थितींत येवढ्या शिक्षणावरहि त्यांना कारकुनीची जागा वडिलांच्याच खात्यांत मिळत होती. पण ती त्यांनीं नाकारली. आपल्याला धड दहा ओळी मराठींत लिहितां येत नाहींत; मग कारकुनी कशी जमणार, असें भाऊरावांना वाटे. म्हणून त्यांनीं कारकुनीचा नाद सोडला व आपला मोर्चा पोलीस खात्याकडे वळविला. सब-इन्स्पेक्टरच्या कोर्समध्यें प्रवेश मिळविण्यासाठीं त्यांनीं प्रयत्न केला. पण तेथेंहि अपयशच पदरीं आलें. पोलीस खात्याच्या प्रमुख अधिकाऱ्यानें त्यांना ‘ हवालदाराची ’ जागा देऊं केली. त्याबद्दल वडिलांशीं विचारविनियम करतां, वडील म्हणाले, “ नोकरी नाहीं मिळाली तर भीक माग, पण पोलीस खात्यांत जाऊं नकोस. ” वडिलांची अशी आज्ञा मिळाल्यावर त्यांनीं पोलीस खात्याचाहि नाद सोडला व ते घरींच शेतीभातींत लक्ष घालूं लागले.

१९१० सालीं म्हैसूरला अखिल भारतीय दिगंबर जैन महासभेचें अधिवेशन भरलें होतें. त्यासाठीं व जवळच असलेल्या श्री.

गोमटेशाच्या उत्सवासाठीं सबंध हिंदुस्थानांतून विद्वान व भाविक जैन समाज जमला होता. अधिवेशनाचें अध्यक्षस्थान सुप्रसिद्ध दानवीर शेट माणिकचंद पानाचंद यांनीं मंडित केलें होतें. व्यवस्थेसाठीं एक स्वयंसेवकपथक ठेवण्यांत आलें होतें. त्याचें नेतृत्व भाऊरावांकडे होतें. भाऊरावांनीं आपल्या सहकारी स्वयंसेवकांसह अधिवेशनाची व्यवस्था अगदीं चोख ठेवली होती. त्याबद्दल पाहुणे-मंडळी व अध्यक्षहि स्वयंसेवकांवर खूष झाले होते. अध्यक्ष असलेले शेट माणिकचंद यांच्या डोळ्यांत एक ‘ हिरा ’ चांगलाच भरला. या हिऱ्याला पैलू पाडले तर याची किंमत खात्रीनें वाढल्याशिवाय राहणार नाहीं, असें त्यांनीं आपल्या मनाशीं ठरविलें. कोणता बरें तो हिरा ? भाऊरावांशिवाय दुसरा कोणता असणार ? शेटजींनीं भाऊरावांस आपल्या मुंबईच्या पेढीवर येण्याविषयीं विचारलें. भाऊरावांनीं तात्काळ होकार दिला. परिषद संपल्यावर शेटजींच्या बरोबर भाऊराव मुंबईस गेले. मुंबईस शेट माणिकचंदांची पेढी होती. तेथें हिऱ्यामोत्यांचा व्यापार चाले. तेथें हिऱ्यामोत्यांची पारख करण्याचें काम शिकण्यासाठीं भाऊरावांना ठेविलें. पण अज्ञान आणि दारिद्र्य यांच्या घाणींत शेकडों वर्षें खिचपत पडलेले मानव-देहधारी हिरे उजाडांत आणण्याचें पवित्र कार्य भाऊरावांच्या हस्तें व्हावयाचें असल्यानें मुंबईच्या जव्हेरी बाजारांतील शेट माणिकचंदांच्या पेढीवरील निर्जीव रत्नांची पारख करण्याचें क्षुद्र काम भाऊरावांना आवडलें नाहीं म्हणा कीं, जमलें नाहीं समजा. त्यांनीं शेटजींना परत जाण्याची परवानगी मागितली. पण भाऊ-

रावांसारख्या उमद्या तरुणानें आपल्या घरून विन्मुख जावें हें त्यांना आवडेना. त्यांनीं दरमहा वीस रुपये स्कॉलरशिप देऊन भाऊरावांचें नांव दावर्स कॉलेज ऑफ् कॉमर्स या व्यापारविषयक शिक्षण देणाऱ्या महाविद्यालयांत घातलें. पण तिथेंहि ते फार काळ राहिले नाहींत. मजुरांच्या घामानें उभारलेल्या त्या गगनचुंबी इमारती आणि त्यांच्याच श्रमानें निर्माण झालेला तो मुंबापुरीचा थाटमाट भाऊरावांच्या बालबोध दृष्टीला सहन झाला नाहीं. नागरी जीवनाच्या कांटेरी बंधनानें त्यांचा जीव उबगला. " जाईन कधीं मी आतां माझ्या घरीं " असें त्यांना वाटूं लागलें. शेवटीं निर्जीव रत्नांची पारख करावयास गेलेला हा रत्नपारखी सजीव नररत्नांची पारख करण्यासाठीं पुन्हां आपल्या कर्मभूमींत आला.

१९१० सालीं भाऊरावांनीं मुंबई सोडली. साताऱ्यास आल्यावर त्यांनीं एक खासगी शिकवणीचा वर्ग सुरू केला. विद्यार्थीदशेंत शेवटच्या बाकावर बसणारे भाऊराव आतां पाटील मास्तर बनले. त्यांच्याकडे शिकवणीसाठीं येणारे बहुतेक विद्यार्थी मागासलेल्या समाजांतीलच असत. कारण सबंध साताऱ्यांत मोफत शिक्षण मिळण्याचें हेंच एक ठिकाण होतें. अस्पृश्य विद्यार्थ्यांना तर पुस्तकें व कपडेहि भाऊराव पुरवीत. दुसरें कांहीं काम नसल्यामुळें सारा वेळ ते या वर्गांतच घालवीत. त्यामुळें थोड्याच दिवसांत विद्यार्थ्यांची चांगलीच प्रगति दिसून आली.

या वर्गामुळें लौकरच भाऊरावांची एक हुशार व होतकरू शिक्षक म्हणून प्रसिद्धी झाली. त्यामुळें साताऱचे एक प्रसिद्ध वकील कै. डोसाभाई माणेकजी यांच्याकडे त्यांना एक शिकवणी मिळाली.

ते दरमहा पांच रुपये देत. पांच ही संख्या जरी लहान वाटली तरी ते पांच रुपये भाऊरावांना त्या वेळीं लाखमोलाचे वाटत. साहजिकच आहे. स्वतःच्या श्रमानें मिळविलेले ते पांच रुपये होते! हळूहळू ही शिकवण्यांची संख्या वाढूं लागली. दरमहा पांच रुपये मिळविणारे भाऊराव आतां ऐंशी ते नव्वद रुपये मिळवूं लागले, पण त्यासाठीं त्यांना श्रमहि करावे लागत. ते भल्या पहाटे उठत, स्नानसंध्या आटोपीत व हातांत रुंद व चौकोनी कांचांचा कंदील घेऊन सूर्योदयापूर्वी तीनचार शिकवण्या करीत. शिवाय पुन्हां ते वर्ग घेतच असत. गणितापासून संस्कृतपर्यंत सर्व विषय ते शिकवीत असत. गणित आणि संस्कृत यांत कधींच पास न होणारे भाऊराव विद्यार्थ्यांना काय शिकवीत असतील याची कल्पनाच केलेली बरी! पण चिकाटी व निष्ठा असली कीं, सर्व गोष्टी सहजसाध्य होतात. त्यामुळें आरंभीं हे विषय शिकविणें जरी त्यांना जड गेलें तरी त्यांनीं कशी तरी वेळ मारून नेलीच. विशेषतः दंगेखोर आणि उडाणटप्पू विद्यार्थ्यांना शिकविण्यांत पाटील मास्तरांचा हातखंडा असे.

सातारला नुकतेच एक बडे अधिकारी बदलून आले. ते जातीनें ब्राह्मण होते. त्यांनीं भाऊरावांची प्रसिद्धि ऐकून आपल्या मुलाला पाटील मास्तरांची शिकवणी लावली. दररोज सकाळीं ते त्याच्या घरीं बसून त्याला शिकवूं लागले. मुलाचे वडीलहि जवळपास बसून आपलें काम करीत असत. पाटील मास्तर आपल्या मुलाला काय शिकवितात याकडेहि त्यांचें अधून मधून लक्ष असे. त्यामुळें भाऊरावांची विशेषतः संस्कृत विषय शिकवितांना तारांबळ

उडत असे. मग त्यांनीं एक युक्ति काढली. त्यांनीं ही सकाळची वेळ बदलून दुपारची ठेवली. त्या वेळीं मुलाचे वडील ऑफिसांत असत. त्यामुळें त्यांचें शिकवणीचें काम निर्धास्तपणें चाले.

त्यानंतर पोप या नांवाचे एक युरोपियन गृहस्थ असिस्टंट कलेक्टर म्हणून सातारला आले. ते आय्. सी. एस्. झालेले होते. त्यांना मराठी शिकविण्यासाठीं पाटील मास्तरांची निवड झाली. शिकवणी म्हणून दरमहा तीस रुपये ठरली. पण अट एक. 'भाऊरावांनीं आपल्या या बड्या विद्यार्थ्याशीं इंग्रजींत मुळींच बोलावयाचें नाहीं.' भाऊराव मनांत म्हणाले, 'बरें झालें. आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन !'

अशा प्रकारें भाऊरावांनीं शिकवणीसारख्या धंद्यांत चांगला पसा व लौकिक मिळविला. आश्चर्य असें कीं, त्यांच्या शिकवणी-पैकीं किंवा वर्गामधला एकहि मुलगा नापास झाला नाहीं. हें पाहून भाऊरावांच्या वडिलांनाहि आपल्या मुलाबद्दल अभिमान वाटूं लागला. त्यांना वाटलें, 'आपला मुलगा नुसता मास्तर नाहीं, तर तो आतां साहेबालाहि शिकवितो !'

भाऊराव पाटील सातारला असतांनाच त्यांचा तारळ्याचे रुद्राजी राजे महाडीक यांच्याशीं संबंध आला. रुद्राजी राजे यांना मराठा समाजाच्या सुधारणेची फार तळमळ लागून राहिली होती. मराठा हा बहुजनसमाजाचा कणा आहे, त्याच्या जागृतीवरच सबंध समाजाचें कल्याण अवलंबून आहे, असें त्यांचें ठाम मत होतें. म्हणून त्यांनीं कॅप्टन महाडीक, रावसाहेब तात्यासाहेब पाटील, श्री. पिलाजेराजे शिर्के, श्री. संगपाळ, रावसाहेब दुदुस्कर,

श्री. भाऊसाहेब बर्गे इत्यादि मंडळींच्या साह्याय्यानें सातारला ‘ मराठा विद्याप्रसारक समाज ’ स्थापन केला. या कामीं रुद्राजी राजांच्या बरोबर खेडोपाडीं फिरून व्याख्यानें देऊन व गांठीभेटी घेऊन भाऊरावांनींहि मराठा समाजांत शिक्षणाची लालसा निर्माण केली. पुढें या समाजानें श्री जमनाबाई मराठा बोर्डिंग या नांवाचें एक वसतिगृहहि सुरू केलें. हल्लीं तें वसतिगृह चाललें आहे. पण आज त्याच्यांत मूळचा जोम दिसत नाहीं.

याच मंडळींनीं शिक्षणप्रसारास आर्थिक सहाय्य मिळवून देण्याच्या दृष्टीनें एक ‘ कृषिसुधारणा मंडळ ’ काढलें. या कामीं श्री. रामभाऊ चिटणीस, श्री. बाबासाहेब चित्रे वकील, श्री. यशवंतराव प्रतापराव गुजर, रजिस्ट्रार खात्याचे मि. ब्रॅडनसाहेब व शेतकी खात्याचे प्रमुख अधिकारी डॉ. मॅनसाहेब यांनीं निर-निराळया प्रकारांनीं सहाय्य केलें. यासाठीं कोरेगांवचे श्री. भाऊ-साहेब बर्गे यांनीं आपल्या मालकीची वीसपंचवीस एकर जमीन लांब मुदतीनें पण कमी खंडानें दिली.

भाऊरावांच्याकडे महत्वाचें असें शेअरविक्रीचें व प्रचाराचें काम आलें, तें त्यांनीं कोल्हापूर-बेळगांवपासून ते लाहोर-कोइट्या-पर्यंत फिरून उत्तम तऱ्हेनें पार पाडलें. सातारच्या मराठा तरुणांची पूर्वीपासूनच लष्करांत मोठ्या प्रमाणावर भरती असे, या मराठा पलटणी हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत असत. त्या त्या ठिकाणीं जाऊन भाऊरावांनीं आपली योजना त्यांच्या गळीं उतर-विली. त्यांतून फारशी फलनिष्पत्ति झाली नसली तरी भाऊरावांना सार्वजनिक समाजसेवेची स्फूर्ति मिळाली.

कृषिसुधारणा मंडळाच्या प्रचारासाठीं भाऊराव फिरत असतां लाहोरच्या ' भारत इन्शुअरन्स कंपनीची ' एजन्सी त्यांना मिळाली. कोठलेंहि काम स्वेच्छेनें अगर अनिच्छेनें अंगावर पडलें तरी त्यांत संपूर्ण लक्ष घालून तें यशस्वी करावयाचें हा भाऊरावांचा ठरलेला खाक्या. त्यामुळें फक्त एक वर्षाच्या कालावधींत त्यांनीं या कंपनीचें एक लाख रुपयांचें काम केलें. यावरून त्यांची काम करण्याची धडाडी दिसून येईल.

१९११ च्या सुमारास दक्षिण साताऱ्यांत दुधगांव या ठिकाणीं प्रसिद्ध समाज कार्यकर्ते श्री. भाऊसाहेब कुदळे व मध्वाण्णा मास्तर यांच्या साह्यानें त्यांनीं एक शिक्षणसंस्था स्थापन केली. दुधगांव हें मध्यवर्ति ठिकाण असल्यामुळें तेथें शिकण्यासाठीं अनेक गांवांचे विद्यार्थी येत. त्यांच्यासाठीं या संस्थेनें एक वसतिगृहहि काढलें. भाऊरावांच्या ध्येयाप्रमाणें या वसतिगृहांत जातिभेदाला थारा नसे. त्यामुळें या वसतिगृहांत मुलें पाठविण्यास आरंभीं लोक कांकूं करीत असत. पण भाऊराव आणि त्यांचे सहकारी यांच्या चिकाटीनें लौकरच या वसतिगृहाला मूर्त स्वरूप आलें. १९३० सालापर्यंत हें वसतिगृह चाललें होतें. या अवधींत शेंकडों विद्यार्थ्यांनीं या संस्थेचा फायदा घेतला. या संस्थेमुळें तेथील शाळेंतील मुलांनींहि जातिभेदाला मूठमाती दिली. त्यामुळें या गांवाची शिक्षणांत फारच मोठी प्रगति झाली. आज या गांवांत दोनशें ट्रेन्ड शिक्षक आहेत. त्यांपैकीं वीस स्त्रीशिक्षिका आहेत. नुकतेच आवळे या नांवाचे मांग समाजापैकीं एक तरुण इंग्लंडहून टी. डी. ही शिक्षणांतील अत्युच्च पदवी प्राप्त करून आलेले आहेत. ते एम्. ए. बी. टी होतेच. हे दुधगांवचे रहिवाशी.

दुसरे एक कांबळे नांवाचे महार समाजांतील तरुण परदेशाहून उच्च शिक्षण घेऊन आलेले आहेत. शिवाय एक मराठा व एक मुसलमान विद्यार्थी डबल ग्रॅज्युएट होऊन आज मोठमोठ्या हुद्या-वर आहेत. मॅट्रिक व मराठी सातवी झालेले तर शेकडों विद्यार्थी या गावांत आहेत. हें सर्व भाऊरावांच्या पहिल्या प्रयत्नाचें फळ आहे. येथूनच संस्थेच्या रूपानें पायाशुद्ध व सनदशीर प्रयत्नास भाऊरावांनीं प्रारंभ केला. पुढील प्रचंड कार्याची ही मुहूर्त-मेढच म्हणावयाची !

यानंतर नेर्ले ( तालुके कऱ्हाड) या ठिकाणींहि असेंच एक वसतिगृह काढण्यांत आलें. तें त्यांनीं नांवारूपाला आणलें. मग काले ( तालुकें कऱ्हाड) या ठिकाणीं आजच्या रयत शिक्षणसंस्थेची स्थापना केली (१९१९). त्या ठिकाणच्या वसतिगृहांत दीडशें ते दोनशें विद्यार्थी एकाच वेळीं राहात. एवढ्या मोठ्या प्रमाणावर त्या ठिकाणीं राहून विद्यार्थी शिक्षण घेत. अशा प्रकारें भाऊरावांनीं आपल्या ध्येयाप्रमाणें मोठ्या धडाडीनें शिक्षणाच्या पवित्र कार्याला प्रारंभ केला. "दैवं अन्यत्र चिंतयेत्" या उक्तीप्रमाणें भाऊरावांवर मध्येंच एक अनपेक्षित व भयंकर असें गंडातर आलें. त्यामुळें त्यांना कांहीं काळ आपल्या या कार्यापासून दूर राहावें लागलें.

## : ६ : कोल्हापुरांतील समाजसुधारणा

आपल्या विद्यमान मुंबई सरकारनें पुण्याच्या चालू अधिवेशनांत ' कुलकर्णी वतन नष्ट करण्याचें बिल ' पास केलें. याशिवाय अस्पृश्यतेला कायद्यानें बंदी केली व बहुजनसमाजाची शिक्षणांत प्रगति व्हावी म्हणून प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत केलें. राज्यकारभार हातीं आल्यापासून दोन तीन वर्षांच्या या अल्पकाळांत बऱ्याच सुधारणा आपल्या कॉंग्रेस सरकारनें करून दाखविल्या. पण पन्नास वर्षांपूर्वी याच सुधारणा शाहू महाराजांनीं आपल्या संस्थानांत सुरू करून प्रजेला स्वराज्यांतील सुखानंद अनुभवावयास लावलीं होतीं.

वतनदार कुलकर्णी हा खेड्यांतील जनतेच्या अशिक्षितपणाचा फायदा घेऊन तिला कसा छळतो या गोष्टीची पुरेपूर कल्पना शाहू महाराजांना होती. म्हणून त्यांनीं कुलकर्णी वतन कायद्यानें नष्ट करून टाकलें. गेल्या वर्षी शेडयूल्ड कास्ट फेडरेशनच्या आंबेडकरपक्षीय हरिजनांच्या पक्षानें पुणें असेंब्लीवर एक मोर्चा नेऊन महारवतनें नष्ट करून तीं रयताऊ करा, अशी मागणी केली असतांहि आमच्या सरकारनें तसें करण्याचें नाकारलें. पण " आमचीं वतनें नष्ट करूं नका " अशी महारमंडळीची मागणी असतांहि शाहू राजानें पन्नास वर्षांपूर्वी ती खालसा करून टाकली व महारांच्या मागची वेठबिगारीची कटकट कायमची

मिटवून टाकली. या तुटपुंज्या महारकी वतनाच्या लालचीनें बिचारे महार लोक कसे लाचार बनतात व पाटील–कुलकर्ण्यांच्या पोकळ धमकावणीला कसे बळी पडतात याची जाणीव शाहू महाराजांना होती. म्हणून त्यांनीं हा कायदा पास करवून घेतला व त्याची कडक अंमलबजावणी केली. म्हणूनच कोल्हापूरचा अस्पृश्य समाज शेजारच्या आपल्या भाईबंदांपेक्षां आजहि अधिक सुधारलेला दिसतो.

याच सुमारास एक ' वैदिक प्रकरण ' कोल्हापूरच्या राजकारणांत गाजलें. राजवाड्यावर कांहीं धार्मिक विधि करावयाचा होता. तो राजपुरोहितानें वेदांतील विधीप्रमाणें करावयाचें नाकारलें. इतकेंच नव्हें तर तसा अधिकार तुम्हांस पोंचत नाहीं, असें बेगुमानपणें त्यानें महाराजांस सांगितलें. या कामीं संकेश्वर पीठाचे शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी होते. त्यांचीहि या पुरोहितास आंतून फूस होती, असा संशय महाराजांस आला. महाराज संतापले. त्यांनीं हें भिक्षुकशाहीचें जोखड त्याच क्षणीं झुगारून दिलें व डॉ. कुर्तकोटींचीहि कोल्हापुरांतून हकालपट्टी केली.

या किंवा अशाच प्रकारच्या सुधारणा करून शाहू छत्रपतींनीं इतक्या पूर्वीच्या काळीं समाजांत जागृति केली. पण मोठमोठ्या सरकारी हुद्यावर असलेले पांढरपेशे लोक महाराजांना या कामीं विरोध दर्शवूं लागले. तेव्हां त्यांनाहि मोकळे करून त्या जागीं जाधवराव, लट्ठे, डोंगरे इत्यादि नव्या विचारांच्या तरुण मंडळींची शाहू महाराजांनीं नेमणूक केली. त्या वेळीं कोल्हापूरच्या आणि पुण्या-मुंबईच्या प्रतिगामी व सनातनी विचारांच्या पुढाऱ्यांनीं व वृत्तपत्रांनीं शाहू महाराजांवर टीकेची झोड उठविली. लोक-

मान्यांच्या 'केसरी'नेंहि या 'सत्कार्यास' थोडाफार हातभार लावलाच. हे लोक इतकेंच करून थांबले नाहींत तर " महाराज राज्यकारभार चालविण्यास नालायक आहेत. त्यांना गादीवरून काढून टाका " असाहि प्रचार त्यांनीं सुरू केला. यापूर्वीं होऊन गेलेल्या (१९०७) ' टिळक-बर्वे ' प्रकरणाची ' पुण्याईहि ' त्याना उपयोगी पडली. या असंतोषांतूनच कोल्हापूरचें ' डांबर प्रकरण ' उद्भवलें.

१९१४ सालच्या मे महिन्यांतली १४ तारीख असावी. या दिवशीं टाऊनहॉलमधील बागेंत असलेल्या व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्याला कुणी तरी इंग्रजद्वेष्टयानें डांबर फासलें. तो काळ म्हणजे राजकीय असंतोषाचा. या वेळीं राष्ट्रीय सभा जरी सनदशीर मार्गानेंच प्रवास करीत होती तरी १९०७ च्या सुरत कॉंग्रेस पासून तिचीं पावलें जहाल राजकारणाच्या बाजूनें पडूं लागलीं होतीं. १९०६ च्या कलकत्ता कॉंग्रेसनें महर्षि दादाभाई नौरोजींच्या अध्यक्षतेखालीं संपूर्ण स्वराज्याच्या मागणीचा नारळ फोडला होता. वंगभंगाच्या चळवळीमुळें हिंदी तरुणांचीं डोकीं भडकलीं होतीं. त्याचा उद्रेक बॉंबस्फोटमध्यें होऊं लागला. बंगालच्या खांद्याला खांदा लावून लढणारा महाराष्ट्र तरी या गोष्टीला कसा अपवाद ठरणार ! तोहि आपल्या वंगीय मित्रांच्या मार्गाचा अवलंब करूं लागला. अशा प्रकारें सबंध देशांत राजकीय असंतोष माजला होता. यांतून कोल्हापूरहि सुटलें नाहीं. येथील तरुणांनीं आपली भूक डांबर प्रकरणावर भागविली.

डांबर प्रकरणानें कोल्हापुरांत चांगलीच खळबळ उडाली.

संस्थानी पोलीस खात्याची धावपळ सुरू झाली. त्यांच्या मदतीला ब्रिटिश हद्दींतील पोलीसहि आले. चांगल्या चांगल्या माणसांच्या मागें गुप्त पोलीसांचा ससेमिरा लागला. कांहीं संधिसाधू प्रतिष्ठितांनीं या वाहत्या गंगेंत हात धुवून घेण्याचें ठरविलें.

कोणत्याहि समाजांत नव्या विचाराचे व जुन्या विचाराचे असे दोन पक्ष नेहमीं असतात. राजकारणांतहि तीच स्थिति असते. कोल्हापूर दरबारांत गायकवाड व जाधवराव यांचे दोन गट होते. गायकवाडांच्या बाजूला जुन्या विचारांचे पेढीवाले जैन असत. जाधवरावांच्या पक्षाला नव्या विचाराचे खालच्या समाजांतील सुशिक्षित तरुण विशेष असत. विशेषत: लठ्ठे, डोंगरे इत्यादि तडफदार तरुणवर्ग जाधवरावांच्या खांद्याला खांदा लावून काम करीत असे. हें जुन्या विचाराच्या पहिल्या गटाला आवडत नसे. लठ्ठे अधून मधून जैन समाजाच्या, मागसलेल्यापणावर व कांहीं स्वार्थी लोकांच्या कारवायांवर वृत्तपत्रांतून व सभासंमेलनांतून सडकून टीका करीत. त्यामुळें जैन समाजांतील पुरोहितवर्ग व त्यांचे पाठीराखे लठ्ठयांचा फार द्वेष करीत असत. त्यांत निटवे, लाटकर, पंडित, पाटील या जैन पुढाऱ्यांचा लठ्ठयांना कसून विरोध होई. विरोधक तात्त्विक भूमिकेवरून भांडूं लागले तर त्यांत समाजाचें हितच असतें. पण त्यांत समाजहितापेक्षां व्यक्तिद्वेष व स्वार्थ यांचेंच प्राबल्य वाढलें तर त्या विरोधाला हीन स्वरूप येतें. मग हे विरोधक आपली मूळची उच्च भूमिका सोडून प्रतिपक्षाचा पाडाव करण्यासाठीं वाटेल त्या संधीचा फायदा करून घ्यायला कमी करीत नाहींत. लठ्ठयांच्या जैन विरोधकांनीं वाटेल त्या

मार्गाचा अवलंब करून लङ्घयांचा काटा काढावयाचाच असें ठरविलें. अशा स्थितींतच हें डांबर प्रकरणाचें कोलीत त्यांच्या हातीं लागलें. या कोलिताचा चटका भाऊरावांच्या जीवनाला विशेष जाणवला. चोर सोडून संन्याशालाच सुळीं देण्याचा तो प्रकार होता. पण सरकारचें 'गुप्त' पोलीस खातें व त्यांच्या जोडीला स्वहितासाठीं 'गुप्त' मसलती करणारे हितशत्रू असले म्हणजे असें व्हावयाचेंच !

या वेळीं भाऊराव कारगांवला आपल्या वडिलांकडे होते. एके दिवशीं अकस्मात त्यांना तार आली. "तावडतोब निघून यावें. कल्लाप्पा भरमाप्पा निटवे, कोल्हापूर" येवढाच मजकूर त्यांत होता. आईवडिलांचा निरोप घेऊन भाऊराव तांतडीनें कोल्हापूरला गेले. भविष्यांत कोणकोणत्या गोष्टी घडणार आहेत याची थोडी तरी जाणीव मनुष्यास झाली असती तर जगांतील किती तरी संकटें टाळतां आलीं असतीं! पण भविष्यकाल कोण रोखूं शकणार! बिचारे भाऊराव ! आपल्यापुढें काय वाढून ठेवलें आहे याची जाणीव त्यांना तरी कशी असणार ?

भाऊराव कोल्हापूरला गेले. ते निटवे यांच्या जैनेंद्र छापखान्यांत जाऊन भेटले. निटव्यांनीं मोठ्या प्रेमानें भाऊरावांचें स्वागत केलें. इकडच्या तिकडच्या गप्पा मारण्यांत दिवस गेला. सायंकाळचें जेवण आटोपलें. जिकडे तिकडे स्थिरस्थावर झालें. अशा शांत वेळीं भाऊराव तरी निद्रासुख घेतल्याशिवाय कसे राहतील ? पण आपणांस कशासाठीं बोलाविलें आहे या विचारानें त्यांना झोप कशी लागणार ? ते त्या विचारांतच गढून गेले. इतक्यांत निटवेहि माडीवर आले. त्यांनीं

बराच वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा मारल्या; घरचें क्षेमकुशल विचारलें; राजकीय परिस्थितीची चर्चा केली; डांबर प्रकरणाबाबत खडा टाकून पाहिला; लठ्ठयांच्या बाबतींत भाऊरावांच्या रोषाचा पारा किती चढला आहे हेंहि अजमावलें आणि शेवटीं इच्छित हेतु साधण्यासाठीं हीच वेळ बरी आहे, असें पाहिल्यावर बेतानेंच त्यांनीं डांबर प्रकरणाला हात घातला.

"या डांबर प्रकरणाशीं लठ्ठयांचा संबंध आहे. पोलीस खात्यानें लठ्ठयांच्या विरुद्ध भरपूर पुरावा गोळा केलेला आहे. महाराजांची पण या बाबतींत खात्री होऊन चुकलेली आहे. आतां फक्त तुझ्याच साक्षीची जरुरी आहे. तूं वसतिगृहांत असतांना लठ्ठयांनीं तुला वाईट रीतीनें वागविलें; तुझा वाटेल तसा छळ केला; आणि शेवटीं तुला वसतिगृहाच्या बाहेर हाकून लाविलें. त्यांनीं तुझ्या आयुष्याची नासाडी केली. या सर्व गोष्टींचा सूड घेण्यासाठीं आम्हीं तुला ही नामी संधी आणून दिलेली आहे. तिचा तूं उपयोग करून घे. तूं साक्ष दिलीस अगर न दिलीस तरी लठ्ठे यांतून बचावत नाहींत. मग तूं तरी आलेली संधी कां दवडतोस? आतां तुला लठ्ठयांची भीति बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं." इत्यादि खोट्यानाट्या गोष्टी सांगून शेवटीं त्यांनीं साक्ष देण्याबद्दल पुन्हां एकदां बजाविलें व विकट हास्य करून मागें ते तक्याला रेलून बसले.

या सर्व गोष्टी ऐकत असतां भाऊरावांचा राग अनावर झाला होता. रागानें त्यांचा चेहरा तांबडा लाल झाला होता. तरीसुद्धां संयम राखून ते निटव्यांना म्हणाले, (अण्णा निटव्यांना सर्व लोक

अण्णाच म्हणत.) “ अण्णा, तुम्हीं मला काय करायला सांगतां ? तुमच्या म्हणण्यावर माझा काडीचाहि विश्वास बसत नाहीं. लठ्ठयांचा अशा कृत्याशीं काडीचाहि संबंध येणें शक्य नाहीं. त्यांच्यावर हें जाणुन बुजून कुभांड रचलें आहे. या तुमच्या कुटील कारस्थानांत सामील होऊन मी लठ्ठयांच्या विरुद्ध साक्ष देऊं? स्वजनद्रोह करूं? गुरूद्रोहाचें पातक मी शिरावर घेऊं ? बोर्डिंगमधून त्यांनीं मला हाकललें म्हणून त्यांचा असा सूड घेऊं? तें कालत्रयीं शक्य नाहीं. तुम्हीं मला व्यर्थ सतावूं नका ! ”

भाऊरावांचे हे संतापजनक उद्गार ऐकून निटवे अगदीं गार झाले. चुकून आपण भलत्याच माणसाजवळ ही गोष्ट काढली, असें त्यांना वाटूं लागलें. रागानेंच ते आपल्या झोपण्याच्या खोलींत गेले. भाऊरावांनींहि बिछान्यावर अंग टाकलें. पण डोक्यांत विचाराचें वादळ उठल्यावर झोंप कशी येणार ? शेवटीं पुढें कोणता प्रकार घडणार आहे, त्यांत लठ्ठे कसे गोवले जाणार आहेत इत्यादि मजकुराचें दुधगांवला कुदळे यांना कसेंबसें पत्र खरडून तें तसल्या रात्रीं त्यांनीं जवळच्याच पोस्टाच्या पेटींत टाकून दिलें व परत येऊन ते अंथरुणावर पडले. पत्र लिहून टाकल्यामुळें आतां त्यांना बरेंच हलकें हलकें वाटूं लागलें, अमळशानें त्यांना झोंपहि लागली.

पहाटेच्या मंगल प्रसंगीं सर्व जग साखरझोपेंत मग्न झालें होतें. अशा शांत वेळीं एकदम “ आग आग ” अशी एकच आरडाओरड कानांवर आली. लोकांची धावपळ सुरू झाली. भाऊरावहि माडीवरून खालीं आले. सर्वांनीं मिळून आग विझविली. नुकसान असें फारसें झालेंच नाहीं. होणार कसें ? तळमजल्यावरील

एका खोलींत निरुपयोगी कागद पडले होते. त्यांना मुद्दाम आग लावण्यांत आली होती !

आग विझवून जिकडे तिकडे स्थिरस्थावर झाल्यावर निटव्यांनीं भाऊरावांना पुन्हां माडीवर नेले व अंमळ दटावणीच्या स्वरांत विचारलें, " काय रे भाऊ पाटील, ही आग कुणी लावली ? आणि माझ्या कोटाच्या खिशांतील पांचशें रुपयांच्या नोटा कुणी घेतल्या ? तुझी मजल इथपर्यंत गेली असेल असें मला वाटलें नव्हतें. आग लावलीस ती लावलीस आणि वर पैसे चोरलेस. आतां काय पळ काढण्याचाच विचार असेल. पण माझ्याशीं गांठ आहे. ध्यानांत ठेव ! आतां तूं माझ्या हातांत पक्का सांपडला आहेस. तरीसुद्धां तूं लठ्ठयांच्या विरुद्ध साक्ष देण्यास तयार असलास तर तुझा हा अपराध मी विसरून जातों. येवढेंच काय पण लागल्यास आणखी पैसे देतों. पहा विचार करायला आतां वेळ नाहीं. मी या प्रकाराची पोलीसांत वर्दी दिलेली आहे. ते लोक आतां येतील. मग तो कावळ्याचा बंगला आणि तेथील तो फर्नांडिससाहेब ! "

आतां या प्रकाराचा उलगडा भाऊरावांना पूर्णपणें झाला. त्यांचें अंग रागानें थरथर कापूं लागले. संतापाच्या भरांत त्यांनीं निटव्यांची चांगलीच हजेरी घेतली आणि शेवटीं निक्षून सांगितलें. " कावळ्याचा बंगलाच काय पण प्रत्यक्ष यमाच्या दरबारांत जरीं मला उभे केलें तरी मी खोटें बोलणार नाहीं. लठ्ठयांनीं मला वसतिगृहांतून उठविलें आणि तुम्ही मला जन्मांतून उठवीत आहांत. पण ध्यानांत ठेवा. तुम्ही काय वाटेल तें केलें तरी हा भाऊ पाटील तुमच्या दमबाजीला भीक घालणार नाहीं. असत्या-

पेक्षां मी प्राणत्याग पत्करीन, पण तुमच्या कारस्थानाला बळी पड-णार नाहीं ! ” असें झणझणीत उत्तर देऊन त्यांनीं तेथेंच बैठक मारली.

थोड्या वेळानें व्हावयाचें तेच झालें. पोलीस आले. रीतसर पंचनामा केला. घराला आग लावणें व चोरी करणें असे दोन वहीम भाऊरावांवर ठेवून त्यांना गिरफदार करण्यांत आलें आणि ते त्यांना कावळ्याच्या बंगल्याकडे घेऊन गेले.

सातारहून कोल्हापूरास मोटारनें गेलों म्हणजे कोल्हापूर शह-रांत शिरण्यापूर्वीं एक जकातनाकें लागतें. तेथून एक रस्ता शह-रांत न जातां परस्परें बाहेरूनच कागलमार्गें बेळगांवास जातो; दुसरा रस्ता बावडेबंगल्याकडे जातो; आणि आपण आलों तो रस्ता सरळ शहरांत शिरतो. या नाक्याच्या जवळपासच हा कावळ्याचा ‘ कुप्रसिद्ध ’ बंगला आहे. अलीकडे शहराचा विस्तार झपाट्यानें होऊं लागल्यामुळें या बाजूलाहि बरीच नवीन वसाहत वसलेली आहे. पण चाळीसपन्नास वर्षांपूर्वीं हा भाग म्हणजे उजाड माळरान. दिवसाहि या बाजूला फिरकणें एकट्या दुकट्या माणसाला धोक्याचें वाटे. जवळच ‘ सदर बाजार ’ म्हणून एक वसाहत आहे. तेथें मांग, मुसलमान व ख्रिस्ती या निरनिराळ्या जमातींची वस्ती आहे. ‘ सदर बाजाराला ’ लागून एक छोटासा कसाईखाना आहे. आणि या गुराढोरांच्या कसाईखान्याला लाज-विणारा मानवी कसाईखाना-कावळ्याचा बंगला-हाहि येथून फारसा दूर नाहीं. ‘ समानशीले व्यसनेषु सख्यम् ’ म्हणतात तें

कांहीं खोटें नाहीं. भाऊरावांना या ‘ निवांत ’ स्थळीं नेण्यांत आलें आणि मग त्यांच्यावर पुढील उपचाराला प्रारंभ झाला.

१८५७ सालानंतर इंग्रज राजवट या देशांत स्थिर झाली, पण त्यापायीं आमच्या शेंकडों देशभक्तांना सुळावर चढावें लागलें. लोकांनीं पुन्हां कधींहि बंडाला प्रवृत्त होऊं नये म्हणून अनेक तरुणांवर पाशवी अत्याचार करण्यांत आले. सत्तावन्नच्या स्वातंत्र्य-समरांत भाग घेतला म्हणून अठरा दक्षिणी वीरांना साता-रच्या गेंड्या माळावर फांशी देण्यांत आलें. आजूबाजूच्या हजारों लोकांना हा भयंकर देखावा पहाण्यासाठीं मुद्दाम जमविलें होतें. हेतु हा कीं, लोकांत यामुळें दहशत निर्माण व्हावी. त्याचा परि-णाम सरकारच्या दृष्टीनें योग्य तोच झाला. नंतर बराच काळ लोकांतील बंडखोर प्रवृत्ति सुप्त झाली होती. पण पृथ्वीच्या पोटांत मूळचीच उष्णता असल्यानें तिच्याजवळ सांठलेल्या पाण्याची वाफ कधींकाळीं व्हायचीच. कोल्हापूरच्या जनतेचेंहि असेंच झालें.

१८८३ च्या सुमारास कोल्हापूरचा छत्रपती चौथा शिवाजी यास वेडा ठरवून इंग्रज सरकारनें त्यास नगरच्या किल्ल्यांत नजरकैदेंत ठेवलें. त्यामुळें कोल्हापूरचीच काय, पण सबंध महाराष्ट्रांतील जनता सरकारविरुद्ध खवळून गेली. हें प्रकरण एवढ्यावरच भागलें नाहीं. नगरच्या किल्ल्यांत छत्रपतींचा त्यांच्यावर देखरेखीसाठीं ठेवलेल्या गोऱ्या अधिकाऱ्यांनीं अमानुष छळ चालविला. तो असह्य होऊन छत्रपतींनीं प्रतिकाराला सुरवात करतांच त्या रानटी गोऱ्या नर-पशूंनीं छत्रपतींना ठार मारलें. अशा प्रकारें २५ डिसेंबर १८८३

ला सुरू होणारा नाताळचा सण नगरच्या गोऱ्या सोजिरांनीं छत्रपतींच्या कंदुरीवर साजरा केला. त्या दुर्दैवी छत्रपतींची समाधी आज मोडक्या तोडक्या स्थितींत नगरच्या मराठा बोर्डिंगपुढें आहे. छत्रपतींचे अभिमानी इकडे लक्ष देतील काय?

यांतूनच पुढें 'टिळक-बर्वे प्रकरण' सुरू झालें. सरकारच्या या अमानुष वर्तनावर 'केसरीनें' सडकून टीका केली व छत्रपतींच्या मृत्यूची चौकशी झाली पाहिजे अशी मागणी केली. त्याचा परिणाम म्हणूनच कीं काय टिळक व आगरकर यांना सरकारनें डोंगरीची हवा खाण्यासाठीं पाठविलें.

यानंतर कोल्हापुरांतील तरुणांच्या गुप्त हालचालींवर नजर ठेवण्यासाठीं ब्रिटिश सरकारनें संस्थानी पोलीसांना जादा अधिकार बहाल केले. आधींच मर्कट तशांतची मद्य प्याला, या न्यायानें संस्थानच्या पोलीस अधिकाऱ्यांनीं या 'जादा अधिकाराच्या' पासपोर्टावर काय काय चाळे केले व किती लोकांना यमपुरीच्या प्रवासास पाठविलें तें एक ईश्वरच जाणे! त्या वेळेपासून या कावळ्याच्या बंगल्याला विशेष प्रसिद्धी मिळाली. मृत्यूपूर्वीचे सर्व उपचार संशयित आरोपीवर याच ठिकाणीं केले जात. तो जगून वाचून परत आलाच तर पुनर्जन्म म्हणावयाचा! पण तें विरळाच! म्हणून कावळ्याचा बंगला म्हटलें कीं, सर्वसाधारण माणूस अर्धमेलाच व्हायचा.

## : ७ : आत्महत्येचा प्रयत्न

हे पोलीसी अत्याचाराचे सर्व प्रयोग भाऊरावांच्यावर करण्यांत आले. अलीकडेच प्रसिद्धीला आलेले 'सुंदरी-भरमाप्पा' प्रयोग हे त्यापुढें फिकेच पडतील. हें सर्व जुलूम भाऊरावांनीं सहन केलें, पण खोटें बोलण्याचें पाप करण्याचें नाकारलें.

शेवटीं त्यांना 'अंडर ट्रायल' चौकशीसाठीं म्हणून बिंदु-चौकाशेजारील रविवार बुरुजाच्या आंत असलेल्या सब जेलमध्यें ठेवलें. मधून मधून कबूल करून घेण्यासाठीं त्यांना कावळ्याचा बंगला दाखविण्यांत येत असे. असेंच एकदां 'तुम्हांस हवी तशी साक्ष मी देतों' असें म्हटल्यावर त्यांना सब–जेलमधून काढून मोठ्या बंदोबस्तांत कावळयाच्या बंगल्यावर आणलें. त्याच दिवशीं मिरज स्टेशनवर लठ्ठयांनाहि पकडलें. या संधीचा पोलीसांनीं फायदा घ्यावयाचें ठरविलें. पण भाऊराव त्यांच्या म्हणण्याला साथ देईनात. मग पुन्हां छळाला सुरवात झाली.

आतां या यमयातना भाऊरावांना सहन होईनात. तशांत तो फर्नांडीससाहेब, "पहा भाऊराव पाटील, आतां उगीच कां आढेवेढे घेतां? लठ्ठयांच्या विरुद्ध साक्ष देऊन मोकळे व्हा ना!" अशी मधून मधून समज देत असे. त्याचें हें बोलणें म्हणजे नवीनच झालेल्या जखमेवर मीठ चोळल्यासारखें भाऊरावांना वाटे.

आतां ' मरण किंवा खोटी साक्ष देणें ' असे दोनच मार्ग त्यांच्यापुढें उभे होते. पैकीं खोटी साक्ष देणें तर या जन्मीं शक्य नाहीं. मग राहिला मरणाचा मार्ग. त्यांनीं मनाशीं निर्धार केला. एके दिवशीं सकाळीं प्रातर्विधीसाठीं त्यांना बाहेर काढल्यावर पोलिसांचा डोळा चुकवून जवळच असलेल्या एका पडक्या विहिरींत त्यांनीं खालीं डोकें करून आपला देह झुगारून दिला. पण त्यांच्या कपाळींच्या यातना संपल्या नव्हत्या. विहिरीच्या तळाशीं थोडेसें पाणी व त्याखालीं बराचसा गाळ सांचलेला असल्यामुळें भाऊराव त्या चिखलांत गणपतीसारखे रुतून बसले. पोलीसांनीं तो देखावा पाहिला. त्यांचें धाबें दणाणलें. कारण पोलीसतपासांत आरोपीचा मृत्यू म्हणजे पोलीसांचें मरण ! म्हणून घाई करून सर्वांनीं मिळून भाऊरावांना वर काढलें. मुका मार बराच लागला होता व थोडें-फार खरचटलेंहि होतें. म्हणून त्यांना सरकारी दवाखान्यांत औषधोपचारासाठीं नेण्यांत आलें. थोड्याच दिवसांत त्यांची प्रकृति बरी झाली. पण ' कावळ्याच्या बंगल्याच्या ' भीतीनें त्यांनीं आजारी-पणाचें सोंग घेतलें. तेव्हां मग पोलीसांनीं दवाखान्यांतच जाबजबाबास सुरवात केली. भाऊराव या ससेमिऱ्यास कंटाळले. पोलीस समोर दिसला कीं, तो त्यांना यमदूतच वाटे. तशांतच उद्यां आपल्याला कावळ्याच्या बंगल्यावर नेणार, ही गुणगुण त्यांच्या कानांवर आली. तेव्हां कावळ्याच्या बंगल्याचें पुन्हां दर्शनच नको म्हणून त्यांनीं पोलीसाना न कळत खिडकीच्या तावदानाची कांच कुटून खाल्ली. पण तिचा कांहींहि परिणाम झाला नाहीं. मग जवळच्याच दिव्यांतील रॉकेल ते प्याले, पण त्यामुळें उलट्या होऊं लागल्या.

त्याबरोबर प्रथम खाल्लेली कांचहि आपोआपच बाहेर आली. विषालासुद्धां भाऊरावांच्या जीवनाला दगाफटका करणें कृतघ्नपणाचें वाटलें असावें ! पण क्षुद्र मानवाला मात्र भाऊरावांच्या जीवाची कांहींच किंमत वाटत नव्हती. ईश्वरानेंहि भाऊरावांना मरूं द्याव-याचें नाहीं, असेंच ठरविल्याचें दिसतें.

इकडे हा प्रकार चालला असतां तिकडे सातारला दुसरेंच प्रकरण शिजत होतें. भाऊराव सातारलाच राहात असत. त्यांच्या राहत्या घराची झडती घेऊन त्यांतून कांहीं तरी आक्षेपार्ह वाङमय बाहेर काढण्याचा घाट घालण्यांत आला. त्यासाठीं एका निष्णात अधिकाऱ्याची नेमणूक करण्यांत आली. त्यांनीं त्या वेळचे सातारा विभागाचे फौजदार श्री. देशमुख यांची गांठ घेऊन त्यांना आपला बेत समजावून सांगितला. देशमुखच काय पण साध्या पोलीस शिपायापासून तहत कलेक्टरपर्यंत छोटेमोठे सर-कारी अधिकारी भाऊरावांचें कार्य चांगल्या रीतीनें जाणून होते. भाऊरावांवर अनपेक्षित आलेलें संकट पाहून सर्वांनाच हळहळ वाटत होती. त्यांपैकींच देशमुख फौजदार हे एक होते. ब्रिटिश पोलीसांच्या मदतीनें भाऊरावांना राजद्रोहाच्या जाळ्यांत अडक-विण्यासाठीं ही संस्थानी पोलीसांची कारवाई आहे, हें त्यानीं जाणलें. पण वरून तसें न दाखवितां औपचारिक साहाय्य कर-ण्याचें त्यांनीं कबूल केलें. तसा विश्वास दाखवून त्यांनीं भाऊरावां-संबधीं तयार केलेला खोटा पुरावा आपल्या ताब्यांत घेतला आणि मग आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. " असा खोटा पुरावा तयार करून एका चांगल्या माणसाला नाहक छळतां काय ? थांबा,

तुम्हांलाच बेड्या ठोकतों. निमकहराम कुठले ! " असा रोखठोक दम मिळाल्यावर त्या गुप्त पोलीस आधिकाऱ्याची गाळणच उडाली. 'भीक नको पण कुत्रा आवर' अशी त्याची स्थिती झाली. देशमुखांच्या हातापायां पडून त्यांनीं कशी तरी आपली सुटका करून घेतली. " आताच्या आतां साताऱ्याची हद्द सोडून चालते व्हा; नाहीं तर मी खटला भरायला कमी करणार नाहीं " असा पुन्हां दम मिळाल्यावर तो गृहस्थ तेथें थांबतो कशाला !

झडतीच्या बनावट प्रकरणांतून भाऊरावांची सहीसलामत सुटका करण्यामध्यें देशमुख फौजदारांनीं जें मनोधैर्य दाखविलें त्याचप्रमाणें किंबहुना अधिक प्रमाणांत साहाय्य अंबूताई या नांवाच्या एका अबलेकडून मिळालें. भाऊराव सातारला ज्या ठिकाणीं राहात त्याच्या शेजारींच या बाईचें घर होतें. भाऊरावांच्या समाजकार्याबद्दल आस्था आणि आदर बाळगणारीं जीं माणसें साताऱ्यांत होतीं त्यांपैकींच या बाई होत. भाऊरावांची समाज-सेवेबद्दलची तळमळ, त्यासाठीं त्यांची रात्रंदिवस चाललेली धड-पड यांकडे सर्वच लोक मोठ्या कुतूहलानें पाहात. त्यांतल्या त्यांत अंबूताई भाऊरावांच्या अगदींच जवळ राहात असल्यामुळें त्यांना भाऊरावांच्या कार्याची ओळख अगदींच जवळून झाली. अर्थातच त्यांना भाऊरावांच्या कार्याबद्दल अत्यंत आदर वाटूं लागला.

भाऊरावांवर आकस्मिक आलेल्या आपत्तीनें इतरांप्रमाणें या बाईनाहि फार वाईट वाटलें. पण यापेक्षां त्यांच्या धैर्याची कसोटी दुसऱ्याच कामांत दिसून आली. वास्तविक भाऊरावांवर राजद्रोहा-सारखा भयंकर आरोप. त्यांचे आप्तेष्टसुद्धां त्यामुळें त्यांच्याशीं

संबंध ठेवायला भीत असत. अशा वेळीं या बाईंना लालूच दाखवून गुप्त पोलीसांनीं भाऊरावांच्या घरांत पिस्तूल किंवा असेंच काहीं स्फोटक पदार्थ सांपडल्याचे त्यांच्याकडून शाबीत करण्याचा प्रयत्न केला. पण आपल्या या कारस्थानांत बाई सामील होत नाहींत, असें पाहिल्यावर त्यांना पोलीसी धाकधपटशा दाखवायलाहि त्यांनीं कमी केलें नाहीं. पण अंबूताईंनीं मोठ्या धैर्यानें व चतुराईनें वागून पोलीसांचे दात त्यांच्याच घशांत घातले व त्यांना त्या घरांतून पळतां भुई थोडी केली. एखादा फाटका चिटोरा अगर भाऊरावांची दुसरी एखादी वस्तूहि त्यांनीं त्यांच्या हातीं लागूं दिली नाहीं. पोलीस आले तसेच परत गेले. अशा प्रकारें पोलीसांनीं केलेली बनवाबनवी अंबूताईंनीं हाणून पाडली आणि त्यांची चांगलीच फटफजिती केली.

वृद्ध झालेल्या अंबुताई आज हयात आहेत. आतांच्या संस्थेंतील मुलांच्या त्या मावशी झालेल्या आहेत. संस्था हेंच त्यांचें घरदार झालेलें आहे. संस्थेला त्यांनीं आपली सर्व इस्टेटहि देऊन टाकलेली आहे. संस्थेतील मुलांचें कमीजास्त पाहणें, भाऊरावांकडे आलेल्या पाहु-ण्यांचा आदरसत्कार करणें व उरला सुरला वेळ ईश्वरचिंतनांत घालविणें यांतच त्यांचा सारा वेळ निघून जातो. लहानमोठीं मुलें त्यांना मावशीबाई याच नांवानें हाका मारतात.

अंबूताईच्या बाबतींत 'हात दाखवून अवलक्षण' पदरीं पड-ल्यावर पोलीसांनीं निराळाच डाव टाकण्याचें ठरविलें. त्यांनीं सातारा जिल्ह्यांतील प्रसिद्ध अशा गणपती मांगाला हाताशीं धरलें. झडतींच्या बाबतींत हाताशीं कांहींच न लागल्यानें ते निराश

झाले होते. पण चोराला सोडून संन्याशाला सुळीं देण्यांत पटाईत असलेले पोलीस असल्या किरकोळ अपयशानें थोडेच नाउमेद होणार आहेत! भाऊरावांविरुद्ध साक्ष देण्यासाठीं त्यांनीं गणपतीला तयार केलें आणि त्याला घेऊन ते कोल्हापुरास गेले.

भाऊराव पाटील ही कोण व्यक्ति आहे याची बरोबर कल्पना गणपतीला न आल्या कारणानें तो भाऊराव पाटलांविरुद्ध साक्ष द्यायला तयार झाला खरा, पण साक्षीसाठीं जेव्हां आरोपीला त्याच्या समोर उभे करण्यांत आलें तेव्हां त्याला एकदम आश्चर्याचा धक्काच बसला. "कोण? पाटील मास्तर?" असे उद्गार अनाहूतपणें त्याच्या तोंडांतून बाहेर पडले. त्याचा कंठ दाटून आला. आपण कुठें आहोंत, इथें कशासाठीं आलों आहोंत, या गोष्टींचें त्याला भानच राहिलें नाहीं. जातीधर्माचा किंवा वेळकाळाचा विचार न करतां महारामांगांच्या मुलांना ज्ञानदान देणारा कनवाळू भाऊ पाटील आपल्यापुढें उभा आहे एवढाच त्याला समज पडला. त्यानें पाटलांचे पाय धरले व तो गहिंवरून रडूं लागला. हा प्रकार पाहून आजूबाजूला बसलेल्या पाषाणहृदयी पोलीसांचे चेहरे फोटो काढण्यासारखे झाले. पण त्यांनीं स्वतःला सावरलें आणि ते म्हणाले, "कायरे गणपती, आम्ही तुला येथें कशासाठीं आणलें? आणि तूं हें चालविलें आहेस काय? बंद कर हें सोंग आणि सांगून टाक खऱ्या गोष्टी." गणपतींतला मांगपणा जागा झाला. त्याचा भावनेचा आवेगहि आतां ओसरला होता. तो ताठ उभा राहिला आणि बेगुमानपणें पोलीसांना म्हणाला, "या पाटील मास्तरांविरुद्ध मी साक्ष देऊं काय? मान तोडली तरी मी असलें

कसाबाचें काम करणार नाहीं !" पोलीस गणपतीला चांगले ओळखीत होते. धाकदपटशाला भिऊन व आमिषाला भाळून तो इतर साक्षीदारांसारखा आपलें बोलणें फिरविण्याइतका लेचापेचा नाहीं याची पोलीसांना चांगली जाणीव होती; म्हणून तेहि अधिक भरीला पडले नाहींत. त्यांनीं गणपतीला सोडून दिलें व भाऊरावांची सब-जेलकडे रवानगी केली.

देशमुखांसारखे नेकीचे पोलीस आधिकारी, गणपतीसारखा निष्ठावान् साक्षीदार आणि अंबूताईसारख्या बाणेदार स्त्रिया अजूनहि जगांत आहेत; म्हणूनच आरोपींना सुंदरी—भरमाप्पाच्या रुक्ष वाळवंटांत आशेची हिरवळ दिसूं लागते व त्यामुळें थोडा वेळ कां होईना ते आपल्या यमयातना विसरून जातात !

## : ८ : सुटका

भाऊरावांना फितुरीच्या जाळ्यांत अडकविण्यासाठीं संस्थानी पोलीसांनीं जे जे डाव टाकले ते ते त्यांच्याच अंगाशीं आले. म्हणून काय पोलीसखातें स्वस्थ बसलें काय ? छे ! आतां त्यांनीं नवी योजना आखली.

पोलीसप्रमुखांनीं भाऊरावांच्या आईची भेट घेतली व "तुम्हांला महाराजांनीं भेटीस बोलाविलें आहे" असें त्यांना सांगितलें. आईना तें खरें वाटलें. महाराजांच्या नांवावर ही पोलीसांची बनवाबनवी चाललेली आहे, हें त्या बिचारीला काय ठाऊक ! त्यांनीं महाराजांची भेट घेण्याचें ठरविलें.

सकाळचीच वेळ होती. महाराज शहरांतून फेरफटका मारून घोड्याच्या गाडींतून सोनतळीवरील बंगल्याकडे चालले होते. गंगाबाईनीं वाटेंतच रथ थांबवून महाराजांची भेट घेतली. आपल्या मुलावर निष्कारण होत असलेल्या अन्यायाची सर्व माहिती त्यांनीं त्यांना सांगितली आणि शेवटीं दाटलेल्या गळ्यानें आपल्या मुलाची सुटका व्हावी, अशी विनंती केली. महाराजांनीं गंगाबाईचें म्हणणें शांतपणें ऐकून घेतलें व एका वकिलाचें नांव सुचवून त्याच्याकडे जावयास सांगितलें. यांतूनहि कांहीं दाद लागली नाहीं तर मला पुन्हां भेटा असेंहि त्यांनीं बजावून सांगितलें.

गंगाबाईंच्या सर्व हालचालींवर पोलीसांची नजर होतीच. त्यांनीं गंगाबाईंच्या अगोदर त्या वकिलाची भेट घेतली व आपली योजना त्याच्या गळीं उतरविली. खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें करण्यांत पटाईत असलेला वकीलच तो. त्याला काय ! दक्षणा मिळाली म्हणजे झालें. मग नवरा मरो अगर नवरी मरो ! या भिक्षुकी मनोवृत्तीच्या त्या वकिलानें गंगाबाईंना भलताच सल्ला दिला. 'बादशहाच्या पुतळ्यास डांबर फांसणें व जैनेंद्र दवाखान्यास आग लावणें हे दोन्हीहि गुन्हे माझा मुलगा भाऊराव यानें अजाणतेपणानें केले आहेत; तरी त्याला एक वेळ माफी मिळावी.' असा अर्ज त्या वकीलानें खरडला व तो महाराजांकडे द्यावयास सांगितलें. " शिवाय तुम्ही आपल्या मुलास साक्ष द्यावयास सांगा, म्हणजे त्याची सुटकाहि होईल व तुम्हांला इनामहि मिळेल. " अशी लालूचहि त्यानें दाखविली. भाऊरावांचीच आई ती ! वकिलाचा बदसल्ला ऐकून त्या संतापानें लाल झाल्या व त्याची चांगली हजेरी घेऊन त्यांनीं आपला मोर्चा महाराजांकडे वळविला.

महाराजांचा रथ रस्त्यानें चालला असतां गंगाबाईंनीं तो कालच्या ठिकाणींच अडविला. वकिलानें दिलेला सल्ला, पोलीसांनीं दाखविलेलीं आमिषें व मुलाचा होत असलेला छळ या सर्व गोष्टींना पाढा त्यांनीं महाराजांपुढें वाचला. महाराजहि थोडे विचारांत पडले. कारण हा गुन्हा पडला राजकीय. त्याचीं सर्व सूत्रें संस्थानी पोलीटिकल एजंटामार्फत हलत. त्यांत संस्थानिकालाहि ढवळाढवळ करतां येणें कठीण. पण या गोष्टी या म्हातारीला कशा सांगायच्या ? थोडा वेळ विचार करून ते

म्हणाले, " बाई तूं जा. मी सगळी व्यवस्था करतों. " पण एव-ढ्यानें गंगाबाईचें समाधान झालें नाहीं. आईचें हृदय तें. मुलाच्या सुटकेसाठीं अगदीं अधीर झालेलें. मग तिला कसा धीर धरवणार ! आतां तिच्या हृदयानें कठोरपणा स्वीकारला आणि मागचा पुढचा कांहीं विचार न करतां ती आवेगानें बोलूं लागली. " महाराज, दाद मिळण्याची शेवटची आशा संपली. पोलीसांनीं आणि मधल्या लबाड लोकांनीं माझ्या मुलाचा वाटेल तसा छळ चालविला आहे. वाटेल तीं आमिषें दाखवून त्यांनीं आम्हांला अगदीं हैराण केलें आहे. मला इनाम फिनाम कांहीं नको. फक्त मुलगा पाहिजे. आणि तो पोलीसांनीं सांगितल्याप्रमाणें खोटी साक्ष देऊन जर मिळणार असेल तर तो सत्यासाठीं सुळावर चढ-लेला पहाण्यांतच मला आनंद वाटेल. मला चार मुलगे आहेत. त्यांतला एक मेला असेंच मी समजेन. पण सुटकेसाठीं त्याला खोटी साक्ष द्यायला मी कधींहि सांगणार नाहीं." असें सडेतोड व बाणेदार उत्तर देऊन ती तडक चालती झाली. महाराजांच्या रागालोभाची आतां तिला पर्वा नव्हती.

केवढा हा बाणेदारपणा ! केवढी सत्यनिष्ठा ! शाबास गंगा-बाई ! तुमच्यासारखीं स्त्रीजातीला ललामभूत होणारीं रत्नें समा-जांत निर्माण होतात, म्हणूनच पृथ्वी चालली आहे. तुम्ही मेवा-डची महामाता पन्ना, शिवछत्रपतींच्या मातोश्री जिजाबाई यांची परंपरा जिवंत ठेवली. धन्य ती माता कीं, जिचा हा बाणेदार-पणा व धन्य तो पुत्र कीं ज्याची अशी अढळ सत्यनिष्ठा ! अशा करारी आणि सत्यनिष्ठ आईबापांच्या पोटीं भाऊरावांचा जन्म

झाला, म्हणूच त्यांना अन्यायाची चीड असल्याचें आपणांस दिसून येईल. गंगाबाईचा बाणेदारपणा पाहून महाराजहि थक्क झाले. त्यांनीं निटव्यांना बोलाविलें व त्यांची कानउघाडणी केली, तेव्हां सारा खरा प्रकार त्यांना कळून चुकला. नंतर खरा वृत्तांत त्यांनीं रेसिडेंटच्या कानावर घातला. प्रत्यक्ष भाऊरावांनाहि तुरुं-गांतून बोलावून घेऊन त्यांनीं सर्व प्रकार समजावून घेतला. नंतर पुढें भाऊरावांची लौकरच सुटका झाली व त्यांच्यावरील आरोप धुवून निघाला.

आतां मात्र पोलीसखात्यानें हात टेकले. त्यांच्या हस्तकांचीहि निराशा झाली. वड्याचें तेल वांग्यावर काढण्याच्या उद्देशानें त्यांनीं भाऊराव आत्महत्येला प्रवृत्त झाले म्हणून खटला भरला. न्यायाधिशानें आपली कामगिरी बजाविली; चार महिन्यांची साधी सजा फर्मा-विली; व सबजेलमध्यें कोल्हापूरच्या बॉंबकटांतील प्रसिद्ध आरोपी श्री. दामू जोशी यांच्या खोलींत भाऊरावांना ठेवून टाकलें. अशा प्रकारें पोलीसांच्या चौकशीच्या नाटकाचा पडदा या ठिकाणीं पडला. पुढें श्री. पायगौंडांनीं यावर अपील केलें. लठ्ठयांनींहि आपली कैफीयत रेसिडेंटपुढें मांडली व भाऊरावांच्या इष्टमित्रांनींहि—विशेषतः भाऊसाहेब कुदळे प्रभृतींनीं—खूप धावपळ केली. तेव्हां भाऊराव अपीलांत निर्दोषी सुटले. पण तुरुंगाच्या बाहेर पडतांच पोलीसांनीं भाऊरावांना हटकलें व, “ डांबर प्रकरणाचा निकाल लागेपर्यंत तुम्हांला सोडतां येत नाहीं. तरी तुम्ही आतांच्या आतां कावळ्यांच्या बंगल्यावर चला ” असा तगादा लावला. भाऊरावांनीं हा पोलीसांचा डाव ओळखला. तुरुंगांतून सुटतांना त्यांचे शेजारी

दामू जोशी यांची ' सुटका होतांच ताबडतोब कोल्हापूरची हद्द सोडा ' असा दिलेला सल्लाहि त्यांना आठवला. त्यांनीं पोलीसांना चकवायचें ठरविलें. बरोबर आई आणि वडिलहि होते. त्यांच्याशीं बोलत बोलत व मधून अधून पोलीसांशीं गप्पा मारीत त्यांनीं स्टेशनच्या बाजूनेंच कावळ्याच्या बंगल्यावर जाण्याचा मार्ग स्वीकारला. ते रेल्वे हद्दींत शिरले. स्टेशन आलें. संस्थानी हद्दीचा संबंध सुटला. मग त्यांनीं आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. "काय रे ? कशाला बोलाविलें आहे फर्नांडीससाहेबानें ? वारंट आहे काय ? " असा त्यांनीं सवाल टाकला. पोलीस गार झाले. पण स्वस्थ बसले तर ते पोलीस कसले ? भाऊरावांना पकडण्यासाठीं ते धावले. पण " खबरदार माझ्या अंगाला हात लावशील तर !" असा उलट दम देऊन भाऊरावांनीं आईवडिलांना पुढें ढकलले व चालत्या गाडीला पाय देऊन कोल्हापूरला रामराम ठोकला. पोलीस आणि त्यांचा फर्नांडीससाहेब हात चोळीत जागच्या जागींच राहिले.

डांबर प्रकरणांतून सहीसलामत बाहेर पडल्यावर भाऊराव सातारला आले. त्यांना पाहतांच घरच्या मंडळींना आश्चर्याचा धक्काच बसला; आणि त्यापाठोपाठ हुंदक्यांना सुरवात झाली. कारण पोलीस कस्टडींतील दारूण हालअपेष्टांमुळें भाऊरावांचें रूप पार बदलून गेलें होतें. भीमासारख्या वज्रप्राय शरीराचे भाऊराव सुदामा बनले होते. चेहऱ्यावरील ऐन तारुण्यांतील गुलाबी छटा कुठच्या कुठें दडी मारून बसल्या होत्या. भरदार छाती, पिळदार शरीर व टवटवीत चेहरा हें सर्व जाऊन कृश, निस्तेज व काळी कुळकुळीत काया एवढेंच काय तें शिल्लक होतें. पोलीसी यमयातनांनीं मूळच्या

भाऊरावांचा बळी घेऊन आपल्या समोर उभें असलेलें भाऊरावांचें भूत आहे कीं काय असें प्रथमदर्शनी पाहतांच कुणालाहि वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. मग घरचीं माणसें तरी या गोष्टीला अपवाद कशीं असणार ! भाऊरावांची अशी दशा झालेली पाहून सर्व मंडळी ओक्साबोक्सी रडूं लागली. पण कसें कां असेना, आपला माणूस पुन्हां आपल्याला भेटला ही भावना घरच्या मंडळींच्या अंतःकरणांत हळूहळू प्रबळ होऊं लागल्यामुळें थोड्याच वेळांत दुःखाची जागा आनंदाश्रूंनीं पटकाविली व सर्व घरांत आनंदी-आनंद पसरला.

हा आनंद प्राप्त होण्यासाठीं भाऊरावांना केवढ्या दिव्यांतून जावें लागलें याची जरी आठवण झाली तरी अंगावर कांटा उभा राहतो. त्यांच्या वयानें नुकताच कुठें पंचविशीचा टप्पा ओलांडला होता. ऐन तारुण्याचा काळ. जीवनांतील विविध प्रकारच्या गंमतीजमतींचा आस्वाद घेण्याचा हा समय. पण अचानकपणेंच त्यांना अशा वेळीं खडतर देहदंड व मानसिक क्लेश भोगावे लागले. इतक्या हालअपेष्टांनंतर माणूस सार्वजनिक सेवेकडे दुर्लक्ष करतो. याचे दाखले आपल्याला कॉंग्रेसच्या निरनिराळ्या लढ्यांत पहावयास मिळतील. कॉंग्रेसनें पुकारलेल्या १९२०-२१ च्या असहकाराच्या लढ्यांत आघाडीवर असलेले तरुण १९३०-३१ च्या कायदेभंगांत दिसले नाहींत व १९३०-३१ च्या लढ्यांतील लोक सन १९४२ च्या क्रांतांत दिसले नाहींत. हें विधान सर्वसाधारण कार्यकर्त्यांस लागू आहे. पुढारीवर्ग कायम असतोच. त्याशिवाय चळवळ जिवंत कशी राहणार ? पण चळवळ ज्या असंख्य

तरुणांच्या सहाय्यानें चालविली जाते त्या कोवळ्या, अननुभवी पण उमद्या तरुणांना जर पोलीसांचा जुलूम, तुरुंगांतील कटू अनुभव आणि सांसारिक अडचणी या दिव्यांतून जावें लागलें तर अर्धेअधिक तरुण पुढील लढ्याच्या वेळीं टिकाव धरीत नाहींत. त्यांचा जोम नाहींसा होतो. मग ते संसाराच्या धोपट मार्गाला लागतात. त्यांच्या मनांतील देशाभिमान व कर्तव्यनिष्ठा हीं त्यांना मधून मधून जागे करण्याचा प्रयत्न करतात; पण मागील अनुभवांना आठवून पुन्हां म्हणून सार्वजनिक कामांत पडण्याचें ते बुद्धिपुरःसरच टाळतात.

परंतु एखादा निधड्या छातीचा तरुण या सर्व गोष्टी घडल्याच नाहींत असें समजून ‘ कीं तोडितां तरु फुटे आणखी भरानें ’ या न्यायानें सार्वजनिक कार्याला अधिक जोमानें व पायाशुद्ध रीतीनें सुरवात करतो. पण अशीं माणसें फारच क्वचित आढळतात. त्यांपैकींच भाऊराव पाटील हे एक होत.

# : १ : पहिला साम्यवादी

भाऊराव सर्वांत वडील चिरंजीव. वडिलांचा सांसारिक भार आपल्या कर्तबगारीनें हळूहळू हलका करून शेवटीं तो आपल्याच शिरावर घ्यावयाचा, हेंच जनरीतीप्रमाणें वडील चिरंजिवाचें काम. भाऊरावहि यांस अपवाद ठरले नाहींत. एकदोन ठिकाणीं त्यांनीं नौकरी करण्याचा प्रयत्न केला; थोडेंफार धंद्यांतहि लक्ष घातलें; आणि त्यांतून मिळणाऱ्या अल्पशा प्राप्तीनें वडिलांच्या प्रपंचास थोडाफार हातभार लावला. पण नौकरी अगर धंदा आपल्या ध्येयाच्या व स्वाभीमानाच्या आड येतो आहे, असें पाहिल्यावर त्यांनीं ते पाश तोडून टाकले आणि आपलें संपूर्ण लक्ष सार्वजनिक सेवेकडे वळविलें. एकट्या दुकट्याचा संसार करण्यापेक्षां आपल्या हजारों भाईबांधवांचे विस्कटलेले संसार सावरण्याचें त्यांनीं ठरविलें.

भाऊरावांचें बालपण बागडण्यांत गेलें; विद्यार्थीदशा हूडपणांत गेली; आणि तारुण्याचा प्रभातकाळ सरकारी अवकृपेच्या जुलूम-जबरदस्तीनें कोमेजून गेला, त्यामुळें शिक्षणांत प्रगति नाहीं, धंद्यांत जम नाहीं व कलेची ओळख नाहीं, अशा प्रकारची भाऊ-रावांची त्रिशंकूसारखी स्थिति झाली. नौकरी पहावी तर शिक्षण नाहीं. धंदा करावा तर मार्गदर्शन नाहीं. अशा अडचणींतून भाऊरावानीं आपली जीवननौका सार्वजनिक सेवेच्या महासागरा-

कडे वळविली. भाऊरावांच्या जीवनाचा पूर्वार्ध येथेंच संपला, असें म्हणावयास हरकत नाहीं. यानंतरचें भाऊरावांचें जीवन म्हणजे महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या विशेषत: दलितवर्गियांच्या जागृतीचा गेल्या पाव शतकाचा चालता बोलता इतिहासच आहे, असेंच म्हणावयास पाहिजे. या कामीं होणारा छळ आणि अपमान यांची त्यांना कल्पना नाहीं म्हणावें तर म. फुले व म. शिंदे यांचीं चरित्रें त्यांच्या डोळ्यांसमोर होतीं. असें असतांनाहि जाणून बुजून त्यांनीं याच खडतर मार्गानें जावयाचें ठरविलें.

कोल्हापूर प्रकरणांतून सुटका झाल्यावर भाऊराव साताऱ्यास आले, हें मागें आलेंच आहे. त्या वेळीं त्यांचे वडील विट्यास होते. त्यांना भेटण्यासाठीं ते विट्यास निघाले असतां वाटेंत किर्लोस्करवाडीवर श्री० आत्मारामपंत ओगले यांची अचानक भेट झाली. ओगले हे भाऊरावांचे बाळपणचे स्नेही. दोघांचेंहि प्राथमिक व दुय्यम शिक्षण बरोबरच झालेलें. ओघानेंच सुखदु:खाबरोबर ध्येयधोरणाविषयींहि गोष्टी निघाल्या. शेवटीं, "मालाचा उठाव करण्याचें काम तुम्ही आपल्या शिरावर घेणार असाल तर आपण स्वतंत्र कांच-कारखाना काढूं" अशी बऱ्याच दिवसांपासून मनांत घोळणारी योजना ओगल्यांनीं भाऊरावांपुढें ठेवली. भाऊरावांनीं पण ताबडतोब होकार दिला. ओगल्यांनीं कऱ्हाडजवळ आपल्या कांचकारखान्याची मुहूर्तमेढ रोवली. थोड्याच दिवसांत निरनिराळ्या प्रकारचा माल बाहेर पडूं लागला. भाऊरावांनीं धूमधडाक्यानें प्रचार केला आणि बाजारांत परदेशच्या सुबक, स्वस्त व टिकाऊ मिळणाऱ्या मालाला धूळ खायला लावून देशी मालाचा लाखों

रुपयांचा खप केला. अशा प्रकारें लहानपणच्या आपल्या स्नेह्यास हाताशीं धरून भाऊरावांनीं त्याचा कारखाना नांवारूपास आणला. "आमच्या कारखान्यास आजचे वैभवाचे दिवस प्राप्त होण्यास भाऊरावांचें विशेष साहाय्य झालें आहे" असें आजहि ओगलेबंधू प्रांजलपणानें कबूल करतात.

यानंतर भाऊरावांवर किर्लोस्करांचें लक्ष गेलें. किर्लोस्कर कारखान्याचे चालक श्री. लक्ष्मणराव किर्लोस्कर यांनीं भाऊरावांची आपल्या कारखान्याचे प्रमुख विक्रेते म्हणून नेमणूक केली. अंगावर घेतलेलें काम मनापासून झटून करावयाचें, हा भाऊरावांचा खाक्या. त्यामुळें थोड्याच दिवसांत किर्लोस्कर नांगर खेड्यापाड्यापर्यंत पोंचला. मालाचा उठाव फार मोठ्या प्रमाणांत झाला, म्हणून किर्लोस्कर नांगराचे पाय-फाळ-जमिनीला लागले. पुढें कारखाना लिमिटेड झाला. त्या वेळीं किर्लोस्करांनीं मॅनेजिंग एजंटस्मध्यें आपल्याच नातलगांचा भरणा केला; मजुरांच्या हिताकडे दुर्लक्ष केलें; आणि केवळ नफेबाजी हेंच धोरण आंखलें. मग मजुरांच्या वतीनें भांडणाऱ्या भाऊरावांचें त्यांच्याशीं कसें जमणार? थोड्याच दिवसांत त्यांनीं ( १९२१ ) आपल्या 'सेल्स ऑर्गेनायझरशिपचा' राजिनामा दिला.

भाऊरावांनीं किर्लोस्कर कारखान्याचा जरी संबंध सोडला तरी कारखान्याचें वेड त्यांच्या डोक्यांतून गेलें नाहीं. मालक आणि मजूर या भेदभावामुळें मजुरांच्या हिताकडे जाणून बुजून जें दुर्लक्ष होई तें त्यांना मान्य नसे. म्हणून हा भेदभाव नाहींसा

करून मजूर हेच कारखान्याचे खरेखुरे मालक होतील तरच संप, मारामाऱ्या आणि दंगेधोपे थांबतील असें त्यांचें मत असे. त्या दृष्टीनें त्यांनीं लक्ष्मणराव किर्लोस्करांपुढें आपले विचारहि मांडले होते. "कारखान्यांत मिळणाऱ्या अपुऱ्या वेतनावर मजूर असंतुष्ट आहे. म्हणून त्याची पगारवाढ करावी. थोड्याफार प्रमाणांत कारखान्यांत मजुरांचा हिस्साहि असावा म्हणजे कारखान्याला स्थैर्य येईल, मालाचें उत्पादन वाढेल आणि मजूर पिळला जाणार नाहीं. निदान तोपर्यंत मजुरांच्या मुलांची शिक्षणाची सोय तरी करा." अशी चर्चा त्यांनीं किर्लोस्करांशीं केली. पण मजुरांच्या रक्तशोषणावरच कारखानदारीचें आयुष्य वाढत असल्यामुळें भाऊ-रावांचे विचार किर्लोस्करांना पसंत पडले नाहींत. पंचवीस वर्षां-पूर्वीं भाऊरावांनीं कारखानदारापुढें ठेवलेले हे विचार आमच्या देशांतील उद्योगपति जर आत्मसात करूं शकले असते तर आतां-पर्यंत झालेले देशव्यापी संप टळले असते, उत्पादन घटलें नसतें व आज भासणारी कापडाची टंचाई भासली नसती. जगाचा नकाशा बदलत आहे. श्रमजीवी जनता एक होत आहे.अशा वेळीं काळाची पावलें ओळखून अजून तरी आमचे कारखानदार व गिरणीवाले सावध होतील काय? साम्यवादाचा काथ्याकूट करणाऱ्या मंडळींनींहि भाऊरावांचा सनदशीर आणि वर्गजागृतीचा कार्यक्रम आपलासा केला तर साम्यवादाच्या नांवावर हल्लीं निरनिराळ्या पक्षांचा मजूरांच्या जीवनाशीं जो खेळ चालला आहे तो थांबेल आणि मजुरांची खरी शक्ति एकवटेल.

याच इच्छेला मूर्त स्वरूप देण्यासाठीं भाऊरावांनीं एक नमुने-

दार कारखाना काढण्याचें ठरविलें. त्यासाठीं साताऱ्च्या ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादांत गाजलेले व १९३६ ला कांहीं काळ मुंबई राज्याचे पंतप्रधान असलेले कै. सर डी. बी. कूपर यांना बरोबर घेऊन साताररोड येथें त्यांनीं एक लोखंडी नांगरांचा कारखाना काढला.

या वेळेपावेतों किर्लोस्कर नांगरानें आपले हातपाय खेडोपाडीं पसरले होते. याला कारणीभूत भाऊरावच होते. असें असतांनाहि या नांगराला तोडीस तोड म्हणून त्यांनीं कूपरच्या कारखान्यांतून 'बहादूर नागर नंबर १' हा काढला व खेडोपाडीं हिंडून याचेंहि बस्तान चांगलेंच बसविलें. इतकें कीं, किर्लोस्करांना आपल्या नांगराची किंमत ६३ रुपयांवरून ३३ रुपयांवर आणावी लागली. इतर सामानांच्या किंमतीहि त्यांना अशाच खालीं आणाव्या लागल्या. यामुळें शेतकऱ्यांचा चांगलाच फायदा झाला व मजुरांनाहि बरीच मजुरी मिळूं लागली. पण त्यांचा हेतु अद्याप पूर्ण झाला नाहीं.

"मजुरांच्या मुलाना कारखान्यांत कांहीं काळ काम द्यावें. त्यासाठीं मिळणाऱ्या मजुरींत त्याचा अन्नखर्च भागवावा व कारखान्यांत मिळणाऱ्या नफ्याचा फार थोडा भाग मुलांच्या शिक्षणासाठीं खर्च करावा. म्हणजे मुलांचा अन्नप्रश्नहि सुटेल आणि शिक्षणाचीहि सोय होईल" अशी योजना कारखाना सुरू करण्यापूर्वींच भाऊरावांनीं सर कूपर यांना बोलून दाखविली होती. कारखान्याचा चांगला जम बसेपर्यंत सर कूपर यांनीं आपला विरोध प्रगट स्वरूपात भाऊरावांना दिसूं दिला नाहीं. पण वाघाचीं नखें झाकून किती दिवस राहणार! आपल्या भक्ष्यावर दुसरें

सावज झडप घालीत आहे, हें पाहिल्यावर त्यांनीं भाऊरावांना विरोध केला. अमर्याद रक्तशोषणाची चटक लागलेली भांडवलशाही आपल्या वळणावर गेली. हें पाहून त्यांनीं याहि कारखान्याचा संबंध तोडून टाकला. भाऊरावांच्यामुळें बिचाऱ्या मजुरांच्या जीवनांत चांगलाच आनंद निर्माण झाला होता. त्यामुळें कारखाना सोडून जातांना दोघांनाहि फार दुःख झालें. जातांना मजुरांच्या हितासाठीं आपण कांहीं तरी करावयाचेंच, असें त्यांनीं ठरविलें. पोटासाठीं तात्पुरता उठाव करावयास लावण्यापेक्षां हक्कासाठीं झगडण्यासाठीं मजूर स्वतःच तयार झाला पाहिजे, असें त्यांनीं निरोप घेतेवेळीं बोलून दाखविलें.

मजुरांच्या हितासाठीं दुसऱ्यांनीं भांडण्यापेक्षां मजूर किंवा त्यांचीं मुलें शिकून शहाणीं झालीं तर तीं आपल्या ज्ञानाच्या व संघशक्तीच्या बळावर 'राबणाऱ्यांचा कारखाना' हा आवाज कारखानदाराच्या कानांपर्यंत पोंचवितील आणि मजुरांची होत असलेली पिळवणूक थांबवून श्रमणाऱ्यांचें नवें जग निर्माण होईल, असा विश्वास त्यांना वाटला. म्हणून त्यांनीं यांपैकीं कांहीं मुलांना बरोबर घेऊन आपल्या कार्याला सुरवात केली.

रोग पोटांत झाला असतां वर वर मलमपट्या न लावतां त्याचें योग्य तें निदान करून त्यावर अचूक लागू पडणारें असें एखादें रामबाण औषध दिलें तरच रोगाचें समूळ उच्चाटन होतें, हें जसें शहाण्या डॉक्टरास समजतें तसेंच जनतारूपी रोग्याची अज्ञान व दारिद्र्याच्या महारोगांतून शिक्षणाची दिव्यौषधीच कायमची सुटका करील हें या धन्वंतऱ्यानें ताडलें व त्या दिशेनें प्रयत्नास प्रारंभ केला.

इंग्रजांनीं हिंदुस्थान गिळंकृत केल्यावर प्रथम प्रथम आम्ही तुमचे हितकर्ते आहोंत, असा आभास हिंदी जनतेसमोर निर्माण केला. पण थोड्याच दिवसांत या गोगलगाईचे पोटांतील पाय दिसूं लागले. तेव्हां त्यांच्या विरुद्ध उठाव करण्याचे अयशस्वी प्रयत्न कांहीं तरुण मंडळी करूं लागली. यांपैकींच ' वासुदेव बळवंताचें बंड ' होय. सशस्त्र बंडाचा झेंडा उभारून इंग्रजी राजवट आपण धुळीला मिळवूं, असें वासुदेव बळवंतास फार वाटे. त्याच्या बरोबर लहुजी मांग या गृहस्थाकडे जोतिबा फुल्यांचें लष्करी शिक्षण झालें होतें. त्यांनाहि आरंभीं फडक्यांचा मार्ग योग्य वाटला व त्या दिशेनें त्यांनीं प्रयत्नास सुरवात केली. पण पुढें त्यांना कळून चुकलें कीं, ज्यांच्या सहाय्यानें ही योजना आपण पार पाडणार ती जनता भोळी, भाबडी, अज्ञानी व दरिद्री आहे. तिला अगोदर जागें केलें पाहिजे तरच आपणांस यश मिळेल. असा विचार करून त्यांनीं जनता-जागृतीचें कार्य प्रथम हातीं घेतलें. भाऊरावांनींहि हा फुल्यांचा मार्ग स्वीकारला. श्रीमंत आणि बड्या लोकांच्या सहाय्यानें हा शिक्षणाचा प्रश्न आपण सोडवूं, असें त्यांना प्रथम वाटत होतें. पण त्या बाजूनें निराशाच पदरीं पडली. सभासंम्मेलनानेंहि हा प्रश्न सुटणार नाहीं, अशी त्यांची खात्री झाली. म्हणून आरंभीं सत्यशोधक चळवळींत व पुढें कॉंग्रेसच्या लढ्यांत जरी त्यांनीं हिरीरीनें भाग घेतला तरी हे उपचार वरवरचे आहेत असें समजून आल्यावर त्यांनीं ' रयत सेवा ' म्हणजेच ' जनता शिक्षण ' हेंच आपलें ध्येय ठरविलें व त्या दिशेनें कार्यास प्रारंभ केला.

## : १० : सत्यशोधक समाज व ब्राह्मणेतर चळवळ

आपल्या देशांत शेंकडा ८५ टक्के लोक निरक्षर व निर्धन आहेत. १५ टक्क्यांपैकीं १० टक्के पुढारलेल्या वर्गांतील असून अवघे ५ टक्के साक्षर बहुजनसमाजांतील आहेत. त्यामुळें संपत्ति आणि सरस्वती यांचा संचय एकाच वर्गाजवळ आहे. हा वर्ग संख्येनें जरी अल्प असला तरी सरस्वती व संपत्ति यांच्या सहाय्यानें तो बहुजनसमाजावरील राजकीय, सामाजिक, आर्थिक व धार्मिक प्रभुत्व कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत आला आहे. 'आम जनता अडाणी आणि दरिद्री राहिली तरच हिंदुस्थान आपल्या कबजांत राहील.' असें इंग्रजांना वाटत असे. तसेंच आपलेंहि सामाजिक व धार्मिक प्रभुत्व कायम राहावें असें या पुढारलेल्या वर्गाला वाटतें. हिंदुस्थानांतच तेवढी अशी परिस्थिती आहे असें नव्हें, तर एके काळीं सरंजामदारी आणि पोपशाही यांच्या जाळ्यांत सांपडलेल्या युरोपांतहि तीच स्थिति होती. मूठभर लोकांनीं आपलें जीवन सुखी व समृद्ध ठेवावें, त्यासाठीं असंख्य अशा बहुजनसमाजाची रात्रंदिवस पिळवणूक करावी व कायदा, धर्म आणि देव यांच्या कात्रींत त्यांना ठेवून राजरोसपणें त्यांच्या संपत्तीची व संततीची धूळधाण करावी. मनुष्य म्हणून जगण्याचा हक्क फक्त आपलाच आहे. त्यासाठीं लागणाऱ्या गरजा भागविण्या-साठींच बहुसंख्य समाज देवानें निर्माण केला आहे, अशा तोऱ्यांत

वागून हा ऐतखाऊ वर्ग गेलीं कित्येक शतकें समाजाचें रक्तशोषण करीत आला आहे. हें पाहून पाश्चिमात्य राष्ट्रांतील महान् विचारवंतांनीं बहुजनसमाजाची या दास्यांतून मुक्तता करण्यासाठीं सत्ताधारी आणि धर्माधिकारी यांच्या विरुद्ध बंड पुकारलें. अरिस्टॉटल, हेगेल, साक्रेटीस, कॉट इत्यादि विचारवंतांनीं समाजापुढें नवीन व पुरोगामी दृष्टिकोन ठेवला. मार्टीन ल्यूथरनें तर उघड उघड बंड पुकारून पोपशाही धुळीला मिळविली. पण सरंजामदाराची मगरमिठी कांहीं केल्या सुटेना. तेव्हां व्हॉल्टेअर, रूसो या तत्वज्ञान्यांनीं मानवी समतेची नवी विचारधारा निर्माण करून फ्रान्समध्यें सशस्त्र ( रक्तरंजित ) क्रांति घडवून आणली. सरदार, दरकदार आणि मानकरी यांना पळतां भुई थोडी झाली. १७८९ च्या फ्रान्सच्या राज्यक्रांतीनें जगांतील सत्ताधाऱ्यांचे डोळे खाडकन उघडले. त्यांनीं आपला पवित्रा बदलला. मध्यमवर्गीय पांढरपेशे व बहुजनसमाजांतील घरभेदे यांना संपत्तीच्या बळावर वश करून भांडवलशाहीच्या रूपांत त्यांनीं आपला नवीन प्रपंच थाटला. पण नांवाच्या पाटींत बदल केला तरी आंत कलालाची दारूविक्री ही चालायचीच. त्याप्रमाणें या वर्गानें लोकशाहीचा बुरखा पांघरून आपली सत्ता बहुजनसमाजावर पुन्हां प्रस्थापित केली. पण हें कळायला कांहीं फार काळ थांबावें लागलें नाहीं. मार्क्स् एँगेल्ससारखे संपूर्ण साम्यवादी महापुरुष जन्माला आले. त्यांनीं या वर्गाचीं बिंगें चव्हाट्यावर मांडलीं. कुठल्याहि राष्ट्राचा आणि कोणत्याहि धर्माचा माणूस असला तरी त्याला राहावयास आसरा व खावयास रोटी मिळालीच पाहिजे. शिक्षण आणि सुधारणांत सर्वांना अंगभर वस्त्र

व पोटभर अन्न हें मिळालेंच पाहिजे. सर्वांना समान संधी दिलीच पाहिजे. इतकेंच नव्हें, तर खालच्या पिळल्या गेलेल्या समाजास अधिक सवलती दिल्या गेल्या पाहिजेत, हें नवें तत्त्वज्ञान त्यांनीं प्रसृत केलें. १९१७ ची रशियन क्रांति हा या तत्त्वज्ञानाचा परिपाक होय.

पाश्चात्य राष्ट्रांत विचारांची प्रगति इतकी झपाट्यानें चालली असतां आमच्या देशांतहि तिचे पडसाद उमटल्याशिवाय कसे राहतील! किंबहुना त्याअगोदर बुद्धकालांतहि आम्ही नवे विचार आत्मसात करूं शकलों होतों. पण धर्मवेडेपणा आणि अवतारवादाच्या अफूनें आम्ही चांगलेच गुंगलों असल्यानें सत्ताधारी आणि धर्मवाले पुन्हां एकत्रित होऊन आमच्यावर हल्ला करीत आहेत, हें फार काळपर्यंत आम्हांस समजलेंच नाहीं. आम्ही त्यांच्या जाळ्यांत पुरे गुरफटलों गेलों. पण आधुनिक सुधारणांनीं राष्ट्राराष्ट्रांतील अंतर इतकें जवळ आणलें आहे कीं, उशीरां का होईना, पण आम्ही जागे झालों. बंगालमध्यें राजा राममोहनरॉय, रामकृष्ण परमहंस, पंजाबमध्यें दयानंद सरस्वती, मद्रासकडे कर्नल अल्काट, डॉ. ॲनी बेझंट व महाराष्ट्रांत ज्योतिबा फुले यांनीं निरनिराळ्या मार्गांनीं दुर्बल व अज्ञ लोकांवर बुद्धिजीवी व सबळ लोकांचा जो पगडा बसला आहे तो झुगारून देण्यासाठीं सुधारणेचें रणशिंग फुंकलें. महाराष्ट्रांतील खडकाळ जमिनींत हें सुधारणेचें पीक चांगलेंच रुजलें. यासाठीं महात्मा ज्योतीराव फुल्यांनीं १८७३ सालीं सत्यशोधक समाजाची स्थापना केली व जवळजवळ अर्ध शतक झगडून पददलित असलेल्या बहुसंख्य समाजांत आपल्या वाणीनें व कृतीनें जागृति केली; त्यांच्यांतून शेंकडों कार्यकर्ते तयार केले; व त्यांच्या

सहाय्यानें अनंत काळापासून चालत आलेली धार्मिक आणि सामाजिक गुलामगिरी झुगारून दिली. १८९० सालीं या पदद-लितांच्या कैवाऱ्याची—महाराष्ट्राच्या मार्टिन ल्यूथरची—जीवनज्योत मालवली. पण त्यानें पेटवलेली ज्ञानज्योत अखंड तेवत राहिली. १८९४ सालीं कोल्हापूरच्या गादीवर शाहू छत्रपतींची स्थापना झाली. कारभार हातीं घेतांच त्यांनीं जनतेच्या सर्वांगीण सुधारणे-कडे लक्ष पुरविलें. ओघानेंच फुल्यांच्या समाजसुधारणेकडे ते आकर्षिले गेले.

भगवान बुद्धाच्या महानिर्वाणानंतर सम्राट अशोकानें बुद्ध धर्म-दीप चारी खंडांत फिरविला. त्याचप्रमाणें शाहू छत्रपतींनीं फुले-प्रणित सत्यधर्मपताका आपल्या शेंकडों अनुयायांकरवीं सबंध दक्षिण व मध्य हिंदुस्थानभर फिरविली. त्या वेळीं तिला 'ब्राह्मणेतर चळवळ' असें नांव तिच्या विरोधकांनीं दिलें व तिच्यावर चहूंबाजूंनीं हल्ले चढविले. वास्तविक ही चळवळ म्हणजे वर्गलढा होता. पिळणारे व पिळले जाणारे यांच्यांतील तो लढा होता. प्रतिगामी आणि पुरोगामी विचारसरणींचें तें द्वंद्वयुद्ध होतें. श्रमणारे व त्यांच्या श्रमावर पोसलेले ऐतखाऊ यांमधील तो वर्गविग्रह होता. मालक, पुरोहित आणि मजूर असा तो तिरंगी सामना होता. पण सामा-जिक व धार्मिक मदानें धुंद झालेले सत्ताधारी ही चळवळ म्हणजे आपल्या आस्तित्वावर घाव आहे, असें समजून ती मार-ण्याचा प्रयत्न करूं लागले. पण पुढें जेधे, जवळकर, बागल, बागडे, जाधवराव, पाटील अशी धुरंधर मंडळी भेटल्यामुळें चळवळ अधिकच जोमाला लागून विरोधकांचा फज्जा उडाला आणि पुढें पुढें यांना

बळ इतकें वाढलें कीं, काँग्रेससारख्या अखिल भारतीय पक्षाला या मंडळींना आपल्यांत सामावून घेणें भाग पडलें.

सातारचा पिंड मूळचा क्रांतिकारक. त्यामुळें ब्राह्मणब्राह्मणेतर वादानें सातारचें रान लौकर पेटलें. या चळवळीचा प्रसार करणारे जे जलसे होते त्यांपैकीं पांच जलसे याच भागांतील होते. यावरून या चळवळीचा प्रसार केवढ्या मोठ्या प्रमाणांत झाला होता याची आपणांस कल्पना येईल. तमाशा म्हटलें कीं पांढरपेशा समाज त्यांजकडे वक्रदृष्टीनें पहातो. पण तमाशा हें लोकजागृतीचें केवढें प्रभावी साधन आहे हें रामजोशी किंवा सगनभाऊ या पेशवाईंत होऊन गेलेल्या तमासगिरांवरून दिसून येईल. मराठेशाहीच्या प्रथमावस्थेंत याच तमाशांतील लावण्यांनीं महाराष्ट्रीय बहुजनसमाजाच्या हृदयाचा ठाव घेऊन त्यांना स्वराज्याची शिलेदारी करावयास भाग पाडलें. योग्य मार्गदर्शन झालें तर लोकरंजनाबरोबरच राष्ट्रहितहि साधतां येतें, हेंच यावरून दिसून येतें. म्हणूनच महामहोपाध्याय पोतदारांसारखा जाडा पंडित तमाशाकडे किंवा जलशाकडे आपुलकीच्या व सहानुभूतीच्या दृष्टीनें पहातो. हें तमाशा सुधारणा कमिटीचे ते अध्यक्ष आहेत यावरून दिसून येईल.

तमाशांतून अगदीं खालच्या प्रतीचा विनोद केला जातो, म्हणून सुसंस्कृत माणूस तमाशाकडे आकर्षिला जात नाहीं, असा कांहीं लोकांचा तमाशावर आक्षेप आहे. पण हल्लींच्या सिनेमा-नाटकांतून काय कमी पांचटपणा असतो ? शिवाय सिनेमा-महामंडळ, नाट्यमहोत्सव इत्यादि संस्थांच्या द्वारें या दोघानाहि विशेषतः नाट्यकलेला जगविण्याचा केवढा अक्टो विक्टो प्रयत्न चालला

आहे, हें पाहिल्यावर तमाशाच्या भवितव्याबद्दल जबर धास्ती वाटते. तशांतच आमच्या सरकारनें १९४८ सालीं तमाशावर निर्बंध घालून तमाशाचें आस्तित्वच नाहींसें करण्याचा प्रयत्न केला. यावरून मध्यमवर्गीय पांढरपेशे व सरकार यांचा तमाशाकडे पहाण्याचा दृष्टिकोन कोणत्या प्रकारचा आहे, हें दिसून येईल.

या चळवळीच्या प्रसारासाठीं तमाशासारख्या हलक्या प्रतीच्या साधनांचा उपयोग केला, असा एक आक्षेप विरोधक घेतात. पण आज काँग्रेसवाले, समाजवादी, साम्यवादी इत्यादि पक्षहि या मार्गाचाच अवलंब करीत आहेत. यावरून या सत्यशोधकी मंडळींचें कांहीं चुकलें असें वाटत नाहीं.

तमाशा म्हणजे लोकनाट्य. खेड्यापाड्यांतून पसरलेला असंख्य आणि अशिक्षित असा बहुजनसमाज याचें मनरंजन करणें व त्याच बरोबर 'वगाच्या' रूपानें पूर्वींच्या थोर लोकांच्या गोष्टी ओबड धोबड काव्याच्या रूपानें रसिकांपुढें ठेवणें हेंच त्याचें काम. तमाशांत काम करणारी मंडळी सर्वसाधारणपणें खालच्या वर्गांतील असतात आणि बहुसंख्य समाजाची ज्ञानाची पातळीहि आज खालच्या प्रतीचीच आहे. त्यामुळें त्यांच्या चालीरीतींचा अभ्यास तमासगिरांना चांगला असतो. म्हणून तो त्यांच्याच भाषेंत आपलें म्हणणें त्यांच्या गळीं उतरवितो. यामुळें तमाशा म्हटलें कीं, खेड्यापाड्यांतील लोकांची केवढी गर्दी उसळते, हें पाहिल्याशिवाय समजावयाचें नाहीं.

प्रस्तुत लेखकाच्या गांवीं एक नामांकित तमाशा आहे 'वर्धनगडर रामा कुंभार याचा तमाशा' असें त्याचें नांव आहे

अक्षय्य तृतीयेला वर्धनगड गांवीं यात्रेंत हा तमाशा मोकळ्यावर आपला कार्यक्रम करीत असतो. एऱ्हवीं तो थिएटरांतून असतो. त्यामुळें १०–१२ मैलांपासून १०–५ गांवचे शोकिन लोक तो तमाशा पहाण्यासाठीं धावून येतात. यावरून तमाशाची ओढ या लोकांना केवढ्या मोठ्या प्रमाणांत आहे, हें दिसून येईल. सन १९४२ च्या क्रांतिकाळांत आम्हीं कांहीं मंडळींनीं त्यास थोडा फार फेरबदल करावयास सुचविला. त्यानें तो आनंदानें मान्य केला. आज तो तमाशा कुठल्याहि नाटक कंपनीपेक्षां कमी प्रतीचा नाहीं, हें प्रत्यक्ष पाहिल्यावर समजून येईल. यासाठीं बहुजनसमाजाच्या हिताच्या दृष्टीनें जरूर ते फेरफार करून ही लोकनाट्यकला जिवंत ठेवली पाहिजे, असेंच कोणीहि म्हणेल.

तमाशाबद्दल इतकें लिहिण्याचें कारण असें कीं, ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळीचा प्रसार प्रामुख्यानें या तमाशांकरवींच झाला. सातारा प्रांतीं मागें लिहिल्याप्रमाणें जे पांच जलसे काम करीत होते, ते काढण्याच्या कामीं भाऊराव पाटलांचें प्रामुख्यानें अंग होतें. मात्र या जलशांतून प्रतिपक्षावर करावयाची टीका विधायक स्वरूपाचीच असावी अशी ते काटेकोरपणानें काळजी घेत. खेड्यापाड्यांतून अगोदर जलशांचा कार्यक्रम करावयाचा आणि मग पाठोपाठ आपलें दणकेबाज व्याख्यान ऐकावयाचें, असा भाऊरावांचा त्या वेळचा कार्यक्रम ठरून गेलेला असे. सातारा प्रांतीं असें एकहि खेडें दिसणार नाहीं, कीं ज्यानें सत्यशोधकी जलसा पाहिला नाहीं आणि त्या पाठोपाठ भाऊरावांचें तुफानी व्याख्यान ऐकलें नाहीं ! याचा परिणाम असा झाला कीं, खेड्यापाड्यांतील लोक

भाऊरावांना इतकें ओळखूं लागलें कीं, ते त्यांना आपला 'भाऊच' समजूं लागले. याचा फायदा पुढील शिक्षणकार्यांत त्यांना चांगला मिळाला.

१९१८ सालीं महायुद्ध संपलें व इंग्लंड विजयी झालें. या युद्धांत हिंदी जनतेनें ब्रिटिश सरकारास पैशांची व सैनिकांची फार मोठी मदत केली. मध्य आशिया व युरोपच्या रणांगणावर भीम पराक्रम करून हिंदी सैनिकांनीं आपला शिपाईबाणा जगजाहीर केला. कॉंग्रेसचे अध्वर्यू लो. टिळक व गांधीजी यांनींहि या युद्धांत ब्रिटिशांशीं बिनशर्त सहकार्य केलें. या सर्व गोष्टींचा परिणाम म्हणूनच कीं काय ब्रिटिश पार्लमेंटनें १९१७ चा मॉंट-फर्ड सुधारणांचा हप्ता देऊं केला व त्याप्रमाणें १९१९ ला तो दिला. पण या कायद्यान्वयें फारशा सुधारणा हिंदुस्थानच्या पदरांत पडलेल्या नाहींत, असें वाटल्यावरून कॉंग्रेसनें हिंदुस्थान सरकारशीं म्हणजेच ब्रिटिश सरकारशीं असहकाराचें युद्ध पुकारलें. हा काळ ब्राह्मणेतर चळवळीचा भरतीचा काळ होता. मॉंडफर्ड सुधारणान्वयें मिळालेल्या मतदानाच्या अपुऱ्या हक्कानें कां होईना ब्राह्मणेतर पक्षानें निवडणुकी लढविल्या. मद्रास, मध्यप्रदेश व महाराष्ट्र यांमध्यें फार मोठ्या प्रमाणांत ब्राह्मणेतर पुढारी निवडून आले. कौन्सिलांत शिरून कांहीं मंत्रीहि झाले. हुशार आणि होतकरू अशा शेंकडों ब्रह्मणेतर तरुणाना सरकारी नौकरींत अधिकाराच्या जागेवर घेण्यांत आले. पण तेथें जाऊनहि जनतेच्या कल्याणाचा प्रश्न आपणांस पूर्णतः सोडवितां येत नाहीं, कौन्सिलांत राहून चारदोन तरुणांना नौकऱ्या लावण्यापलीकडे आपल्या हातांत कांहींहि

नाहीं, हें त्यांना कळून चुकलें. त्यामुळें कौन्सिलांत शिरले ते तेथेंच राहिले, पण प्रत्यक्ष कार्य करीत असलेल्या पुढारीमंडळींनें कॉंग्रेसनें पुढें केलेल्या हाताचें प्रेमानें ग्रहण केलें. कॉंग्रेस आपल्या उच्चासनावरून खालीं आली आणि अधिक बलवान झाली. यापुढचे कॉंग्रेसनें ब्रिटिश सत्तेशीं दिलेले लढे हे जनतेचे लढे होते. एवढी मोठी ताकत सत्यशोधक समाजानें निम्या हिंदुस्थानांत तयार केली दिसून येईल.

भाऊराव पाटलांचा या चळवळीशीं फारच घनिष्ट संबंध असल्यामुळें थोडें विस्तारपूर्वक लिहावें लागत आहे. निरनिराळ्या गांवीं सभा, संमेलनें, परिषदा, यात्रा, जत्रा, व्याख्यानमाला, मेळे, जलसे यांतून शेंकडों व्याख्यानें ब्राह्मणेतर चळवळीमार्फत भाऊरावांनीं दिली. त्यामुळें ते जनतेचे आवडते पुढारी बनले. पण प्रतिगामी अशा सनातनी लोकांना ते कर्दनकाळ वाटत. अन्याय पाहिला कीं, त्यांना संताप येतो. मग तो कोणत्याहि प्रकारचा असो. ते आपली सर्व शक्ति एकवटून विरोध केल्याशिवाय राहात नसत. उदाहरणादाखल प्रत्यक्ष घडलेले असे एकदोन प्रसंग या ठिकाणीं देतों.

## : ११ : यात्रेंतील बुवाबाजी

औदुंबर हें कृष्णा नदीच्या कांठीं प्रसिद्ध क्षेत्र आहे. या ठिकाणीं दरसाल दत्तजयंतीला मोठा उत्सव साजरा केला जातो. दूरदूरच्या अनेक खेड्यांतून हजारों स्त्रीपुरुष उत्सवासाठीं या ठिकाणीं जमतात. ते आपल्याबरोबर देवाच्या भंडाऱ्यासाठीं धान्य आणतात व तें धान्य पुजाऱ्याच्या ताब्यांत देतात. याशिवाय कमी पडूं नये म्हणून शेजारच्या भिलवडी गांवांतून वर्गणीच्या रूपांतहि ते बरेंच धान्य मिळवितात. नंतर हें धान्य एकत्रित करून पुजारी त्याचा प्रसाद बनवितो. तो प्रसाद मुद्दाम भोजनासाठींच आलेल्या ब्राह्मण यात्रेकरूंना वाढतात. त्यांचें भोजन यथेच्छ झाल्यावर प्रसाद शिल्लक राहिला तर देवाचा ब्राह्मण पुजारी ब्राह्मणेतर यात्रेकरूंना तो दुरून भिकाऱ्यांसारखा वाढतो. पुष्कळांना या गोष्टीचें वैषम्य वाटे, पण देवाचा प्रसाद समजून भाविक मंडळी प्रसाद घेऊन निमूटपणें निघून जात.

ही परिस्थिति कांहीं मंडळींनीं भाऊरावांच्या कानांवर घातली. मग एका उत्सवाला ते जातीनें हजर राहिले. त्यांनीं सर्व प्रकार बारकाईनें पाहिला. देवाच्या नांवावर चाललेला हा काळा बाजार पाहून त्यांना भयंकर संताप आला. त्यांनीं लोकांनीं जमविलेल्या धान्याच्या ढिगावरच बैठक मारली व, "खबरदार या ढिगाला हात लावशील तर !" असा पुजाऱ्याला दम दिला. पुजारी गर्भगळीत झाला व निमूटपणें बाजूला चालता झाला. त्यानें आपला सर्व

गोतावळा एकत्रित केला व घडलेला प्रकार त्यांना सांगितला. ब्रह्मवृंद संतापला आणि भाऊरावांच्या रोखानें चालूं लागला. तोपर्यंत भाऊरावांनीं तें संबंध अन्न शिजविलें व जमलेल्या ब्राह्मणेतर यात्रेकरूंना वाटून टाकलें. हें वाढपाचें काम चाललें असतां सर्व ब्रह्मवृंद पुजाऱ्यासह तेथें आला. " तुम्हींहि प्रसाद घेऊं शकतां " अशी भाऊरावांनीं त्यांना सूचना दिली. पण आजपर्यंत धनी समजून त्या अन्नावर ताव मारणारा ब्राह्मणसमाज भाऊरावांचे वरील उद्‌गार ऐकून अधिकच संतापला. त्यांनीं देवाची भीती घातली; घरभेद्यांना वश करून हाणामारी करण्याचा घाट घातला; व शेवटीं कशाचाच उपाय चालत नाहीं हें पाहिल्यावर काहीं सरकारी अधिकाऱ्यांना बोलावून आणलें. त्यांनींहि पोकळ दम देऊन पाहिला. पण त्यांच्या धमकावणीला कोणीच भीक घातली नाहीं. शेवटीं भोजनाच्या आशेनें आलेले शेंकडों ब्राह्मण यात्रेकरू आले तसेच पोट चोळीत व भाऊरावांना शिव्याशाप देत परत गेले. अफाट गर्दी जमली होती. सबंध कृष्णाकांठ माणसांनीं अगदीं फुलून गेला होता. भाऊरावांनीं जमलेल्या जनसमूहास आपल्या पहाडी आवाजांत एक खणखणीत व्याख्यान ऐकविलें व त्यांच्यांतील स्वाभिमान जागा केला. शेजारून वाहाणारी कृष्णा नदी आणि तिच्या कांठावर वास्तव्य करून राहिलेल्या वृक्षलता यांनाहि आनंद झाल्याशिवाय राहिला नसेल. मग भक्तानें निर्माण केलेल्या त्या दत्ताच्या मूर्तीला तर खात्रीनेंच गुदगुल्या होत असाव्या. तेव्हांपासून ही प्रथा बंद पडून त्या ठिकाणीं सर्वांना सारख्याच प्रमाणांत प्रसाद दिला जातो.

सातारच्या पश्चिमेस सहा मैलांवर सज्जनगड हा इतिहासप्रसिद्ध किल्ला आहे. वर समर्थ रामदास स्वामींची समाधि आहे. गडाच्या पायथ्याशीं परळी हें छोटेसें गांव, शेजारून दगडाधोंड्यांशीं कुजबुजत अवखळपणानें वाहाणारी उरमोडी नदी, पश्चिमेला गगनचुंबी सह्य पर्वताचीं शिखरें आणि पूर्वेस सातार्‍याचा मेरुमणी अजिंक्यतारा अशा निसर्गनिर्मित संरक्षित ठिकाणीं विधात्यानें या गडाची योजना केलेली आहे. सर्वसंगपरित्याग करून व आत्मचिंतनांत मग्न राहून दासबोध लिहित बसलेल्या रामदास स्वामींचा समाधिभंग होऊं नये म्हणून तर ही पूर्वयोजना नसावी! किंवा माणसांमाणसांतील भेदभाव, मत्सर व स्वार्थ यांचा आपणांस संपर्क लागायला नको म्हणून समर्थांनींच हें स्थळ निवडलें नसेल कशावरून ?

पण हाय! हाय! त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या पुण्याईची शिदोरी पुढें करून, त्यांच्या आवडत्या देवतेचा, प्रभू रामचंद्राचा उत्सव साजरा करण्यासाठीं जमलेले त्यांचेच भाईबंध, ज्या असंख्य खेडुतांकडून प्रसादासाठीं धान्य मिळविलें, ज्यांच्या पाठीवरून त्या अवघड गडावर धान्याच्या गोण्या चढविल्या त्या धन्याला, त्या खेडुतांना उन्हातानांत बाहेर उभे करून आपण आंतमध्यें देवाचा प्रसाद म्हणून पंचपक्वान्नावर ताव मारीत आहेत, हें पाहिल्यावर आसमंतांत वावरणार्‍या समर्थांच्या आत्म्यास विषाद वाटल्याशिवाय कसा राहील ?

उन्हातान्हांत घाम गाळून, पावसापाण्यांत श्रम करून व मुलाबाळांच्या तोंडचें काढून ज्यांनीं धान्य व पैपैसा देवाच्या प्रसादा-

साठीं दिला तो प्रसाद पुजाऱ्याच्या हातांत गेल्यावर तो इतरांना अस्पर्श व्हावा ना ! कवडीचेंहि श्रम न करतां व पदराला खार न लावून घेतां एकानें फक्त जातीच्या श्रेष्ठपणावर गाभाऱ्यांत बसून प्रसाद ग्रहण करावा आणि ज्यांच्या श्रमांतून हा प्रसाद निर्माण झाला त्यांनीं मंदिराच्या बाहेर उभे राहून आंतून येणाऱ्या चिमणसाळ भाताच्या मधुर वासावर व भूदेवांच्या ढेकरांच्या आवाजावरच तृप्त होऊन आल्या पावलीं परत निघावें हीच काय हिंदु धर्माची शिकवण, अशी बोचणी कांहीं मंडळींना लागून राहिली. त्यांनीं एका उत्सवाला भाऊरावांना मुद्दाम बोलावून आणलें. भाऊराव आले व त्यांनीं तो प्रकार डोळ्यांनीं पाहिला. त्यांना राहवेना. निवडक लोकांना बरोबर घेऊन त्यांनीं मंदिरांत प्रवेश केला. "शूद्र आंत आले. आमचें जेवण विटाळलें." असा एकच गिल्ला त्या भोजनभाऊंनीं केला. कांहींनीं तर पानांवर तसेंच अन्न टाकून बाहेर पळ काढला. भाऊराव आणि इतर मंडळी आली तशीच बाहेर गेली, तेव्हां आंतील मंडळींच्या जिवांत जीव आला. गडाच्या उघड्या पठारावर सर्व मेळावा जमला. त्या ठिकाणीं भाऊरावांनीं अत्यंत ओजस्वी आणि हृदयस्पर्शी भाषण केलें. जमलेला समाज खवळून गेला. पण त्यांना विवेकाचा संयम ठेवण्यास सांगून त्यांनीं सभा बरखास्त केली. लोकांना खऱ्या रामाचें दर्शन झालें. जो तो या काळ्या रामाची—भाऊरावांची—मूर्ति हृदयांत सांठवून आपापल्या घरीं चालता झाला.

---

## : १२ : सागर जागा झाला.

भाऊरावांच्या आयुष्यांत असे अनेक: धाडसाचे प्रसंग येऊन गेलेले आहेत. विस्तारभयास्तव ते येथें देणें शक्य नाहीं. "यात कसलें धाडस ?" असें कांहीं लोक उपहासानें विचारतील; पण पंचवीसतीस वर्षांपूर्वी ब्राह्मणमंडळींचा खेड्यापाड्यांतून केवढा दरारा होता याची कल्पना ज्यांना आहे त्यांना हें धाडसच वाटल्याशिवाय राहणार नाहीं. लांब कशाला ! १९२० सालची गोष्ट. नाना पेठेंत ब्राह्मणेतर पुढाऱ्यांची सभा कोल्हापूरचे छत्रपती शाहू महाराज यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. पुण्यांतील सनातनी ब्राह्मणांनीं ती सभा ब्राह्मणेतर हस्तकांकरवीं उधळून लावली. एवढेंच करून ते थांबले नाहींत, तर रस्त्यावर गर्दी व मारामारी केली म्हणून शाहू छत्रपति व ना. भास्करराव जाधव यांच्यावर खटला भरून त्यांना कैद करण्याचा त्यांनीं घाट घातला. अर्थात ही सर्व बनवाबनवीच असल्यामुळें सनातन्यांचा डाव फसला.

पुरोगामी 'सुधारक' म्हणून ज्यांची विशेष ख्याती आहे, असे कै. आगरकर हे ब्राह्मण असतांनाहि त्यांच्याच भाईबंधांनीं त्यांची जिवंतपणीं प्रेतयात्रा काढली. आर्यसमाजाचे संस्थापक स्वामी दयानंद सरस्वती यांनीं १८७५ सालीं पुण्यास भेट दिली. न्या. रानडे, म. फुले इत्यादि मंडळींनीं त्यांची मिरवणूक काढली. पण मिरवणूक बुधवार चौकांत आल्यावर सनातनी लोकांनीं तिच्यावर दगड, विटा

व चिखल यांचा मारा करून आणि विरुद्ध बाजूनें मुद्दाम गाढवावरून मिरवित आणलेली शिमग्याची वरात त्या मिरवणुकीवर घालून ती उधळून लावली आणि आपल्या बुद्धीचें दिवाळें वाजल्याची कबूली दिली. टिळकांसारखा लोकमान्य पुढारी, पण या सनातन्यांनीं त्यांना परदेशगमनाबद्दल व पुणें लष्कर विभागांत सर्वधर्मियांबरोबर चहापान केल्याबद्दल प्रायश्चित घ्यावयास लावलें. "अस्पृश्यता मानणें हें धर्मबाह्य आहे" असा राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या सहीचा जाहीरनामा महर्षि अण्णासाहेब शिंदे यांनीं १९१९ सालीं प्रसिद्ध केला असतां अगोदर कबूल केलें असतांहि याच सनातन्यांच्या भिडेला बळी पडून टिळकांना त्यावर आपली सही करणें नाकारावें लागलें. टिळकांसारखा राष्ट्रीय पुढारी, आगरांकरसारखा सुधारक, दयानंद सरस्वतींसारखा अखिल भारतीय कीर्तीचा संन्याशी व छत्रपतींसारखा एक मान्यवर संस्थानिक यांची कशी परिस्थिति या लोकांनीं केली, हें पाहिल्यावर आपण भाऊरावांच्या धाडसाचें कौतुक केल्याशिवाय खात्रीनें राहाणार नाहीं.

सत्ता, संपत्ति आणि धर्म यांची ढाल-तलवार करून हा समाज बहुसंख्य समाजाचें रक्त आणि वित्त शोषण करीत आला आहे. पण अन्यायाला कांहीं तरी सीमा असतेच. 'विरोधांतूनच विकास जन्माला येतो' या हेगेलच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें ज्यांच्यावर हे जुलूम केले जातात तो जनतासागर एकदां खवळला कीं, मग त्याच्या आश्रयावर जगून त्याच्यावरच कुरघोडी करणारीं अवतीं भवतीं वाढलेलीं चटसारीं झाडेंझुडुपें तो आपल्या पोटांत गडप करून टाकतो.

मानवानें निरनिराळे शोध लावले. जलनौकेंत बसून सागराच्या छातीवरून तो नाचूं लागला व आकाशयानांत बसून पर्वतशिखरें ओलांडूं लागला. आतां त्याला अस्मान ठेंगणें वाटूं लागलें. गर्वानें फुलून गेला मानव. आपण कोण; आपली योग्यता काय, हें तो सर्व विसरून गेला.

सागर जागा झाला. लाटेच्या उभार हातांनीं त्यानें स्वाहा करण्यास सुरवात केली. जागृत जनतेच्या एकवटलेल्या शक्तीनें रोमची पोपशाही नष्ट केली; फ्रॉन्सची सरंजामशाही गाडून टाकली; आणि रशियाची झारशाही उलथून पाडली. लांब कशाला ! गेलीं दीडशें वर्षें जिनें आमचें रक्तशोषण केलें ती बलिष्ठ साम्राज्यसत्ता आम्ही सातां समुद्रांपलीकडे हाकून लावली. एवढे धक्के बसले, इतक्या क्रांत्या झाल्या, म्हणून काय मानव सुधारला? मुळींच नाहीं. तेंच धार्मिक श्रेष्ठत्व, तोच वंशाभिमान व तोच वर्णाभिमान अजूनहि कायम आहे. या नाहीं त्या मार्गानें हे लोक अजूनहि जनतेची पिळवणूक करीत आहेत. " विद्या विनयेन शोभते " असें कविवचन आहे. पण विद्येचा कोण ताठा भरून राहिला आहे या लोकांना ! कोणतीहि सत्ता येवो. परकीय असो अगर स्वकीय असो. बुद्धीच्या बळावर तिच्याशीं हातमिळवणी करून आपलें प्रमाण लोकसंख्येच्या मानानें शेंकडा पांच टक्केहि नसतांना, शेंकडा पंचाण्णव टक्क्यांपेक्षां संख्येनें अधिक असलेल्या बहुजनसमाजावर आपलें वर्चस्व नि आस्तित्व अबाधित ठेवण्याची त्यांची सारखी धडपड चाललेली आहे. स्वतंत्र भारतांत आजसुद्धां नांवाच्या पार्टींत बदल करून आंतमध्यें संभावित भामटेगिरी चालू आहे.

मग पंचवीसतीस वर्षांपूर्वी काय स्थिति असेल याची कल्पनाच करावयास नको. अशा वेळीं भाऊरावांनीं सनातनी भिक्षुक व त्यांचे पाठीराखे सरंजामदार देशमुख–देशपांडे यांचा विरोध सहन करून जनताजागृतीचें महान कार्य केलें.

आजसुद्धां यांची संस्था पाहण्यासाठीं नवीन जमान्यांतील, पण जुन्या विचारांचा पाहुणा आला तर त्याला सत्यशोधक चळवळींतील 'जुना भाऊ पाटील' आठवतो. कावीळ झालेल्या माणसास सर्व कांहीं पिवळे दिसतें. त्याप्रमाणेंच गांधीवधोत्तर झालेल्या जाळपोळीशीं (१९४८) भाऊरावांचा संबंध असावा, असा आमच्या मुंबई सरकारला संशय आला होता. पण ज्या गांधीजींच्या व्यक्तिमत्वामुळें भाऊरावांनीं ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाचें भूत १९२१ सालींच मुंबईस चौपाटीवर गाडून टाकलें, तेच भाऊराव त्याच गांधीजींच्या खुनानंतर–जरी तो खून एका माथेफिरू ब्राह्मण तरुणानें केला असला तरी–असा अविचार कसा करतील याची खात्री मागाहून त्यांना पटली ! पण यावरून ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाची भूतबाधा आमच्या मुंबई सरकारास थोडीफार झाली असावी, असा संशय एखादे वेळीं येणें शक्य आहे.

---

## : १३ : भीष्मप्रतिज्ञा

मॉंटफर्ड सुधारणांनीं हिंदी लोकांचें समाधान झालें नाहीं. उलट त्यांतूनच १९२०–२१ सालची असहकाराची चळवळ उत्पन्न झाली. ब्रिटिश सरकारनें दिलेल्या सुधारणांचें स्वागत होण्याऐवजीं ठिकठिकाणीं सभा भरवून लोक त्या सुधारणांचा निषेध करूं लागले. अशा वेळीं जाहीर सभांवर नियंत्रण घालणारा असा ' रौलट ॲक्ट ' सरकारनें पास केला. त्याचा निषेध करण्यासाठीं अमृतसर येथें 'जालियनवाला' बागेंत भरलेल्या जाहीर सभेवर लष्करी अधिकाऱ्यांनीं गोळीबार केला व घोडे घातले. अनेक लोक प्राणांस मुकले. त्यामुळें सबंध देशांत असंतोषाचा भडका उडाला.

याच वेळीं इंग्लंडचे बादशहा पंचम जार्ज याच्या चिरंजिवानें—प्रिन्स ऑफ वेल्सनें—हिंदुस्थानास भेट दिली. हेतु हा कीं, यामुळें तरी हिंदुस्थानांतील वातावरण शांत होईल. पण अनुभव मात्र उलटा आला. सनदी नोकरांनीं व रावसाहेब, रावबहादूर, खान-बहादूर, सर इत्यादि सरकारी पदव्यांचे मुखवटे धारण केलेल्या बड्या धेंडांनीं राजपुत्राच्या स्वागताची फार तयारी केली. पण राष्ट्रीय सभेनें या स्वागतावर बहिष्कार घातला. इतकेंच नव्हें, तर हिंदी जनता आपल्या स्वागतांत सहभागी नाहीं हें दाखविण्या-साठीं ठिकठिकाणीं सभा झाल्या. अशीच एक फार मोठी सभा

मुंबईस भरली होती. देशाचे जीव कीं प्राण असणारे म. गांधी हे त्या सभेंत बोलणार होते. स्वातंत्र्याच्या तळमळीनें ज्यांचे बाहू स्फुरत होते असे शेंकडों महाराष्ट्रीय तरुण गांधीजींना पहावयास व त्यांचें व्याख्यान ऐकावयास मुंबापुरीला धावून आले. मग प्रत्येक कार्यांत आघाडीवर असणारे भाऊराव मागें कसे राहणार ! पायांत कोरे करकरीत बूट, वर परीटघडीची सुरवार, अंगांत दरबारी थाटाची लांब शेरवानी व डोक्यावर कोल्हापुरी थाटाचा डौलदार फेटा, अशा रुबाबदार पोशाखांत भाऊराव त्या ठिकाणीं आले. सातार्‍यास शिकवण्या करीत होते त्या वेळचा तात्या पंतोजीचा साधासुधा पोशाख भाऊरावांनीं केव्हांच फेकून दिला होता. किर्लोस्कर व पुढें कूपर व कारखान्यांची एजन्सी, त्याचबरोबर विमा एजन्सी, इत्यादि कामें करीत असल्यामुळें चार पैसे त्यांच्या खिशांत खुळखुत होते. आणि ब्राह्मणेतर चळवळीमुळें निरनिराळ्या लोकांशीं संबंध आल्यानें भाऊरावांच्या मूळच्या पोशाखांत व राहणींत बराच बदल घडून आला होता; इतका कीं, एकदां कोरे-गांव स्टेशनवर त्यांना बडा सरकारी अधिकारी समजून त्यांचा योग्य प्रकारें आदर सत्कार केला गेला.

असा रुबाबदार पोशाख, लांबरुंद शरीरयष्टी व खंबीर आवाज या सगळ्या गोष्टींमुळें व्याख्यानास जरी भयंकर गर्दी असली तरी भाऊरावांना व्यासपीठाजवळ जायला कांहींच अडथळा झाला नाहीं. पण खरी गंमत पुढेंच आहे. गांधीजींनीं आपल्या व्याख्यानास सुरवात केली. त्यांची सडपातळ व अर्धनग्न मूर्ति पहातांच त्यांना आपल्या त्यागी व विरागी पूर्वजांची आठवण झाली. व्याख्यानांत

गांधीजींनीं स्वदेश, स्वातंत्र्य आणि स्वाभिमान यांचा आवेशपूर्ण पुरस्कार केला. गांधीजींच्या भाषणांतील तळमळ, त्यांचा असामान्य त्याग व हृदयास भेदणारी त्यांची वाणी या सगळ्या गोष्टींचा श्रोत्यांच्या मनावर फार मोठा परिणाम झाला. ताबडतोब परदेशी कपड्यांची होळी करण्यांत आली. होळीच्या भडकत्या ज्वाला पाहून शेकडों तरुणांचीं मनें स्वदेशाच्या अभिमानानें भडकून गेलीं. मग ज्यांनीं नुकताच देहदंड सोसून आपलें स्वदेशप्रेम व सत्यनिष्ठा सिद्ध करून दाखविली होती ते भाऊराव स्वस्थ कसे बसणार ! पण आपल्या पोशाखावर त्यांचें फार प्रेम असे. त्यामुळें आपल्याहि आवडत्या पोशाखाची त्या महयज्ञांत आहुति देण्यास त्यांचें मन प्रथम धजेना. कारण भाऊराव जितके भावनाप्रधान आहेत तितकेच ते विचारीहि आहेत. म्हणूनच कोणतीहि गोष्ट करण्यापूर्वीं तिच्या यशाचा किंवा सातत्याचा थोडा वेळ का होईना ते विचार करतात. आणि एकदां तिचा स्वीकार केला कीं मग ते तिचा पिच्छा पुरविल्याशिवाय राहात नाहींत. आजहि असेंच झालें. सभास्थानापासून ते थोडेसे दूर आले. त्यांनीं थोडा वेळ विचार केला व शेवटीं मनाचा पक्का निर्धार केला. एका खादीच्या दुकानांत जाऊन त्यांनीं धोतर, सदरा व टोपी अशीं खादीचीं महावस्त्रें खरेदी केलीं व तीं अंगावर चढविलीं. त्याच पावलीं परत फिरून तीं विदेशीं वस्त्रें त्यांनीं अग्निनारायणला समर्पण केलीं. नुसतें समर्पण करूनच ते थांबले नाहींत, तर ‘ आजपासून विदेशी वस्त्रें वापरायचींच नाहींत व आपली राहणी अगदीं साधीच ठेवावयाची ’ अशी घोर प्रतिज्ञा त्या अग्निदेवतेला साक्षी ठेवून भाऊरावांनीं केली व परदेशी कपड्यांच्या सुतकांतून ते मोकळे झाले.

त्या दिवसापासून आजतागायत भाऊराव शुद्ध हातसुताचीच खादी वापरतात. तीहि भाराभर नव्हे. वर्षास चार सदरें व दोन धोतरें एवढेच त्यांचे कपडे. पुढे तर त्यांनीं टोपीचा व पादत्राणांचाहि त्याग केला. मुसळधार पाऊस असो कीं, चैत्रांतील कडक ऊन असो. पुण्यासारख्या शहरांतील डांबरी रस्ता असो अगर सह्य पठरावरील एखाद्या आडवळणी खेड्याची कांट्याकुट्यांनीं भरलेली पाऊलवाट असो. त्यांनीं आपल्या प्रतिज्ञेला कधींच बाध येऊं दिला नाहीं. पुष्कळ लोक प्रतिज्ञा करतात, पण त्यांपैकीं फारच थोडे लोक तिचें कांटेकोरपणानें पालन करतात. कांटेकोरपणानें यासाठीं म्हटलें कीं, पुढें प्रतिज्ञा पाळणें कठीण होऊं लागल्यावर मग तिला पर्याय काढला जातो. 'चितोडचें राज्य परत घेतल्याशिवाय सोन्यारुप्याच्या ताटांत जेवावयाचें नाहीं व गादीवर झोपायचें नाहीं' ही मृत्युशय्येवर पडलेल्या आपल्या पित्यासमोर केलेली प्रतिज्ञा आमरण पाळणारा एखादाच 'प्रताप' असू शकतो किंवा आपल्या वडिलांची इच्छा पूर्ण करण्यासाठीं आजन्म ब्रह्मचर्य पाळण्याची व राजैश्वर्याचा त्याग करण्याची केलेली घोर प्रतिज्ञा कितीहि संकटें आलीं तरी शेवटपर्यंत पाळणारा एकटा भीष्मच असतो. म्हणूनच तिला भीष्मप्रतिज्ञा असें म्हटलें आहे.

त्या मानानें भाऊरावांनीं केलेली प्रतिज्ञा तेवढ्या तोलाची नसेल, पण ती किंवा तशा प्रकारची प्रतिज्ञा पाळणारे हरीचे लाल आपल्या देशांत किती भेटतील? स्वदेशीच्या लाटेंत व भावनावेगांत पुष्कळ बड्या बड्या देशभक्तांनीं अशा शपथा घेतल्या व त्या पुढें या नाहीं तर त्या सबबीवर मोडून टाकल्या. तीस वर्षांवर काळ लोटला,

पण भाऊरावांनीं आपल्या प्रतिज्ञेंत बिलकूल बदल केला नाहीं. महाराणा प्रतापचे वंशज पुढें गादीखालीं गवत घालूं लागले व ताटाखालीं वडाचीं पानें ठेवू लागले. आणि दसऱ्याच्या दिवशीं खरें सोनें आमच्या आईबहिणीस देतां येत नाहीं म्हणून आपट्याचीं पानें सोनें म्हणून आम्ही त्यांच्या हातावर ठेवूं लागलों. अशा प्रकारें पूर्वजांच्या प्रतिज्ञेंत किंवा चालीरीतींत आम्हीं आमच्या सोयीनें पळवाटा काढीत आहोंत. अशा सोयीसवलतींच्या काळांत भाऊरावांनीं सदरा, धोतर व घोंगडी ही जी आपली इस्टेट ठरवून टाकली ती कायमचीच !

आज स्वातंत्र्याच्या काळांत खादीचा डगला अंगावर चढवून व वर पांढरी टोपी घालून काळा बाजार करणारे व्यापारी, आपल्या कुळांना नाडणारे वकील व डॉक्टर आणि क्षुल्लक कामासाठीं लांच खाणारे अधिकारी या सर्वांनीं खादीची प्रतिष्ठा कमी केलेली आहे. काल परकीय सत्ताधाऱ्यांपुढें लाळघोटेपणा करणारे संधिसाधू लोक आज खादीची कफनी अंगांत घालून पूर्वीप्रमाणेंच जनतेची लुबाडणूक करीत आहेत. निष्ठावंत, त्यागी आणि कळकळीचे कार्यकर्ते मागें पडून बगळ्यासारखी पांढरी शुभ्र खादी अंगावर घालून तोंडपुजेपणा करणाऱ्या बाजारबुणग्यांचीच आज पोळी पिकलेली आहे. बुवा आणि गोसावी यांनीं भगव्या वस्त्राला ज्याप्रमाणें कमीपणा आणला त्याप्रमाणेंच राजकीय बुवाबाजी करणाऱ्या या गोसाव्यांनीं जनतेच्या डोळ्यांत धूळ फेकण्यासाठीं खादीचा व्यापार चालविला आहे. पण भाऊरावांच्या पुढें यांपैकीं कुठलाच स्वार्थ नव्हता व नाहीं. गांधीजींचा आचार व विचार-

सरणी त्यांनीं जाणून बूजून मान्य केली व त्याप्रमाणें आपलें आचरण ठेवलें. नुसतें खादी वापरणें हेंच आचरण नव्हे, तर गांधीजींनीं सांगितलेली अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, असंग्रह, शरीरश्रम, अस्वाद, भयवर्जन, सर्वधर्मी समानत्व, स्वदेशी, स्पर्शभावना हीं जीं एकादश तत्त्वें त्यांचें कांटेकोरपणानें पालन करणारे व आपल्या विद्यार्थ्यांना करावयास लावणारे भाऊरावच एकटे आहेत, असें म्हणणें मुळींच वावगें नाहीं. म्हणूनच "गांधीजींच्या खऱ्या कार्याचा वारसा आमच्या संस्थेकडेच येतो" असें भाऊराव मोठ्या अभिमानानें सांगतात तें योग्यच आहे. "एका महात्म्यानें ( ज्योतीराव फुले ) मला स्फूर्ति दिली आणि दुसऱ्या महात्म्यानें ( गांधींनीं ) मला कार्याची दिशा दाखविली. तसेंच राजर्षि शाहू छत्रपती आणि महर्षि अण्णासाहेब शिंदे यांच्या आशीर्वादानें मी प्रत्यक्ष कार्यच करूं लागलों" असें भाऊराव कबूल करतात. आणि आपण अधिक विचार करून भाऊरावांच्या कार्याकडे पाहिलें तर या चारहि महापुरुषांचें कार्य अखिल भारतांत एकत्रितपणानें जर कुठें चाललें असेल तर तें फक्त साताऱ्यास, भाऊरावांच्या रयत–शिक्षण संस्थेंतच चाललेलें दिसेल. दुसरीकडे 'सर्वोदयाच्या' नांवावर 'अल्पोदयच' चाललेला आपणांस पहावयास मिळेल. गांधीजींनीं आम्हांस सेवावृत्तीची दीक्षा दिली, पण भाऊरावांनीं आम्हां महाराष्ट्रीयांची सर्वांगीण व संघटित जागृति करून आम्हांस मान ताठ ठेवून चालावयास शिकविलें. यानंतरचे भाऊराव राष्ट्रीय वृत्तीचे भाऊराव म्हणून जनतेसमोर आले.

## : १४ : ध्येय ठरलें !

ब्राह्मणब्राह्मणेतर वादांत रान दणाणून सोडणारे भाऊराव आतां आतां कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं जनता-जागृतीचें काम करूं लागले. निष्ठापूर्वक आणि आत्यंतिक तळमळीनें बहुजनसमाजाची सेवा करावयाची हें भाऊरावांचें ब्रीद. मग ती कोणत्या कां मार्गानें होईना करायचीच. गांधीजींनीं कॉंग्रेसचीं सूत्रें हातीं घेतल्यापासून कॉंग्रेस जनतारूप होऊं लागली. तिची शक्ति वाढूं लागली. त्यामुळें जनतेंतील तळमळीचे कार्यकर्ते कॉंग्रेसकडे आकर्षिले गेले. भाऊरावांनीं पण आपलीं पावलें त्याच मार्गानें वळविलीं. ते कॉंग्रेसचे सभासद झाले नाहींत, पण राष्ट्रीय लढ्यांत त्यांनीं फार मोठ्या प्रमाणांत भाग घेतला. पुन्हां व्याख्यानें आणि दौऱ्याचें सत्र सुरू झालें. सत्यशोधक चळवळीनें मूळ भूमिका तयार करून ठेवलीच होती. त्यावरच त्यांनीं हें नवीन कलम केलें. भाऊरावांनीं आणि त्यांच्या साथीदारांनीं पुन्हां महाराष्ट्राचें रान पेटविलें. त्यामुळें अगदीं थोड्याच दिवसांत कॉंग्रेसचें लोण शेतकरी आणि कामगार वर्गाच्या झोपड्यांपर्यंत पोचलें आणि धर्ममार्तंड मंडळींना काल काळ वाटणारे भाऊराव आतां सरकारी नोकरांना व पोलीस अधिकाऱ्यांना कर्दनकाळ वाटूं लागले.

१९२१ च्या सुमारास मुंबई सरकारचे फडणीस म्हणून सर चुनीलाल मेहता काम पहात होते. त्यांनीं 'तुकडेपट्टी बिल'

विधिमंडळापुढें मांडलें. आजच्या आमच्या सरकारनेंहि या बिलान्वयें शेताचे लहान लहान तुकडे करण्याचें थांबविण्याच्या दृष्टीनें तुकडे जोडण्याचें कार्य चालविलें आहे. पण त्यांत प्रत्यक्ष जमीन कसणाऱ्या शेतकऱ्यांच्या पदरांत काय पडणार आहे, तें भविष्य काळच ठरवील. १९२१ चें सर चुनीलाल मेहतांनीं मांडलेलें बिल हाणून पाडावयाचें, असें काँग्रेसनें ठरविल्यावर त्या दिशेनें कार्यकर्त्यांत हालचाल होऊं लागली. विशेषत: या बिलाविरुद्ध महर्षि अण्णासाहेब शिंदे, लोकनेते केशवराव जेधे व कर्मवीर भाऊराव पाटील या महारथींनीं सबंध महाराष्ट्रांत तुफानी दौरा काढून व शेकडों ठिकाणीं व्याख्यानें देऊन आणि चर्चा करून शेतकरी समाजांतून एकच आवाज उठविला. शेवटीं जनतेचा विरोधी आवाज ऐकून सरकारला तें बिल मागें घ्यावें लागलें. इतकी दांडगी शक्ति आणि विश्वास या कर्मवीरांनीं महाराष्ट्रांत निर्माण करून ठेवला. योगायोग असा कीं, ज्या काँग्रेसनें त्या वेळीं आकाशपाताळ एक करून या बिलाला विरोध केला तीच काँग्रेस सत्तारूढ झाल्यानंतर तिच्यावरच हें बिल पास करण्याची पाळी यावी, हा काळानें परिस्थितीवर उगविलेला सूडच म्हणावयाचा !

अशा प्रकारें सार्वजनिक कार्य धूमधडाक्यानें चाललें असतांहि भाऊरावांना मनापासून समाधान वाटेना. महाराष्ट्रांतील नद्या दुथडी भरून वाहतील, पण उन्हाळ्यांत त्या कोरड्या ठणठणीत. अशी स्थिति या व्याख्यानबाजीमुळें जनतेची होते, हें त्यांना समजून आलें. म्हणून लहानसाच कां होईना, पण सतत बारा महिने झुळूझुळू वाहणारा झरा ज्याप्रमाणें आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना

चिरंतन जीवन देतो, असें कांहीं तरी महाराष्ट्रीय जनतेच्या विचार-सरणींत आमूलाग्र बदल करून चिरंतन सौख्य देईल, अशी संजी-वनी शोधून काढण्याच्या विचारांत ते गर्क असत. त्यामुळें सर्वसंगपरित्याग करून व अनंत हालअपेष्टा सहन करूनहि मनाची तळमळ शांत होईना म्हणून भगवान बुद्धाची जी स्थिति झाली किंवा तारुण्यांत आपल्या दिव्य प्रतिभेनें जर्मन जनतेस वेड लावणारा, पण वृद्धपणीं Faust ( फाऊस्ट ) हें अमर काव्य लिहीत असतां दिसलेल्या अपुऱ्या प्रकाशानें Mora light, More light ( आणखी प्रकाश, आणखी प्रकाश ) म्हणून अगतिक झालेला जर्मन महाकवि गटे यांच्यासारखी भाऊरावांची स्थिति झाली.

बहुजनसमाजास सुविद्य, सुविचारी आणि सुसंपन्न करणें म्हण-जेच खरें धर्मसाधन किंवा मोक्षप्राप्ती होय, या दिव्यत्वाचा साक्षात्कार झाल्यावर भगवान बुद्धाला जो आनंद झाला, तोच आनंद जनता—शिक्षणाचा झरा या महाराष्ट्राच्या खडकाळ जमि-नींत बारा महिने अठरा काळ वाहत ठेवण्यासाठींच फक्त यापुढील आपलें आयुष्य वेंचावयाचें असें भाऊरावांनीं ज्या दिवशीं ठरविलें त्या दिवशीं त्यांना झाला. सार्वजनिक कार्य करीत असतां १९१० साला-पासूनच त्यांनीं दुधगांव या सातारा जिल्ह्यातील वाळवें तालुक्यां-तील गांवांत "दुधगांव शिक्षणप्रसारक संस्था" या नांवाची एक शिक्षणसंस्था काढून तिच्या मार्फत थोड्याफार प्रमाणांत शिक्षणाचें कार्य चालविलें होतें. पण इतर सार्वजनिक किंवा राजकीय चळ-वळीकडे त्यांचा अधिक ओढा असल्यानें संपूर्णपणें तिकडे लक्ष देण्यास त्यांना सवडच मिळाली नाहीं. आणि सवंग देशभक्तीच्या लाटेंत ते तसेच वाहात गेले असते तर हें कार्य अपुरेंच राहाणार होतें. पण या पवित्र कार्याकडे भाऊरावांचें मन वळविण्याचें काम

त्यांच्या सुशिल पत्नी कै. सौ. लक्ष्मीबाई यांनीं केलें. या माउलीनें भाऊरावांना या शिक्षणकार्याकडे खेचून आणलें नसतें, तर भाऊराव भारतीय स्वातंत्र्य लढ्याच्या पर्वातील एक थोर नेते म्हणून आज चमकले असते किंवा त्यांच्या मूळच्या बंडखोर प्रवृत्तीप्रमाणें ते एखाद्या कटांत गोवले जाऊन क्रांतिकारक म्हणून भगतसिंग व जगन्नाथ शिंदे यांच्याप्रमाणें मागेंच फांसावर लटकले गेले असते. पण मग आमचें काय झालें असतें? गरीब रयतेच्या मुलांना ज्ञानमार्ग दाखविणाऱ्या विश्वामित्रास आम्ही पारखे झालों असतों. आणि मग अज्ञान व दारिद्र्य यांच्या काशाकुंद्यानें पडीक झालेली ही महाराष्ट्राची खडकाळ जमीन तशीच पडून राहिली असती. पण विधिघटना वेगळी होती. म्हणूनच त्यांनीं ऋषिप्रणित ज्ञानमार्गाकडेच आपलें संपूर्ण लक्ष वळविलें. मध्यें कांहीं दिवस तर त्यांनीं स्वतः शेती कसली. त्या सालीं त्यांच्या शेतांतील एकाच केळीच्या घडाला तीनशें केळीं लागलीं होतीं. तो घड कोल्हापूर येथें भरलेल्या शेतकी प्रदर्शनांत ठेवण्यांत आला होता. तो अजस्र केळीचा घड पाहून त्यांना आदर्श शेतीबद्दल एक 'सुवर्ण पदक' बक्षिस म्हणून मिळालें. पण यापुढें आपली वाडवडिलार्जित जमीन कसण्यापेक्षां महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या अंतःकरणांतील कैक पिढ्या पडून राहिलेली शेती लागवडीस आणावयाचें त्यांनीं ठरविलें व त्याप्रमाणें त्या जमिनींत आपला 'रयत शिक्षण संस्था' या नांवाचा 'बहादर' नांगर घालून ती पडीक जमीन नांगरावयास प्रारंभ केला. शेतीसारख्या साध्या समजल्या गेलेल्या विषयांतहि जातीनें खपून व पूर्ण लक्ष घालून इतरांपेक्षां विशेष उत्पन्न त्यांना काढून दाखविलें. मग हा तर शिक्षणासारखा महत्त्वाचा प्रश्न! तो हाताळण्याचें त्यांनीं ठरविलें व त्या कामींच आपलें तनमनधन वेचण्याचा त्यांनी निश्चय केला.

---

## : १५ : रयत शिक्षण संस्था

कोल्हापूरचा संबंध सुटल्यावर भाऊराव बहुतेक सातारलाच वास्तव्य करीत. तेथूनच ते सातारा जिल्ह्यांत व कधीं कधीं बाहेरहि दौरे काढीत असत. १९१९ सालीं सत्यशोधक समाजाचें सातारा जिल्हा अधिवेशन काले या प्रसिद्ध गांवीं भरलें होतें. जिल्ह्यांतील व बाहेरीलहि मोठमोठे पुढारी व कार्यकर्ते आणि अफाट जनतेचा सागर तेथें जमला होता. सभेचें अध्यक्षस्थान कट्टर सत्यसमाजिस्ट व बुद्धिवादी कायदेपंडित पुण्याचे के. केशवराव बागडे यांनीं विभूषित केलें होतें. सभा फारच परिणामकारक झाली. शेवटीं त्याच सभेंत सर्व जातींच्या विद्यार्थ्यांसाठीं एक वसतिगृह काढण्याचें भाऊरावांनीं ठरविलें व तेथेंच त्या कामाला प्रारंभहि केला. काले येथील दाजी पाटील, नारूकाका खोत, बाबूराव चौगुले इत्यादि मंडळींच्या सहाय्यानें त्यांनीं एक वसतिगृह स्थापन केलें; आणि ठिकठिकाणीं अशींच वसतिहें तयार करण्यासाठीं एक संस्था स्थापन केली. तिचेंच नांव 'रयत शिक्षण संस्था'. आज दिसणारा सर्व विस्तार याच महानदीचा. बत्तीस वर्षांपूर्वी या महानदीचा उगम एका खेड्यांत झाला. पुढें भाऊरावांच्या कार्याचा व्याप बराच वाढल्यामुळें व त्यांचें बरेंच राहणें सातारलाच असल्यामुळें सातारा हेंच त्यांनीं आपलें कार्यक्षेत्र ठरविलें.

सातारा हीच मराठ्यांची मूळची राजधानी. पण शेवटच्या

प्रतापी छत्रपतीला—प्रतापसिंहाला—स्वकियांच्या कारवायांमुळें व परकियांच्या कुटील राजनीतीमुळें हद्दपार व्हावें लागल्यापासून सातारा पोरका झाला होता. तेव्हांपासून निर्वीर्य आणि निस्तेज झालेला सातारा बर्फासारखा थंड गोळा होऊन गेला होता. भाऊरावांनीं या गोळ्यास उष्णता द्यावयाचें ठरविलें. त्याप्रमाणें १९२४ सालच्या दसऱ्याच्या शुभ मुहुर्तावर एक अस्पृश्याचा मुलगा घेऊन सातारा शहरीं त्यांनीं रयत शिक्षण संस्थेचें रोपटें लावलें. खरें सीमोल्लंघन त्या दिवशीं झालें.

विद्यार्थीदशेंतील बराच काळ कोल्हापूरला गेलेला. तेथें छत्रपति शाहू महाराजानीं प्रत्यक्ष चालविलेलें कार्य पाहिलेलें व त्यांचा सहवासहि लाभलेला. त्यामुळें आपल्या या पहिल्या वहिल्या प्रयत्नास त्यांनीं 'छत्रपति शाहू बोर्डिंग हाऊस' असें नांव दिलें. शिवाय ते एकदां फिरतीवर असतां मिरज स्टेशनवर शाहू छत्रपतींच्या भेटीचा लाभ त्यांना मिळाला. बऱ्याच दिवसांनीं भेटल्यामुळें व भाऊरावांवर महाराजांचें विशेष प्रेम असल्यामुळें महाराजांनीं भाऊरावांस रात्रीं जेवणासाठीं ठेवून घेतलें. जेवणानंतर महाराज म्हणाले, "कायरे भाऊ पाटील, त्या किर्लोस्करची नौकरी तूं कां सोडलीस ? त्याचें खाऊन तूं सत्यशोधक समाजाचा प्रचार करीत होतास तें काय वाईट होतें? आणि या महारमांगांचें बोर्डिंग पाहून तुझे सोवळे जैन लोक काय म्हणतील?" बरीच चर्चा झाल्यानंतर भाऊरावांनीं आपली वसतिगृहाची योजना त्यांच्यापुढें ठेवली. तेव्हां " यापुढें कोल्हापूरच्या खासबाग मैदानांत होणाऱ्या कुस्त्यांचें उत्पन्न तुझ्याच संस्थेस देऊं" असें महाराजांनीं अभिवचन दिलें. पण दुर्दैवानें पुढें लौकरच (१९२२)

महाराजांचें अकल्पित निधन झाल्यामुळें ती कल्पना कल्पनाच ठरून गुलदस्तांत राहिली. पण भाऊराव ती गोष्ट विसरले नाहींत. त्यांच्या इच्छित औदार्याचे उतराई होण्याच्या दृष्टीनें त्यांनीं या पहिल्याच शाखेला शाहू छत्रपतींचें नांव देऊन त्यांचें जिवंत स्मारक उभारलें.

शाहू छत्रपतींनीं कुस्तीच्या आखाड्यांत उतरण्यासाठीं जसें नामांकित पैलवान पोसले त्याचप्रमाणें राजकीय आखाड्यांत दोन हात करण्यासाठीं अनेक बुद्धिमान कार्यकर्तेंहि तयार केले. इतकेंच नव्हें, तर त्यांच्याच सक्रीय प्रोत्साहनावर सत्यशोधक समाजाची पाळेंमुळें लांबवर पसरलीं. यांपैकीं बऱ्याचजणांनीं राजकीय कार्याबरोबर आपला घरगुती स्वार्थहि चांगला साधला. यांपैकीं कुणाला त्यानंतर शाहू राजांचें स्मरणसुद्धां झालें किंवा नाहीं, हें समजत नाहीं. पण त्यांच्याच खुऱ्याखुऱ्या शिष्यानें त्यांचें स्मारक उभारून शाहू छत्रपति अमर आहेत, हें सिद्ध केलें.

दोन तीन वर्षें चिकाटीचा प्रयत्न करून ही संस्था नांवारूपास आणल्यावर इ. स. १९२७ च्या २५ फेब्रुवारीला महात्मा गांधींच्या हस्तें तिचें नामकरण झालें. शाहू छत्रपतींची अमूर्त इच्छा, गांधीजींचा आशीर्वाद व भाऊरावांची दांडगी चिकाटी या भांडवलावर गेल्या पंचवीस वर्षांत या रोपट्याचा प्रचंड वटवृक्ष बनून त्याच्या अनेक पारंब्या आतां खोलवर पोंचल्या आहेत. संस्थेचें बोधचिन्ह वटवृक्ष आहे. तें किती यथार्थ आहे तें आपणांस दिसून येईल. वाई तालुक्यात म्हसवें गांवाशेजारील जंगलांत असाच एक प्रचंड वटवृक्ष आहे. त्याचा पसारा केवढ्या तरी मोठ्या जागेंत भरून राहिला आहे. त्याच्यापासून निघालेल्या शेंकडों पारंब्या जमिनींत शिरून त्याच मुळें बनलेलीं आहेत. त्यामुळें त्या वृक्षाचा मूळचा बुंधा

कोणता हें ओळखतांच येत नाहीं. त्याचप्रमाणें भाऊरावांची संस्था पहावयास गेलेल्या नवख्या माणसास हिचें मूळ कोणतें तें समजणें फार कठीण पडतें. शिवाय वडाच्या झाडापासून निघालेलीं हीं मुळें पुढें आपल्या मूळ जन्मदात्यांवर अवलंबून न राहतां आपला उदर-निर्वाह स्वतंत्रपणेंच करतात. त्याचप्रमाणें भाऊरावांनीं काढलेल्या निर-निराळ्या संस्था अशाच स्वावलंबी आहेत. इतकेंच नव्हें, तर आपलें पोट भागवून त्या आपल्या मूळ संस्थेला व एकमेकींनाहि मदत करतात.

बहुजनसमाजांतून स्वावलंबनाच्या जोमावर शिक्षण घेऊन कर्त-बगार व निस्वार्थी तरुण निर्माण केले जावेत व शिक्षणक्षेत्रांतून जात, पात, धर्म व पंथ इत्यादि भेदांचें समूळ उच्चाटण करावें या उद्दे-शानेंच ही संस्था स्थापन करण्यांत आली. तो उद्देश एका तपांतच सफल झाला, हे महाराष्ट्राचे महर्षि कै. अण्णासाहेब शिंदे यांनीं संस्थेच्या बाराव्या वार्षिकोत्सवाच्या प्रसंगीं (१९३६ सालीं) जाहीर केलें. महर्षि भाऊरावांच्या कार्याचें कौतुक करून ते म्हणाले, "भाऊराव, तुम्हीं धन्य आहांत. समाजसेवा ही अक्रोडाच्या झाडासारखी आहे. तिला लौकर फलप्राप्ती होत नाहीं. पण तुमच्या मार्गेतलि या अक्रोडाच्या झाडाला एका तपांतच गोड फळें आलीं आहेत. या वृक्षाचा महान वृक्ष होवो. त्याच्या शाखा महाराष्ट्-भर पसरोत आणि त्यांना अशींच गोड फळें येवोत, असा मी आशीर्वाद देतों." महर्षींचाच आशीर्वाद तो. तो काय खोटा होणार आहे? पंधरा वर्षांत सातारा, कोल्हापूर, पुणें नगर, सोलापूर, मुंबई अशा महाराष्ट्राच्या सर्व भागांत आज भाऊरावांच्या रयत शिक्षण संस्थेच्या शाखोपशाखा काम करीत आहेत! यथानुक्रमें आपण त्यांची ओळख पुढें करून घेऊं.

---

## : १६ : कायदेभंग

भाऊरावांनीं आतां आपणांस संपूर्ण शिक्षणकार्यासाठीं जरी वाहून घेतलें असलें तरी मधून मधून त्यांच्या मूळचा स्वभाव उचल खाई, पण लक्ष्मीबाई त्यांना आवरण्याचा प्रयत्न करीत. परंतु एक प्रसंग असा आला कीं, त्या वेळीं त्यांनीं लक्ष्मीबाईंनाहि बाजूला ठेवले. तो प्रसग १९३० सालीं घडला. हिंदी जनतेच्या तोंडास मॉंटफर्ड सुधारणेचीं पानें पुसल्यानंतर ब्रिटिश पार्लमेंट स्वस्थ राहिलें. पुष्कळ वाटाघाटी झाल्या. पण त्यांतून कांहींहि निष्पन्न झालें नाहीं. तेव्हां गांधीजींनीं कायदेभंगाचें नवीनच अस्त्र निर्माण केलें. १९२१ सालापेक्षां हिंदी जनता अधिक जागती झाली होती. सरकारचा डाव आतां ती ओळखूं लागली होती. गांधीजींनीं आपल्या अनत्याचारी कायदेभंगाचें रणशिंग फुंकतांच साऱ्या देशानें त्यांच्या आवाजांत आपला आवाज मिसळविला. ब्रिटिशांच्या कुटील कारवाया समजूं लागल्यामुळें अगोदरच तरुणांचीं डोकीं भडकून गेलीं होतीं. त्यांनीं सबंध देशभर एकच हलकल्लोळ उडवून दिला. त्यांनीं शाळा सोडल्या, परदेशी मालच्या दुकानावर पिकेटिंग सुरू केलें; कोर्टकचेऱ्यावर मोर्चे काढले; आणि सरकारला अगदीं भंडावून सोडलें. सोलापूरला सरकारनें 'मार्शल लॉ' पुकारला. मल्लाप्पा धनशेट्टी, जगन्नाथ शिंदे, कुर्बानी हुसेन व सारडा यांना दक्षिणेकडे तर भगतसिंग, सुखदेव, राजगुरु, दत्त वगैरे तरुणांना

उत्तरेकडे सरकारनें फांशीं दिलें. पोलिसी अत्याचारांना तर सीमाच राहिली नाहीं. त्यांच्या मदतीला आणखी लष्कर देण्यांत आलें. लाठीमार, अश्रुधूर आणि शेवटीं संगीनींचा मार यांनीं शेंकडों तरुण घायाळ झाले. हजारों स्त्री-पुरुषांनीं तुरुंग भरून गेले. तरी लढा थांबण्याचीं चिन्हें दिसेनात. बार्डोलींतील शेतकऱ्यांनीं ‘ साराबंदी ’ केली; महाराष्ट्रीय शेतकऱ्यांनीं ‘ जंगल सत्याग्रह ’ केला; आणि कोकणी शेतकऱ्यांनीं ‘मिठाचा सत्याग्रह’ पुकारला. अशा प्रकारें सबंध देश पेटला. मग सातारा कसा थांबणार ?

प्रभातफेऱ्या, सायंफेऱ्या, सत्याग्रह, कायदेभंग यानीं सातारा दुमदुमून गेला. लाठीमार आणि गोळीबार तर साताऱ्च्या पांचवीलाच पुजलेले. पण त्यांनाहि न जुमानतां साताऱ्च्या वीरांनीं नोकरशाहीला भंडावून सोडलें. आज येथें कायदेभंग झाला; उद्यां तेथें झाला; परवां कोठें होईल याचा नेम नाहीं. पोलीस तर अगदीं त्रासून गेले. शेवटीं पोलिसांच्या कानांवर एक आकस्मित बातमी आली कीं, कामेरी येथें भाऊराव पाटील कायदे-भंग करणार ! मग काय विचारतां ? एकच धावपळ सुरू झाली. कामेरीला पोलीसपार्टी आणि वेळ पडल्यास लष्कर बोलाविण्याचे सरकारी हुकूम सुटले. भाऊराव पाटील बोलणार, हें समजल्यानंतर हजारों शेतकरी आदल्या दिवसापासून कामेरीस जमूं लागले. उद्यां निघायचें म्हणून विद्यार्थ्यांशीं विचारविनिमय करून भाऊराव आपल्या बिछान्यावर येऊन बसले. ते पडले नाहींत. कारण झोंप येणारच नव्हती. सबंध देश खडबडून जागा झाल्यावर झोप कुणाला येईल ? आणि भाऊरावांसारख्या नेत्यांना तर मुळींच नाहीं. इत-

केंच नव्हें, तर त्यांना एका ठिकाणीं बसवेनाहि. म्हणून विचार करीत ते इतस्ततः फिरूं लागले.

पहिला प्रहर उलटला. सर्व जग निद्राधीन झालें. तरी एक तळमळणारा आत्मा येरझाऱ्या घालीत फिरत होताच. त्या भयाण अंधारामुळें निस्तब्ध पसरलेल्या वातावरणांत शेंकडों देशभक्तांच्या भिंतींच्या आंत होणाऱ्या छळामुळें निघणाऱ्या आर्त किंकाळ्या त्यांना कशा झोपूं देणार? देशाच्या कानाकोपऱ्यांतून भेदाभेद विसरून एकदिलानें आणि एकाच आवाजानें कोटिकोटि कंठांतून निघणाऱ्या गगनभेदी आरोळ्या त्यांना कशा स्वस्थ बसूं देणार! मायभूमीच्या पायांत परसत्तेच्या सोनेरी शृंखला अडकाविल्या गेल्या असतां कोणता माईचा पूत सुखानें बिछान्यावर पडून राहील? देशाच्या स्वातंत्र्यासाठीं तळमळणारे भाऊराव आतां अधिकच विचारमग्न दिसूं लागले.

पण ती पहा. दुसरी कोणी तरी व्यक्ति जड पावलांनीं भीत भीत इकडेच येत आहे. कोण बरें त्या? या तर लक्ष्मीबाई. त्या तरी कशा झोपणार? त्या जवळ आल्या आणि बोलूं लागल्या, "तुम्ही उद्यां सत्याग्रह करणार, म्हणजे तुरुंगांत जाणार. मग या साठपासष्ट मुलांचें कसें होणार? तुम्ही तुरुंगांत गेल्यावर या मुलांनीं कुणाच्या तोंडाकडे पहावयाचें? मग यांना येथें आणलें तरी कशाला? माझें काय? मी माझ्या माहेरीं जाईन. पण या मुलांची काय व्यवस्था करावयाची? कां संस्था मोडून टाकणार आहांत? लोक म्हणतील हा कर्जबाजारी झाला. याला बोर्डिंग चालवितां येत नाहीं, म्हणून हा तुरुंगांत गेला. पहा विचार करा. अजून

पहाट झाली नाहीं." इतकें बोलून लक्ष्मीबाई थांबल्या. भाऊ-रावांच्या हृदयांतील विचारांचें वादळ अधिक वेगानें धावूं लागलें. पासष्ट मुलांच्या शिक्षणांचा प्रश्न त्यांच्या डोळ्यांसमोर आ वासून उभा राहिला.पण त्यांनीं त्याला भीक घातली नाहीं.संधी वारंवार येत नसते. तरुण आणि सुस्वरुप पत्नी, तान्हें गोंजिरवाणें बाळ आणि अफाट राज्यवैभव यांना लाथ मारून अरण्यांत जाण्याची संधी राजपुत्र सिद्धार्थाला एकदाच लाभली. तिचा योग्य फायदा करून घेतल्यामुळेंच त्याला भगवान बुद्ध होतां आलें. भाऊरावांनींहि आपला निश्चय फिरविला नाहीं. दुसऱ्या दिवशीं ते कामेरीस चालते झाले. बिचाऱ्या लक्ष्मीबाई देवाचा धावा करीत बोर्डिंगमध्येंच थांबल्या.

भाऊराव गेल्यापासून निसर्गानें आपलें रूप पालटलें. काळ्या-कुट्ट ढगांनीं आकाश भरून गेलें. धुळीनें दिशा धुंद झाल्या. विजांचा लखलखाट सुरू झाला. पण या तांडवाला न जुमानतां सभा-स्थानावर अफाट गर्दी जमली. भाऊराव बोलावयास उभे राहिले. त्यांच्या मुखांतून वाङ्मयगंगा धो धो वाहूं लागली. व्याख्यान ऐन रंगांत आलें होतें. आणि त्याच वेळीं मुसळधार पावसानें भाऊ-रावांच्या मुखांतून वाहणाऱ्या गंगेस साथ दिली. भाऊरावांनीं आपलें कार्य अधिकच जोरानें सुरू केलें. सभास्थानावरून एकहि माणूस जागचा हलला नाहीं. तशाच पावसांत त्यांनीं आपलें भाषण संपविलें. निसर्ग क्रुद्ध झाला होता. पण पोलीस अधिकारी शांत राहिले. पोलीस अधिकाऱ्यांना इकडे येतांच येऊं नये म्हणून निसर्गानेंच असलें क्रुद्ध रूप धारण केलें असावें किंवा लक्ष्मीबाईनें देवाची केलेली प्रार्थना त्याला ऐकूं गेली

असावी; आणि त्यानें ती ऐकून पासष्ट मुलांचें काम एकट्या लक्ष्मी-बाईवर सोंपविणें बरें नव्हे, असें समजूनच ही योजना केली असावी. कांहींहि असो. भाऊराव पकडले गेले नाहींत. दुसऱ्या दिवशीं ते घरीं आले, तेव्हां मुलांना व लक्ष्मीबाईना किती आनंद झाला याचें वर्णन करणें कठीण आहे. यानंतर मात्र पत्नीची अनमति घेतल्या-खेरीज त्यांनीं शिक्षणाशिवाय दुसरीकडे आपलें लक्ष वळविलें नाहीं. पण लक्ष्मीबाईंची सोबत भाऊरावांना फार काळ लाभलीच नाहीं.

---

## : १७ : पुण्यशील माता व सुशील पत्नी

पत्नीमध्यें आईचें वात्सल्य, मित्राचा प्रेमळपणा आणि गृहिणीची तळमळ यांचा त्रिवेणी संगम झाला आहे, हें पहाण्यासाठीं आपणांस फार लांब जायला नको. आपलें सर्वस्व गमावून बसलेल्या सत्यवानाबरोबर अरण्यवास पत्करून गेलेलें सौभाग्य, शत्रूनें लुबाडलेलें राज्यवैभव व वृद्ध सासूसासऱ्यांची गेलेली दृष्टि परत मिळवून देणारी सती सावित्री, आपल्या पतीच्या गैरहजेरींत किल्ल्यावर शत्रूनें केलेल्या चढाईस तोंड देण्यासाठीं घोड्यावर स्वार होऊन शत्रूंवर तुटून पडणारी शिवछत्रपतीच्या काळांतील रणरागिणी सावित्रीबाई गणेदारीण आणि सासूसासऱ्यांनीं घरांतून बाहेर काढलें, आप्तस्वकीयांनीं बहिष्कृत केलें व समाजद्रोह्यांनीं नाना तऱ्हेनें छळले, तरीहि आपले जे पति म. ज्योतीराव फुले त्यांच्या बरोबर सतत सावलीसारखे राहून त्यांच्या कार्यांतील अर्धा वाटा उचलणारी महासाध्वी सावित्रीदेवी फुले या देवतास्वरूप सावित्रींच्या चरित्रांवरून ही गोष्ट आपणांस कळून येईल. त्यांच्याच पावलांवर पाऊल ठेवून त्यांचीच परंपरा पुढें चालविणारी अलीकडच्या काळांतील महासती म्हणजे भाऊराव पाटलांच्या सुशील पत्नी लक्ष्मीबाई पाटील या होत.

यांचा जन्म कुंभोजलाच झाला. भाऊरावांचें आणि यांचें बालपण एकाच गांवांत गेलें. घरची परिस्थिति साधारणच व घराणें जुन्या

वळणाचें. यामुळें लक्ष्मीबाईंचें फारसें शिक्षण झालें नाहीं. पण लहानपणापासूनच अनेक अडचणींना तोंड द्यावें लागल्यानें व्यावहारिक शहाणपण त्यांच्या अंगीं बऱ्याच प्रमाणांत वास करीत होतें. त्यामुळें सेवाधर्माचें बाळकडूहि त्यांना घरींच मिळालें. म्हणून सासरीं गेल्यावर आजच्या नवीन जोडप्याप्रमाणें 'राजाराणीचा' स्वतंत्र संसार न थाटतां त्यांनीं सासूसासरे आणि इतर वडील मंडळी यांची मनोभावें सेवा केली व सर्वांकडून वाहवा मिळविली. त्यांची खरी 'वाहवा' यापुढेंच होणार होती. पण त्यासाठीं त्यांना फार झगडावें लागलें. कारण त्या पडल्या जुन्या वळणाच्या आणि भाऊरावांच्या अंगांत तर नव्या विचारांचें वारें पुरेपूर संचारलेलें. त्यामुळें प्रथम प्रथम भाऊरावांच्या विचारांशीं सहमत व्हावयास त्यांना बरेंच जड गेलें. चूल, मूल आणि आल्यागेल्याचा सत्कार हाच आमच्या हिंदी स्त्रियांचा आदर्श ठरून गेला आहे. त्यामुळें हेंच आपलें जीवनकार्य समजून किती तरी भगिनी ही उसाभर करतां करतां आपलें आस्तित्वच विसरून जातात. यांतूनहि ज्या थोड्याफार पुढें येण्याचा प्रयत्न करतात त्यांना रूढीच्या आणि घराण्याच्या नांवावर समाज म्हणण्यापेक्षां पुरुषवर्गच मागें खेचतो. स्वतःला मोठे सुधारक म्हणवून घेणारे बरेच महाभाग आपल्या बायकांना जाणून बुजून चार भिंतींच्या आंत कोंडून ठेवतात. आणि तशीच वेळ आली तर आपला कमकुवतपणा झाकण्यासाठीं, "काय करावें हो! आमची बायको पडली जुन्या वळणाची!" असें म्हणून लुगड्याच्या आड दडतात. यांचा सुधारणेचा डांगोरा फक्त उंबरठ्याच्या बाहेरच. हा चुकारपणाचा आणि संधिसाधूपणाचा मार्ग फुल्यांचा अनुयायी

म्हणविणाऱ्या भाऊराव पाटलांना कसा आवडणार ! त्यांनीं आपल्या घरापासूनच सुधारणेला प्रारंभ केला.

१९२४ सालीं एक हरिजनाचा मुलगा घेऊन त्यांनीं आपल्या घरींच बोर्डिंगचा पाया घातला. लक्ष्मीबाईंना हें सर्व नवीन असल्यामुळें आरंभीं त्या बिचकत. वेळप्रसंग पडल्यास त्या विरोधहि करीत. पण पुढें निरनिराळ्या लोकांचें येणें जाणें व त्यांची उठबस करणें या गोष्टी वाढल्यानें हळूहळू तें त्यांच्या अंगवळणीं पडूं लागलें. भाऊराव एवढे करारी, पण त्यांनीं आपलीं मतें आपल्या बायकोच्या मनावर कधींच लादलीं नाहींत. 'आपण आपलें काम करीत राहावें. आपल्या बरोबर कोण येतो आणि मागें कोण राहतो याची काळजी आपण करूं नये.' हें भाऊरावांचें धोरण असल्यामुळें लक्ष्मी-बाई हळूहळू तयार झाल्या. इतक्या कीं, त्या अस्पृश्य विद्यार्थ्याला त्या आपल्या घरांतच जेवणखाण देऊं लागल्या व मुलाप्रमाणें सांभाळूं लागल्या.

पंचवीस वर्षांचा काळ लोटला. आतां अस्पृश्यतेला कायद्यानें बंदी आहे. तरीसुद्धां किती लोक अस्पृश्यांना आपल्या घरांत पाणी द्यावयास तयार आहेत ? अद्यापहि हॉटेलांतून आणि खाणावळींतून अस्पृश्य बंधूंसाठीं वेगळी सोय असलेली दिसून येते. डॉ. आंबेडकरांसारखा ऋषितुल्य विद्वानांच्या लेखणींतून उतरलेली स्वतंत्र भारताची घटनाही 'गटारांतून वाहणारी गंगा आहे म्हणून ती आम्हांस मान्य नाहीं' असें म्हणणारी शास्त्रीमंडळी अजूनहि जिवंत आहेत. मग खेड्यापाड्यांतून अस्पृश्य देवळांत शिरल्याबद्दल स्पृश्य हिंदूंनीं त्यांना ठोकल्याच्या बातम्या दररोज कानांवर आल्या तर

आश्चर्य नव्हे. व्यासपीठावरून ऐसपैस गप्पा मारणें म्हणजेच अस्पृश्योद्धार असें समजून आपल्या घराला महारमांगाचा विटाळ न होऊं देणारे बोलघेवडे लोक समाजांत जोपर्यंत आहेत तोपर्यंत असेंच चालावयाचें.

अस्पृश्याबद्दलची आज ही अशी स्थिति आहे.मग इतक्या मागच्या काळांत आपल्या घराचा महारवाडा करणारी लक्ष्मीबाई किती थोर अंत:करणाची असली पाहिजे! पुढें पुढें तर मुलेंहि बरींच वाढली. तरीहि त्या सर्व मुलांचें स्वयंपाकपाणी व सेवाशुश्रूषा त्या स्वत:च करीत. एकदां एक मुलगा फारच आजारी झाला. भाऊराव बाहेरगांवीं गेलेले आणि लक्ष्मीबाईची आई आजारी असल्याची तार आलेली. बिचाऱ्या लक्ष्मीबाईच्या मनाची स्थिति अगदीं केविलवाणी झाली. पण ती अगदीं थोडा वेळच. एक मुलगा आजारी आहे. त्यामुळें मला येतां येत नाहीं, अशी उलट तार त्यांनीं आपल्या भावास पाठविली आणि त्या मुलाच्या बिछान्याशेजारीं बसून राहिल्या. पतीच्या कार्यावर केवढी ही अढळ निष्ठा!

यापुढें भाऊरावांनीं हळूहळू संस्थेची सर्वस्वी जबाबदारी लक्ष्मीबाईवरच टाकली. त्यामुळें संस्था हेंच त्यांचें घर झालें. सर्व अडीअडचणी त्याच पाहूं लागल्या. देव तर चांगल्या माणसाची परीक्षाच पहातो. तो सणाचा दिवस होता. नेहमींप्रमाणें भाऊराव बाहेरगांवीं गेले होते. बोर्डिंगमध्यें धान्याचा कण नव्हता व कुणाजवळहि शिल्लक म्हणून दमडीहि नव्हती. मोठाच पेचप्रसंग निर्माण झाला. बरें चारदोन मुलांचा प्रश्न नव्हता. पंचावन्न मुलांच्या जेवणाच्या व्यवस्था करावयाची. येवढें धान्य उधार तरी कोण

णार ? शेवटीं त्या माउलीनें हिंदु स्त्रीचा अत्यंत आवडता दागिना सौभाग्यालंकार जें मंगळसूत्र तेंच आपल्या गळ्यांतून काढून लांच्या हातीं दिलें. मुलें घेईनात. कशीं घेणार तीं? तीं परिस्थितीनें रीब असतील. म्हणून काय दुसऱ्याच्या संततीचा आणि संपत्तीचा पहार करून स्वत:चा इमला चढविणाऱ्या ऐतखाऊ लोकांपैकीं ीं थोडींच होतीं! पण त्यांचा अगदीं नाइलाज झाला. बिचारीं ोक्साबोक्सीं रडूं लागलीं. लक्ष्मीबाईहि गहिंवरल्या. पण त्यांनीं वत:ला सांवरलें. 'सत्कार्यासाठीं कोणतीहि गोष्ट करणें अशुभ ाहीं' असें मुलांना सांगून त्यांनीं त्यांची समजूत घातली. शेवटीं ोल्हापुरी साजाचें तीन तोळ्याचें तें डोरलें एका मारवाड्याच्या ुकानांत गहाण टाकून त्यांनीं त्या दिवसाचा सण साजरा केला, ण मुलांना उपाशी राहूं दिलें नाहीं. धन्य त्या लक्ष्मीबाई ाणि धन्य तो भरतखंड ! ज्या देशांतील लक्ष्मी पददलितांच्या ल्याणासाठीं आपला सौभाग्यालंकारहि देऊन टाकते तीच ारी लक्ष्मी. आमच्या अस्पृश्य बंधूंना आतां कळीकाळहि खालीं वू शकत नाहीं.

लक्ष्मीबाईंना एकूण तीन अपत्यें झालीं. वडील मुलगा अप्पा, ुसरी मुलगी शकुंतला आणि तिसरी मुलगी बेबी. अप्पासाहेब ातारलाच राहतात. शकुंतलादेवी सासरीं असते. पण बेबी ? बी अमर झाली. म्हणतात ना, मोठमोठ्या इमारती किंवा पूल ांधीत असतां त्यांत माणसांना बळी देत. त्यामुळें त्या इमारतीला ंबीरपणा येतो म्हणे. हें जर खरें असेल तर रयत शिक्षण संस्थेचा ाजचा जो विशाल प्रासाद दिसत आहे त्याच्या पायाभरणींत बेबीनें

आत्मबलिदान केलें. ज्या भयानें तिच्या पूर्वजांनीं विजापूर सोडलें त्याचें हसत हसत स्वागत करीत ती निजधामास गेली व आपल्या पूर्वजापेक्षां श्रेष्ठ ठरली. बेबी फार गोड मुलगी. संस्थेंतील मुलांची ती जीव कीं प्राण असे. आईजवळील होता नव्हता तो सर्व कर्मठपणा या छबकडीनें काढून टाकला. पण शेवटीं तिला कायमचा चटका लावून ती चालती झाली. लक्ष्मीबाईंना हें दुःख फार जाणवलें. पण संस्थेंतील मुलांतच तिचें रूप जाणून त्यांनीं बेबीचें दुःख गिळून टाकलें.

तारीख ३० मार्च. तशांतच अमावास्या. बाळंतपणासाठीं लक्ष्मीबाईंना साताऱ्च्या सरकारी हॉस्पिटलमध्यें ठेवलें होतें. तेव्हांपासून त्यांची प्रकृति झपाट्यानें खालावत चालली होती. दुपारीं बारा वाजतां इहलोकींचे सर्व पाश येथेंच सोडून लक्ष्मीबाई आपल्या बेबीला भेटण्यासाठीं देवाघरीं निघून गेल्या. बोर्डिंगमधील मुलांनीं आपली आई गेली, म्हणून हंबरडा फोडला. भाऊराव येवढे खंबीर पुरुष. पण तेहि ओक्सा बोक्सी रडूं लागले. सबंध सातारा देवीच्या अंत्यदर्शनासाठीं दवाखान्याकडे लोटला. मरणानंतर आम्हांला माणसांचा थोरपणा कळतो. पण खरोखर लक्ष्मीबाई फारच थोर अंतःकरणाच्या बाई ! आतां आपण कांहीं जगत नाहीं, असें वाटल्यावर त्यांनीं भाऊरावांना जवळ बोलाविलें. सर्व मुलांना त्यांनीं एकदां पाहून घेतलें आणि त्या म्हणाल्या, "मी चाललें, आता या मुलांना सोडून तुम्ही कुठेंहि जाऊं नका. उद्यांचा पाडव्याचा सण. सर्वांना जेऊं घाला; आणि हें बोर्डिंगचें रोपटें मरूं देऊं नका.."

कृष्णा-वेण्णांच्या पवित्र संगमावर श्रीक्षेत्र माहुली येथें लक्ष्मीबाईंचा अंत्यविधि उरकला. प्रेतयात्रेला शेंकडों लोक उपस्थित होते. स्मशानभूमीवर अनेक लोकांचीं लक्ष्मीबाईंच्या गुणवर्णनपर भाषणें झालीं. शेवटीं भग्न हृदयांनीं आणि जड पावलांनीं लोक आपापल्या घरीं परतले.

" हें बोर्डिंगचें रोपटें मरूं देऊं नका " हें तीस वर्षांपूर्वींचे लक्ष्मीबाईंचे उद्गार आज सार्थ ठरले आहेत. नाहीं, मातोश्री हें रोपटें मेलें नाहीं आणि मरणारहि नाहीं. आपल्या आशिर्वादानें त्याचा विस्तार एवढा प्रचंड झाला आहे कीं, आतां त्याच्या सावलींत हजारों बालगोपाल तुम्ही दिलेले स्वोन्नतीचे धडे गिरवीत आहेत. पण त्यासाठीं तुम्ही किती खपलांत. ऐन तारुण्याचा काळ या रोपट्याची जोपासना करण्यांत तुम्ही घालविला. स्वतःजवळ होतें नव्हतें तें सर्व—मंगळसूत्रसुद्धां तुम्ही आमच्या पायीं खर्च केलें. मान-अपमान, फायदा-तोटा, जात-गोत, इष्ट-मित्र, सगेसोयरे हे कसलेहि प्रीतीचे किंवा भीतीचे धागे तुम्हांस बांधूं शकले नाहींत. तुमच्यासारखा जिवाभावाचा सोबती भाऊरावांना मिळाला, म्हणून त्यांना एवढें प्रचंड कार्य करून दाखवितां आलें.तुम्ही भाऊरावांच्या जीवनाची दिव्य शक्ति होता; संस्थेंतील बालगोपाळांच्या तुम्ही अधिष्ठात्री देवता होता; आणि महाराष्ट्रीय बहुजनसमाजाच्या तुम्ही भाग्यविधात्या होता. तुमची आठवण महाराष्ट्र कधींहि विसरणार नाहीं.

---

## : १८ : कर्मवीर अमर होवोत !

फोडिलें भांडार धन्याचा हा माल
मी तव हमाल भारवाही

संतशिरोमणी तुकाराममहाराज यांच्या वरील अभंगवाणी-प्रमाणें शिक्षणाचें भांडार फोडून ज्ञानाचें दालन बहुजनसमाजास उघडें करणारे भाऊराव म्हणजे महाराष्ट्रीय जनतेसमोर पडलेलें कोडें आहे. येवढया थोड्या काळांत एवढें प्रचंड कार्य कशाच्या जोरावर त्यांना करतां आलें हा एकच प्रश्न जाणत्या माणसापुढें आज उभा आहे. " बामणाच्या घरीं लिहिणं, कुणब्याच्या घरीं दाणं आणि महाराच्या घरीं गाणं " असा वाक्-प्रचार पूर्वी ऐकण्यांत येत असे. पण भाऊरावांनीं आपल्या भगीरथ प्रयत्नानें या वाक्प्रचारास जरासंधाच्या शरीरासारखा उलटाच्या पालटा करून अनादि कालापासून एकाच वर्गाच्या मालकीचें मिरासदार हक्काचें होऊन राहिलेलें हें ज्ञानभांडार फोडून, धन्याचा म्हणजे जनताजनार्दनाचा माल ज्याचा त्याला देऊन टाकला.

हें कशाच्या जोरावर त्यांना करतां आलें ? विद्वान म्हणावें तर कुठलीहि परीक्षा ते पास झाले नाहींत. मग पदवी तर दूरच राहो ! श्रीमंत म्हणावें तर साध्यासुध्या शेतकऱ्याचें त्यांचें घर. मग त्यांच्यापाशीं पैसा कुठला ? सत्ता म्हणावी तर मुलकी खात्यांत काम करणाऱ्या एका सरळमार्गी कारकुनाचे ते चिरंजीव ! सत्ता, संपत्ति आणि सरस्वती या त्रैमूर्तींचा सहवास त्यांना कधीं लाभलाच

नाहीं. मग हें एवढें प्रचंड कार्य त्यांना कसें करतां आलें ? सेवेच्या बळावर ! "विद्येनेंच मनुष्या आलें श्रेष्ठत्व या जगामाजीं" असें आजपर्यंत आम्हीं शिकत आलों. विद्यादेवीच्या उपासकांनीं स्वत:चें महत्त्व वाढविण्यासाठीं करून ठेवलल्या या ओळीचा अर्थ भाऊरावांनीं आपल्या कृतीनें बदलून टाकला. इतकेंच नव्हें, तर "सेवेनेंच मनुष्या आलें श्रेष्ठत्व या जगामाजीं" हें नवें तत्त्व त्यांनीं समाजास शिकविलें ! बळकट शरीर आणि खंबीर असें ध्येयनिष्ठ मन एवढया भांडवलावर हा सेवेचा धंदा चांगलाच किफायतशीर होतो. आणि तें त्यांना भरपूर प्रमाणांत लाभलेलेंहि आहे. मात्र सत्ता आणि संपत्तीचा वास या धंद्यास लागला तर तो आतबट्ट्याचा होण्याची भीति असते. शिवाय सरस्वतीच्या सहवासामुळें अहंगंड निर्माण होण्याचा दाट संभव असतो. म्हणूनच महात्मा गौतम बुद्धानें सत्ता आणि संपत्तीचा त्याग करून अरण्याचा मार्ग पत्करला आणि सरस्वतीची आराधना सुरू केली. पण सरस्वतीच्या कृपाप्रसादामुळें वैयक्तिक हित साधतें, पण बहुजनहित दुरावतें,असें पाहिल्यावर तिचीहि संगत सोडून ते सेवाधारी बनले. देवाधर्माच्या व रुढीच्या रगाड्याखालीं रंजल्या गांजलेल्या बहुजनसमाजाची तसेंच अज्ञानानें व दारिद्र्यानें पिळलेल्या जनताजनार्दनाची सेवा हाच खरा धर्म असें त्यांनीं पाहिलें आणि त्यांतच ते स्वत:ला आमरण वाहून घेते झाले. त्यांतूनच जगाला व्यावहारिक जीवन शिकविणारा बुद्ध धर्म निर्माण झाला. महंमद पैगंबर, येशू ख्रिस्त, महावीर यांचीं चरित्रेंहि हेंच सांगतात. राज्यकार्यधुरंधर व शूर सेनानी म्हणून इतिहासांत मान्यता पावलेल्या अकबराचा 'दीने इ-इलाही' धर्म त्याच्या मृत्यूनंतर अस्तंगत झाला. अनियंत्रित राज्यसत्ता आणि भरपूर द्रव्यबळ हाताशीं असतांहि त्याला आपल्या धर्मासाठीं चार

दोन व्यक्तींपलिकडे अनुयायी मिळवितां आले नाहींत. विद्येच्या बळावर ताठरलेल्या विष्णुगुप्त उर्फ आर्य चाणक्यानें नंदवंशाचें राज्य धुळीला मिळविलें. सत्ता, संपत्ति आणि सरस्वती यांचें सहाय्य भरपूर प्रमाणांत असतांनाहि या तिन्ही शक्तींनीं संगनमत करून जगांतील बहुसंख्य मानवाला जर्जर करून टाकलें आहे. त्यांतून सुटका करून घेण्याचा एकच एक मार्ग म्हणजे व्यवहारोपयोगी जीवन शिक्षण होय. तें शिक्षण नव्हें कीं, ज्या शिक्षणानें सत्ताधारी आणि धनिक वर्गांना सहाय्यभूत होणारे भरपूर हस्तक पुरविले गेले. तें शिक्षण नव्हें कीं, ज्या शिक्षणानें ताठरपणा निर्माण होऊन राज्येंच्या राज्यें धुळीला मिळविलीं गेलीं. तें शिक्षण नव्हें कीं, जें किसान कामगारांच्या अंगातून घामाच्या धारा वहावयास लावून त्यांच्या श्रमांतून निर्माण झालेल्या धनानें धनिकाचे खिसे भरून देते. तें शिक्षण नव्हें कीं, ज्यामुळें कोट्यावधि गोरगरीबांच्या तोंडचा अन्नाचा घास काढून त्यावर मूठभर ऐतखाऊ आणि खुशालचेंडूंच्या माड्याहवेल्या उभारल्या जातात. तें शिक्षण नव्हें कीं, जें दलिताच्या अज्ञानाचा आणि भोळे-पणाचा फायदा घेऊन त्यांचीच पिळवणूक आजपर्यंत करीत आलें. ज्या शिक्षणानें आमच्या अनंत पिढ्या हाल, कष्ट आणि ताबेदारी यांतच पिचत राहिल्या, तें कुचकामी आणि परधार्जिणें शिक्षण आम्हांला नको आहे. ब्रिटिश आमदानींत हेंच 'वाघिणीचें दूध' प्राशन करून आम्हीं काय मिळविलें ? वाघाचें बळ ? छे ! नेभळट आणि नेमस्त विचाराचे कारकून ! आणखी आम्ही काय मिळविलें ? आणि शेवटीं एखाद्या साहेबाच्या वशिल्यानें पोराबाळालाहि आपल्याच खात्यांत

चिकटवून दिलें कीं, गंगेंत घोडे न्हाले ! हेंच मधल्या कालांतील शिक्षणाचें सार ! यामुळें पोशाखीपणा व हांजीहांजीखोरपणाला ऊत आला. पूर्वींच्या काळीं निरनिराळ्या शिक्षणसंस्था विद्या-देवींचीं पूजास्थानें व ज्ञानोपासनेचीं केवळ स्थंडिलें होऊन राहिलीं होतीं. मेलेल्या जनावराभोंवतीं ज्याप्रमाणें गिधाडें जमतात त्या-प्रमाणें या शिक्षणानें विभूषित झालेले शास्त्री व पंडित या स्थंडि-लाच्या भोंवतीं जमून निरर्थक आणि शुष्क विचारांचा काथ्याकूट करीत राहिले आणि धर्माच्या नांवावर अधर्माचा वेदघोष करीत आले. त्यांचे ते मंत्र आणि तंत्र बहुजनसमाजास कधींच कळले नाहींत; आणि कळले तरी त्याचा कांहीं फायदा झाला असता, असें वाटत नाहीं. म्हणून हे टाकाऊ व दुसऱ्याची ताबेदारी करा-वयास लावणारें शिक्षण आम्हांला नको, असें ज्योतीराव फुल्यांनीं सांगितलें, महर्षि शिंद्यांनीं सांगितलें, महात्मा गांधींनीं सांगितलें व आज भाऊरावहि तेंच सांगत आहेत.

विचार, उच्चार व आचार यांचें उगमस्थान म्हणजेच शिक्षण. सत्य, सामाजिक, समता, धार्मिक व आर्थिक स्वातंत्र्य यांचा संगम म्हणजेच शिक्षण होय. निसर्गाच्या अंतरंगांत दडलेलें सृष्टि-देवींचें वैभव जेणेंकरून नित्याच्या व्यवहारांत वळवितां येईल त्याचें नांव शिक्षण. भूमातेची सुलभतेनें व समंजसपणें सेवा करून तिच्यांतून भरघोस मोतीं निर्माण करण्याची शक्ति उत्पन्न करणारें तेंच खरें शिक्षण. जें साध्य केल्यावर हाल, अपेष्टा, दारिद्र्य आणि अपमान यांना मुळीं थाराच मिळणार नाहीं त्याचें नांव शिक्षण.

ज्याच्यामुळें आमच्या मनगटांतील हिंमतीची जाणीव होऊन आम्ही जगावर मानवतेचें अधिराज्य स्थापण्यास सज्ज होऊं त्याचें नांव शिक्षण. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ' सा विद्या या विमुक्तये. ' तीच खरी विद्या कीं, जी प्राप्त करून घेतल्यावर मुक्तीचा मार्ग सुलभ होईल. व्यक्तिविकास ही समाजहिताची पहिली पायरी होय; कारण समाजाची शक्ति ही व्यक्तिविकासावरच अवलंबून असते. आणि समाजाची प्रगति म्हणजेच राष्ट्राचा उद्धार. म्हणून व्यक्ति, समाज आणि राष्ट्र यांचा एकत्वानें विकास करावयास उपयोगी पडण्याचें साधन म्हणजेच शिक्षण होय. त्याचबरोबर परीक्षेंत उच्चांक मिळविणें हें जरी कर्तव्य असलें तरी तें ध्येय ठरूं शकत नाहीं. म्हणून त्याहून श्रेष्ठतर कर्तव्य हें कीं, संपादन केलेल्या ज्ञानाचा लोककल्याणासाठीं व बहुजनसमाजाच्या हितासाठीं वापर करणें. ज्या लोकांत अगर ज्या समाजांत मी जन्मलों, त्या लोकांची अगर समाजाची शक्य तितकी सेवा करणें म्हणजेच आत्मोन्नति करून घेणें हा शिक्षणाचा खराखुरा अर्थ आहे.

भाऊरावांनीं शिक्षणाचा हा खराखुरा अर्थ समजून घेतला. राष्ट्राच्या उत्कर्षाचा एकमेव आधार म्हणजे बहुजनसमाज. या बहुजनसमाजापर्यंत शिक्षणाचा प्रसार जोपर्यंत होत नाहीं तोपर्यंत आपलें पाऊल पुढें पडणार नाहीं हें त्यांनीं जाणलें. शिक्षण म्हणजे जनता–जागृति आणि जनता–जागृति म्हणजे समाजक्रांति. आणि या समाजक्रांतींतूनच नवमानव समाज–निर्मिती असें सूत्र असल्या-मुळें त्या दृष्टीनें त्यांनीं जनता–शिक्षणास प्रारंभ केला. अनादि

कालापासून बहुजनसमाजांतून लुप्त झालेल्या या ज्ञानगंगेला या आधुनिक भगिरथानें सह्याद्रीच्या पठारावरून वाहायला लावलें. भगवान शंकराच्या शिरोभागीं विराजमान झालेली गंगामाता आपल्या तपः सामर्थ्यानें भगिरथ राजानें पृथ्वीतलावर आणून असंख्य भारतीयांना नवजीवन दिलें. त्याचप्रमाणें ब्राह्मणादि श्रेष्ठ वर्णियांच्या जवळ वसत असलेली ज्ञानगंगा भाऊरावांनीं—जनतेच्या भगिरथानें—ज्ञानगंगेविना ओसाड झालेल्या बहुजनसमाजाच्या सहारा वाळवंटांत वहायला लावली आणि अज्ञ व दरिद्री जनतेला ज्ञानदान दिलें. एकानें जीवन दिलें. दुसऱ्यानें ज्ञान दिलें. एकानें हस्तपादादि अवयवांसहीत शरीर दिलें. दुसऱ्यानें त्या निर्जीव शरीरांत ज्ञानाची चेतना निर्माण केली. एकानें शक्ति दिली. दुसऱ्यानें बुद्धि दिली. एकानें जगायला शिकविलें. दुसऱ्यानें त्या जगण्यांत स्वाभिमान, स्वावलंबन आणि धैर्य निर्माण केलें. एकानें माणूस तयार केला. दुसऱ्यानें माणसांत माणुसकी आणून नराचा नारायण बनविला; पण त्यासाठीं दुसऱ्याला फार श्रमावें लागलें; अपमानित व्हावें लागलें. तरीहि त्यानें न डगमगतां आणलेल्या ज्ञानगंगेला महानदीचें स्वरूप प्राप्त करून दिलें.

आपली शिक्षणकार्याची महत्वाची भूमिका निश्चित करण्याच्या अगोदर भाऊरावांनीं निरनिराळया भूमिका घेऊन पाहिल्या. बालपणीचा गंमतीजमतीचा काळ आजोळीं व वडिलांच्या बरोबर निरनिराळया गांवीं घालविल्यावर त्यांना शिक्षणासाठीं म्हणून कोल्हापुरास ठेवण्यांत आलें. पण उच्च शिक्षणासाठीं इंग्लंडला पाठवि-

लेला बाल रवींद्रनाथ टागोर शालामंदिरांत बसून गुरुजींच्या हातचे पाठ शिकण्याऐवजीं गुरुजींचा जो गुरुजी निसर्ग त्याच्या सान्निध्यांत एकतान होऊन मानवतेचें संगीत आळवूं लागले. निसर्गापाशीं बसून गिरविलेल्या या धड्यांतूनच पुढें जगाला मोह पाडणारी 'गीतांजली' त्यांना निर्माण करतां आली. त्याचप्रमाणें शिक्षणसंस्था आणि वसतिगृहें यांतील जाचक निर्बंध आणि घोकीव व घोटीव शिक्षण यांचा वीट आल्यामुळें भाऊरावांनीं शिक्षणाला कायमचा रामराम ठोकला आणि जनताजनार्दनाच्या सेवेविषयींचें हितगुज ते करूं लागले. त्यांतूनच पुढें 'रयत शिक्षण संस्थेचा' महान वृक्ष निर्माण झाला. परदेशाहून कुठलीहि शैक्षणिक उपाधि न मिळवितां घरीं आलेले रवीन्द्रनाथ पुढें जागतिक कीर्तीचे महाकवि झाले. याच स्वर्गीय कवनांच्या सप्तसुरांतून 'विश्व-भारतीचा' जन्म झाला. आणि कोल्हापुराहून अर्धवटच शिक्षणक्रम सोडून परत आलेले भाऊराव सेवेच्या बळावर महाराष्ट्राचे कर्मवीर बनले. कविवर्यांचें जीवन म्हणजे पौर्णिमेचें पिठोरीचें चांदणें. सुखदु:खांची भरती-ओहोटी त्यांच्या आयुष्यांत नाहींच म्हटली तरी चालेल. घरीं पिढ्यान् पिढ्या चालत आलेली श्रीमंती आणि पाठीशीं महर्षि देवेंद्रनाथांसारख्या असामान्य पित्याची नैष्ठिक शक्ति असल्यावर त्यांना आणखी काय हवें होतें ! पण भाऊरावाच्या पाठीशीं यांपैकीं कोणतीच पार्श्वभूमि तयार नव्हती. खाचखळगे आणि काटेकुटे यांच्याशीं त्यांना लहानपासूनच झगडावें लागलें. नाहीं म्हणायला मातापित्यांची प्रेमळ कृपादृष्टि हीच त्यांच्या कार्यामागील प्रभावी शक्ति

होय. झगडा, विरोध आणि संघर्ष हीं त्यांच्या पांचवीलाच पुजलेलीं. या सर्वांशीं हिरिरीनें झगडून भाऊरावांनीं रयतसेवेची पूर्ति केली. म्हणूनच भाऊरावांचा मार्ग म्हणजे यवतेश्वराच्या डोंगरावर चढण्याची अवघड पाऊलवाट. आणि टागोरांचा मार्ग म्हणजे पुण्याच्या डेक्कन-जीमखान्यावरील प्रशस्त आणि गुळगुळीत असा 'जंगली महाराज रोड' होय. दोन्ही बाजूंना नयनमनोहर बंगले, फूटपाथवरून गप्पा छाटीत चाललेले तरुणतरुणींचे तांडे, विजेचा लखलखाट, भारी किंमतीच्या मोटारगाड्यांची धांवपळ, श्रमपरिहार करण्यासाठीं संभाजी उद्यान. पण भाऊरावांच्या मार्गांत तुटलेले कडे, अफाट पसरलेल्या दऱ्या, जंगली जनावरें आणि त्यांना आश्रय देणारी किर्र झाडी. यांतून मार्ग काढून त्यांनीं आपल्या कार्याचें गौरीशंकर शिखर गांठलें.

१९१४ च्या महायुद्धानें जगांत मानवसंहाराचा यज्ञ सुरू केला. आणि त्याच वेळीं भाऊरावांच्या जीवनांत कोल्हापूरच्या डांबर प्रकरणानें आगीचा डोंब उसळविला. काय त्या यातना! यापेक्षां नरकवास पत्करला. पण यांतूनहि ते सहीसलामत बाहेर पडले. पण बाहेर पडून स्वस्थ बसण्याचें नांव कशाला? ते आगींतून उठले आणि फुफाट्यांत पडले. संस्थानी जुलमांतून बाहेर पडले आणि सैतानी जुलमांत अडकले गेले. अडकले गेले म्हणण्यापेक्षां त्यांनीं खुषीनें आपल्याला अडकवून घेतलें. अनादि कालापासून बहुजनसमाजाची शक्ति आणि बुद्धि हरण करणाऱ्या जुलमी भिक्षुक-शाहीला सैतान म्हणूं नये तर काय म्हणावें? या भिक्षुकशाहीच्या विरुद्ध उभारलेल्या ब्राह्मणब्राह्मणेतर वादाच्या बंडांत भाऊरावांनीं

खुषीनें उडी घेतली आणि 'सत्याच्या बंडानें' शिकविलेले धडे इतर विद्यार्थ्यांना ते शिकवूं लागले. भाऊराव आणि त्यांच्या सत्य-शोधकी साथीदारांनीं महाराष्ट्राची विशेषत: साताऱ्याची पडिक जमीन साफसूफ केली. पण कालांतरानें ही चळवळ थंडावली. तिच्या पुढाऱ्यांनीं तिला दगा दिला. तिच्या विरोधकांनीं राष्ट्रवादाच्या नांवावर आपला पवित्रा बदलला. त्याला कांहींजण भाळले आणि राष्ट्रवादाचें घोंगडें डोक्यावर पांघरून ते संपूर्ण देशभक्त बनले. आणि दुसरे सत्तेचे गुलाम होऊन मान, सन्मान आणि दौलत यांतच पुरेपुरे अडकले गेले. पहिल्यांनीं स्वाभिमान राखून थोडेंफार कां होईना जनताजागृतिचें कार्य केलें, पण दुसऱ्यांनीं स्वार्थ आणि रावसाहेबी—रावबहादुरी मिळविण्यापेक्षां कांहींहि केलें नाहीं. जनतेचें रक्त शोषण करणाऱ्या परकीय सत्तेचे हात मात्र त्यांनीं बळकट केले. पण आपल्या मागें कोण येतो आहे काय, आपल्या हांकेला कोण साथ देतो आहे काय, याची पर्वा न करतां भाऊरावांनीं—कट्टर सत्यसमाजिष्टानें—ज्योतिबाच्या खऱ्याखुऱ्या वारसानें—त्याच साताऱ्याच्या भूमींत रयत शिक्षण संस्थेची मुहूर्तमेढ रोवली आणि आपलें 'सत्यशोधनाचें' कार्य पुढें चालू ठेवलें.

कुठलेंहि एकच कार्य करीत राहणें, हें भाऊरावांच्या स्वभावाला मानवत नाहीं. त्याचप्रमाणें डोळ्यांसमोर दिसणाऱ्या सरळ रस्त्यानें खालीं मान घालून वाटचाल करणेंहि त्यांच्या जीवावर येते. खडी-मुरूम घालून तयार केलेल्या सडकेवरून डुगूडुगू करीत जाणारी बैलगाडी आणि सरळ रस्त्यानें धिमेपणानें पावलें टाकीत जाणारा

आयुष्याचा रथ हीं दोन्हीहि भाऊरावांच्या दृष्टीनें सारखींच ! म्हणून शिक्षणाच्या सरळ रस्त्यानें जात असतांहि आजूबाजूच्या पाऊल-वाटा त्यांनीं धुंडाळल्या. मात्र त्यांत जनताजागृतीचें अधिष्टान असलें पाहिजे यावर त्यांनीं कटाक्ष ठेवला. झापड घालून घाण्या-भोंवतीं फिरणाऱ्या तेल्याच्या बैलाप्रमाणें एकच एक चाकोरी धरून न चालतां समाजजागृतीच्या ज्या ज्या पाऊलवाटा त्यांना दिसल्या त्या त्या बाजूंनीं त्यांनीं संचार केला. त्या वेळीं लहानमोठेपणाची, साधनाच्या उच्चनीचतेची किंवा मानापमानाची त्यांनीं कधींच पर्वा केली नाहीं. कधीं त्यांनीं सत्यशोधकी तमासगिरांच्या ताफ्यांत उभे राहून डफतुणतुण्याच्या तालावर समाज संगीत आळवून बेताल भिक्षुकशाहीचे वाभाडे काढले, तर कधीं यात्रेसाठीं जमलेल्या विराट जनसमुदायापुढें उभे राहून आपल्या पहाडी आवाजांत प्रतिगामी विचारांवर तुफानी हल्ले चढविले. कधीं त्यांनीं शाळाकॉलेजांतून भरलेल्या स्नेहसंमेलनांतून विद्यार्थ्यांना स्वावलंबनाचे व स्वाभिमानाचे धडे दिले, तर कधीं शिक्षकसंघामार्फत दौरे काढून असंघटित आणि दबलेल्या शिक्षकांना एकतेचें महत्त्व पटवून देऊन त्यांची अभेद्य संघटना निर्माण केली. १९४५ सालीं झालेल्या यशस्वी शिक्षक संपाला बहुतांशीं त्यांचेच श्रम कारणीभूत झाले. साधें लग्नसमारंभाचें व्यासपीठहि त्यांनीं मोकळें सोडलें नाहीं. म्हणूनच भाऊराव पाटील महाराष्ट्रीय बहुजनसमाजाच्या हृदयांतील एकमेव देवता बनून राहिलेले आहेत.

ब्राह्मणब्राह्मणेतर वाद काँग्रेसमध्यें विलीन झाल्यावर भाऊरा-वांनीं आपल्या सेवेच्या शस्त्राला राष्ट्रवादाची धार चढविली आणि

ब्रिटिश राजवटीच्या जुलमी नोकरशाहीवर त्याचे प्रहार करण्यास सुरवात केली. नोकरशाही हादरली. तिची पोलादी चौकट छिन्नाविछिन्न झाली. १९३० ते १९४७ सालापर्यंतचे भाऊराव राष्ट्रीय लढ्यांत आघाडीवर असलेल्या साताऱ्यांतील कार्यकर्त्यांची स्फूर्तिदेवता होते.

१९४२ साल उजाडलें. काँग्रेसनें ब्रिटिश सरकारशीं अखेरचा लढा पुकारला. ८ ऑगस्ट १९४२ ला काँग्रेसचे अखिल भारतीय नेते महात्मा गांधी यांच्या नेतृत्त्वाखालीं लढण्याची योजना आखण्यासाठीं मुंबईस जमा झाले. पण निर्णय घेण्यापूर्वीच ते पकडले गेले. जनता उघडी पडली, पण निराश न होतां, मिळेल त्या शस्त्रानें व व सापडेल त्या मार्गानें ब्रिटिश सत्तेशीं ती प्राणपणानें लढली. आफ्रिकेमध्यें हिटलरच्या कडव्या सैनिकांकडून पराभवामागें पराभव खावे लागल्यामुळें ब्रिटिश सरकारचें डोकें फिरून गेलें होतें. "विझण्यापूर्वीं दिवा मोठा होतो" किंवा "विनाशकालें विपरीत बुद्धि" सुचल्यामुळें साम्राज्यसत्तेच्या नोकरशाहीनें सारासार विवेक बाजूस ठेवून नेतृत्त्वविहीन जनतेवर अमानुष अत्याचार करून लढा चिरडून टाकला. पण सरकारचें बारसें जेवलेला बहादूर सातारा अत्याचाराला अत्याचारानेंच तोंड देऊन पोलीसी जुलुमाला पुरून उरला. बिहारचा भाग सोडून सबंध देशभरची चळवळ मोडून काढण्यांत आली. पुढें बिहारहि थंड झाला. पण साताऱ्यानें प्रतिसरकारची—ग्रामराज्याची—स्थापना करून सतत चार वर्षे ब्रिटिश सत्तेशीं टक्कर दिली. नाना पाटील, पांडू मास्तर, किसन

वीर, बापू कचरे आदि क्रांतिकारक भूमिगत राहून लढ्याचें प्रभावी नेतृत्व करीत होते. पण यांना जनतेचा नैतिक पाठिंबा कुणी मिळवून दिला ? भाऊरावांनीं ! या क्रांतिकारकांचें हसत स्वागत कुणी केलें ? घरादारांवर तुळशीपत्र ठेवून देशासाठीं फकीर बनलेल्या या देशभक्तांना अज्ञातवासांत असतांना आश्रय कुणीं दिला ? साताऱ्च्या सबजेलमधून पोलिसांच्या हातावर तुरी देऊन पळालेला नागनाथ नायकवडी यानें पहिल्या तीन रात्री कुठें काढल्या ? पोलीसी अत्याचाराला तोंड कसें द्यावयाचें व निरनिराळ्या योजना पार कशा पाडावयाच्या या गुरु मसलती कुणापुढें चालत असत ? सह्याद्रीच्या पठारावर पडलेला दगडधोंडा सांगेल कीं, या रायरीच्या महादेवापुढेंच आम्हीं या स्वराज्याच्या शपथा घेतल्या. शेवटीं महात्मा गांधींची सुटका झाल्यावर त्यांच्या मध्यस्थीनें सन्माननीय तडजोड होऊन हा लढा मिटला व खवळलेला सातारा शांत झाला.

१५ ऑगस्ट १९४७ चा सोनेरी दिवस उगवला. भारत स्वतंत्र झाला. काँग्रेस सत्ता रूढ झाली. पण जिच्या सामर्थ्यावर त्यांना ही सत्ता मिळवितां आली तिला ती विसरली. इतकेंच काय, पण, लढ्याच्या वेळीं पिछाडीला राहून परकीय सत्तेशीं हात मिळवणी करणाऱ्या घरभेद्यांना मानाच्या जागा मिळून जनतेचें हित डावलण्यांत येऊं लागलें. भिक्षुकी धार्मिक गुलामगिरीच्या जोडीला बनियाची आर्थिक गुलामगिरी येऊन शेतकरी आणि कामगार वर्ग या जात्यांत भरडला जातो आहे, असें पाहिल्यावर जनतेचे आव-

डते पुढारी—भाऊरावांचे जुने मित्र—काँग्रेस सोडून बाहेर पडले. त्यांची निराशा झाली. पण कंबरा कसून अधिक नेटानें ते कामाला लागले. कसलेला जुना पैलवान म्हणून भाऊरावांकडे ते पहात आलेले आहेत. बारा वर्षें वनवास व चार वर्षें अज्ञातवासाचीं संपल्यावर हे जुने मित्र एकमेकांना मोकळेपणानें ' भेटल्यावर आमच्या सरकारला भाऊरावांविषयीं संशय येऊं लागला. तशांतच १९४८ ला गांधीजींचा खून व त्या पाठोपाठ झालेली जाळपोळ या अनिष्ट गोष्टी घडल्या. घरभेद्यांनीं सरकारचे कान फुंकले. सरकार भाऊरावांवर रुष्ट झालें. त्यांच्या संस्थेची ग्रँट अडकवून ठेवण्यांत आली. पण भाऊराव डगमगले नाहींत. ' गुराख्यानें गाई सोडल्या तरी त्यांची राखण मालकाला करणें ' भाग असल्यामुळें जनतेनें शेकडों पोतीं धान्य व हजारों रुपयांनीं रकमा भाऊरावांच्या संस्थेला देणगी म्हणून दिल्या. संस्थेतील व बाहेरच्या शेंकडों तरुणांनीं आपल्या उत्पन्नांतील ठराविक वाटा उचलून तो संस्थेकडे पाठवून दिला. संस्थेंतील छोट्या छोट्या विद्यार्थ्यांनीं एक एक दिवस मजुरी करून तें उत्पन्न संस्थेला देऊन टाकलें. प्रस्तुत लेखकाचे स्नेही मंचरचे ( जि. पुणें ) भाऊराव पाटील, यांची मुलगी कु. इंदुमती ही साताररला भाऊरावांच्या रयत शिक्षण संस्थेंत शिकत असे. हायस्कूलमध्यें शिकणाऱ्या या मुलीनें उन्हाळ्याच्या सुट्टींत गांवीं आल्यावर १५१ रुपये जमा केले व ते साताररला गेल्यावर भाऊरावांच्या हवालीं केले. अशीं एक का दोन, किती तरी उदाहरणें मिळतील. शिवाय ज्यांचा संस्थेशीं काडीचाहि संबंध नाहीं,

अशा लोकांनींहि शेंकडों रुपये सातारला पाठवून भाऊरावांवरील आपलें प्रेम व्यक्त केलें तें निराळेंच. लौकरच सरकारचा भ्रमनिरास झाला. पूर्ववत ग्रँट पुढें चालू झाली. यासाठीं त्या वेळचे महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष केशवराव जेधे व सातारा जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष स्वामी रामानंद यांनीं फार मेहनत घेतली. इतकें विस्तारानें लिहिण्याचें कारण हें कीं, भाऊराव हे जनतेचे पुढारी आहेत. "पुढारी हा जनतेसाठीं असतो. पुढाऱ्यासाठीं जनता नाहीं." ज्याप्रमाणें भाषेसाठा व्याकरणशास्त्र जन्माला आलें. व्याकरणासाठीं भाषा नाहीं. जनताकल्याण हें प्रमुख केंद्र. त्यासाठीं ज्या बाजूला व ज्या मार्गानें फिरावें लागेल तसें फिरलें पाहिजे. म्हणजे फक्त कोन बदलला पाहिजे. खरें म्हणजे हें फिरणें नसून हें स्थिरत्व आहे. सूर्य नाहीं कां आपणांला फिरल्यासारखा वाटत! पण तो फिरतो काय? त्याप्रमाणें जनतेचें कल्याण हा स्थिरबिंदु समजून त्याभोंवतीं विशिष्ट मर्यादेपर्यंत पसरलेल्या कर्क आणि मकर वृत्तापर्यंत तो जातो आहे असें दाखविणें, हें पुढाऱ्यांचें कर्तव्य आहे. त्या दृष्टीनें भाऊरावांचें पुढारीपण निरनिराळ्या वेळीं बदलत गेलें आहे, असें मानणाऱ्या माणसांनीं ते जनतेपासून दूर गेले नाहींत ही गोष्ट प्रामुख्यानें ध्यानांत ठेवली पाहिजे. शेतकऱ्यांच्या आणि कामकऱ्यांच्या हितासाठीं जे पक्ष अगर व्यक्ति झटतील ते पक्ष अगर त्या व्यक्ति भाऊरावांना जवळच्या वाटतात. म्हणूनच सत्यशोधक चळवळ ही जोंपावेतों जनहित पहात होती तोंपर्यंत ते तेथेंच काम करीत राहिले. नंतर या चळवळीची जागा कॉंग्रे-

सनें घेतली. भाऊरावांनीं तिचा उपयोग केला. काँग्रेसनें सत्ता-ग्रहण केल्यावर तीं आपल्या सेवाभावाला विसरली. मग शेतकरी कामगार पक्ष किंवा अन्य कांहीं पक्ष यांनीं ती जागा व्यापली. भाऊ-राव या होडीनें प्रवास करूं लागले. 'बहुजनसमाजाचें हित' हें त्यांचें 'साध्य' आहे आणि निरनिराळीं दिसणारीं वेषांतरें हीं साधनें आहेत. एक साधन कुचकामी झाल्यावर तें टाकून दुसरें घेणें हें सृष्टिक्रमाला धरून आहे. म्हणून तें योग्य आहे. पण इतकें असूनहि ते कुठल्याहि पक्षाचे सभासद नाहींत. पाण्यांत राहून कमळाप्रमाणें कोरडे ठणठणीत. जोपर्यंत ज्या नंबरची आरशी चालते तोपर्यंतच तिचा उपयोग करावयाचा आणि नंतर ती बदलून नव्या नंबरची नवी आरशी डोळ्यांवर चढवावयाची व हें त्याचें धोरण. डोळ्यांचें रक्षण झालें पाहिजे. मग कितीहि आरशा बद-लाव्या लागल्या तरी हरकत नाहीं.

यामुळें रंग आणि रूप पाहून बिचकणारे नवेजुने टीकाकार भाऊरावांवर निरर्थक टीका करून आपल्या लेखणीला व्यर्थ शीण देतात. म्हणून धार्मिक तसेंच सामाजिक व शैक्षणिक तसेंच राज-कीय आखाड्यांत उतरून बहुजनसमाजाची सेवा करणाऱ्या भाऊरावांचें सर्वगामित्व जाणण्याइतपत शक्ति टीकाकारांच्या लेख-णींत नाहीं, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. महात्मा फुले अध्या-पक विद्यालय, जिजामाता विद्यालय, ठक्करबापा विद्यालय, महर्षि शिंदे विद्यालय, छत्रपती शिवाजी विद्यालय, छत्रपती शाहू

बोर्डिंग, महात्मा गांधी वसतिगृह इत्यादि मूळ संस्थेच्या शाखोपशाखांना दिलेल्या नांवावरूनहि भाऊराव बहुजनसमाजाला जवळचे कां वाटतात हें समजून येईल. बहुजनसमाजांतीलच कर्तबगार आणि ध्येयनिष्ठ व्यक्तींचीं नांवें आपल्या संस्थेतील विभागांना देऊन पर्यायानें त्यांचें आदर्श आणि त्यागी जीवनच विद्यार्थ्यांपुढें ठेवण्याचें औचित्य भाऊरावांनीं साधलें आहे.

जोडा कुठें चावतो आहे, हें पायांत घालणाऱ्यालाच समजतें. त्याप्रमाणें भाऊराव शेतकऱ्यांतच जन्मले असल्यानें त्यांचें दुखणें कोणतें आहे, हें त्यांनीं बरोबर ओळखलें. या रोग्याची शारीरिक तशीच मानसिक आणि आर्थिक स्थिति त्यांना पूर्णपणें माहिती असल्यामुळें त्यांनीं त्याच्या या महारोगावर शिक्षणाची दिव्यौषधी शोधून काढली. हें औषध घेण्याइतपत आर्थिक ताकत त्याच्याजवळ नाहीं असें पाहिल्यावर तें शिक्षण मोफत देण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. शिक्षण मोफत देऊनहि पोटाची गैरसोय दूर करतां येइना, असें पाहिल्यावर त्यांनीं त्याच्या हातीं स्वावलंबनाची खोरेंपाटी दिली; आणि निव्वळ शिक्षणानें प्रगति होते, पण विषमता तशीच दबा धरून राहते आहे हें पाहिल्यावर शिक्षणाबरोबरच त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांना समतेचीं इजेक्शनें द्यावयास प्रारंभ केला. मोफत शिक्षण, स्वावलंबन आणि समता या तिन्ही औषधांचा एकदांच मारा चालू केल्यामुळें रोगी खडखडीत बरा तर झालाच, पण त्याहिपुढें त्यानें मजल मारली. ज्यांचें जीवन निव्वळ भिक्षेवरच असावयाचें असे अनेक विद्यार्थी आज विधिमंडळाचे सभासद अगर स्थानिक स्वराज्य

संस्थांतून जबाबदारीचीं कामें पार पाडीत असतांना आपणांस दिसतील. त्याचप्रमाणें शिक्षण घेऊन बाहेर पडल्यावर त्यांना कोण-त्याहि प्रकारचें काम करण्यास लाज वाटत नाहीं. उलट 'लाथ मारीन तिथें पाणी काढीन' असा स्वाभिमान त्यांच्या अंगीं निर्माण होतो. त्याचप्रमाणें आपल्या कामांतील अगर व्यवहारांतील शेजारी यांच्याशीं तो उच्चनीचत्वाचा भेदभाव ठेवीत नाहीं. अशा प्रकारचा मोफत आणि स्वावलंबी शिक्षणाचा प्रयोग जगांत फक्त सोव्हिएट रशि-यानेंच आचरणांत आणला आहे. पण त्याच्यामागें सरकारचें पाठबळ आहे. भाऊरावांनीं स्वतःच्या हिंमतीवर येथेंच रशिया निर्माण केला आहे व शेंकडों कार्यकर्ते समाजसेवक, प्राचार्य, आचार्य, अध्यापक व प्राध्यापक तयार केले आहेत.

भाऊरावांची संस्था जरी राजकारणापासून अलिप्त असली तरी पक्षोपक्षांचीं विचाराचीं प्रात्यक्षिकें त्या ठिकाणीं चाललेलीं आप-णांस दिसून येतील. म्हणजे निरनिराळ्या पक्षांतील पुढाऱ्यांचीं बौद्धिकें ऐकविलीं जातात, असें नव्हें तर त्यांची विचार-सरणीच विद्यार्थ्यांच्या जीवनांत बाणलेली दिसून येते. तेथें हरिजनसेवा व ग्रामसफाई हा कॉंग्रेसचा कार्यक्रम ज्या प्रमाणांत चालतो त्याच प्रमाणांत स्वतः शेती करून त्यांतील उत्पन्न स्वतःच खाणें—'म्हणजेच कसेल त्याची जमीन' हा समाजवादी कार्यक्रमहि चालतो. त्याच प्रमाणांत 'ठोशास ठोसा' देण्याची कम्युनिस्टांची दहशतवादी विचारप्रणाली मूळचीच विद्यार्थ्यांच्या अंगीं असल्यामुळें यांच्या वाटेस जाण्याचें धाडस कुणालाहि होत नाहीं. सामुदायिक

शेती व सहकार्यानें काम हा साम्यवादाचा मूळ सिद्धांत येथील विद्यार्थ्यांच्या दररोजच्या व्यवहारांत आपणांस दिसून येईल. अशा प्रकारें शैक्षणिक कार्याबरोबरच विद्यार्थ्यांची सांस्कृतिक, आर्थिक व राजकीय सुधारणा कशी होईल याची भाऊराव अहोरात्र काळजी घेतात. पुणें हें पेशवाईपासून शिक्षणाचें केंद्र समजलें जातें. पण तें विशिष्ट वर्गापुरतेंच. पण सातारा हें खरेंखुरें बहुजनसमाजाचें शिक्षणकेंद्र बनलें पाहिजे, अशी भाऊरावांची तळमळ आहे. गोरगरीबांचें विद्यापीठ म्हणावयाचें आणि गरीबांची शैक्षणिक नाकेबंदी करावयाची, ही तमासगिरी भाऊरावांना आवडत नाहीं. गरीबांच्या कल्याणाचा टिळा कपाळाला लावून आपल्याच जातभाईंचें भरताड भरावयाचें या जात्यंध मनोवृत्तीची भाऊरावांना भयंकर चीड येते. म्हणून त्यांनीं आपल्या संस्थेतून तयार झालेल्याच विद्यार्थ्यांच्या हातांत संस्थेचीं सूत्रें ठेविलीं आहेत. आपण याच संस्थेंतून शिकून लहानाचे मोठे झालों ही कृतज्ञताबुद्धि सतत डोळ्यांपुढें राहिल्यामुळें तो संस्थेची सेवा एकनिष्ठेनें व प्रामाणिकपणानें करीत असतो. शिवाय तो सहकाऱ्यांबद्दल अविश्वास ठेवीत नाहीं. शिवाजी महाराज गडाची व्यवस्था किल्लेदार मराठा, कारखानीस प्रभू व फडणवीस ब्राह्मण अशा तीन जमातींकडे सोपवीत. त्यामुळें गडाचें संरक्षण होऊन आपसांतील एकजूट कायम राहाण्यास मदत होत असे. हीच योजना भाऊरावांनीं आपल्या प्रत्येक गडावर—संस्थेवर—केली आहे. कुठल्याहि एका जमातीच्या हातांत संस्थेचें काम ते कधींहि सोपवीत नाहींत. त्यांची कोणतीहि शाखा पहा. तेथें महार, मांग,

मराठा, ब्राह्मण, मुसलमान हीं पंचमहाभूतें असायचींच. अशा प्रकारें सातारा हें गरीबांच्या शिक्षणाचें केंद्र बनविण्याचा भाऊरावांचा दृढ विश्वास आहे.

संस्थेच्या निरनिराळ्या ठिकाणीं अनेक शाखा असल्यामुळें त्या त्या प्रत्येक ठिकाणीं प्रत्येक शिक्षकानें अगर प्राध्यापकानें काम केलें पाहिजे, असा भाऊरावांचा दंडक आहे. त्यामुळें शहर व खेडें असा भेद राहात नाहीं. सर्व घरांतील विद्यार्थ्यांशीं व परिस्थितीशीं सहवास करावा लागल्यानें कार्यकर्त्यांत अहंगड निर्माण होत नाहीं व एकाच ठिकाणची आसक्ति किंवा मोह टाळला जातो. विद्यार्थ्यांना निरनिराळ्या विषयांत तज्ज्ञ असलेल्या शिक्षकांच्या ज्ञानाचा फायदा होतो आणि लोकसंग्रह वाढतो.

शिक्षणाच्या कार्यांत जसा वर्णभेद आणि वर्गभेद नको तसाच लिंगभेद पण नको, असें भाऊरावांचें मत आहे. म्हणून त्यांनीं स्त्रीशिक्षणालाहि हात घातला. कोणी खास अस्पृश्यांसाठींच बोर्डिंग चालवितो आहे, तर कोणी खास स्त्रियांसाठींच आपणांस वाहून घेतलें आहे. पण भाऊरावांनीं सगळ्याच कार्यांना सारख्याच प्रमाणांत हात घातला आहे. शेतकऱ्यानें आपल्या शेतांत एकच पीक काढावयाचें ठरविलें, तर त्याला नुसती भाकरी तर भाकरीच अगर भात तर भातच खावा लागेल. त्याचें जीवन थोडेंच नोकरदारासारखें आहे ? म्हणून तो एका पट्टींतून शाळू तर दुसऱ्या पट्टींतून गहूं आणि तिसऱ्या पट्टींतून कडधान्यें अशीं निरनिराळीं पिकें काढतो व आपल्या सर्व प्रकारच्या गरजा भागवितो. त्याप्रमाणें

भाऊरावांनीं सगळ्याच प्रकारची शेती एकदमच लागवडीला आणून तिच्यांत शिक्षणाचें बियाणें पेरून दिलें आहे. जमिनीच्या मगदुरा-वर व खतपाण्याच्या बळावर दरसाल बरेंच पीक ते काढीत आलेले आहेत.

नागपूरचे एक प्रकाशक साहित्यिक व मोठमोठे समाज-सेवक यांचे संदेश गोळा करीत आहेत. भाऊरावां-कडूनहि त्यांनीं असाच एक संदेश नेला. तोच येथें उधृत करतों. म्हणजे भाऊरावांचा शिक्षणाविषयींचा दृष्टिकोन समजून येईल. भाऊराव म्हणाले, " हिंदुस्थानची खरी सुधारणा व्हावयाची असेल तर खेडोपाडीं सक्तीचें आणि मोफत शिक्षण देणाऱ्या शाळा निघाल्या पाहिजेत. त्या शाळांतून काम करणारा शिक्षकवर्ग ट्रेंड (Trained) असला पाहिजे. हिंदुस्थान देश हा शेतकीप्रधान असल्यामुळें या शाळांतून शेती मूलोद्योग हा माध्यम धरून बाकीच्या विषयाचें शिक्षण दिलें पाहिजे. शिक्षणांतून जात, धर्म आणि लिंग यांचें उच्चाटण केलें पाहिजे. मागासलेले शेतकरी आणि कामगार या वर्गांतील मुलांना अधिक सवलती मिळाल्या पाहिजेत. तरच स्वराज्याचा उपभोग सर्व लोकांना सारख्याच प्रमाणांत मिळेल. यासाठीं शेकडों रयत सेवक आपल्या देशांत पैदा होवोत."

स्वराज्याचा खराखुरा उपभोग बहुजनसमाजास मिळावयास हवा असेल तर शिक्षणांत चाललेली साठमारी थांबविली पाहिजे, अशी भाऊरावांची खात्री होऊन चुकलेली आहे. बहुजनसमा-जाच्या उन्नतिविषयीं केवढी तळमळ त्यांना लागून राहिली

आहे ! ते आपल्या स्वाक्षरीच्या खालीं रयतसेवक असा उल्लेख मुद्दाम करतात. नुसता उल्लेख केला असता तर मग त्यांना कर्मवीर कोण म्हणाले असते ? पण आईपासून तोडून आणलेल्या गोर-गरिबांच्या मुलांची भाऊराव रात्रंदिवस कशी काळजी वाह-तात हें पाहिल्यावर आपणांस त्यांच्या कर्तृत्वाचें कौतुक वाटेल. लहान लहान मुलांना बोर्डिंगमधील भाकरीआमटीचें जेवण मानवेना. तेव्हां त्यांच्यासाठीं त्यांनीं गाई व म्हशी ठेवल्या आणि थोडें थोडें दूध ते प्रत्येकाला देऊं लागले. पण यापेक्षां मोठ्या प्रमा-णांत दुधाचा प्रश्न सोडवावा या हेतूनें १९४१ सालीं भाऊरावांनीं सहकारी सोसायट्यांच्या सरकारी अधिकाऱ्यापुढें खालील योजना ठेवली होती. "डेअरी सहकारी सोसायटी काढून गाई व म्हशी पाळणें, त्यांच्या चाऱ्याची व्यवस्था करणें, त्यासाठीं सामुदायिक शेती करणें, उत्तम जातींच्या जनावरांची पैदास करणें इत्यादि धोरण साध्य होत असेल आणि सरकार थोड्याबहुत प्रमाणांत साहाय्य करणार असेल तर अशी जबाबदारी आमची संस्था अंगावर घेईल व ती पार पाडून दाखवील." ठरल्याप्रमाणें वरील योजनेस वाटाण्याच्या अक्षता लावण्यांत आल्या. पण त्यावरून भाऊरावांच्या अंत:करणांत चाललेली खळबळ आपणांस दिसून येईल. आणि कोणताहि प्रश्न घेतला तरी त्याच्या मुळाशीं जाऊन शेतकरी आणि कामगार वर्गाच्या हितालाच ते कसे जपत असत हें यावरून पडताळून पाहतां येतें. "आम्ही जितकें दूध प्यालों तितकें ताकहि माझ्या मुलांना देतां येत नाहीं याबद्दल

मला फार वाईट वाटतें" असें भाऊरावांना कळवळून बोलतांना पाहिलें कीं, भडभडून येतें. दूध देतां येत नाहीं, म्हणून ते प्रत्येक मुलाला शेंगदाणे, गूळ व कांजी; आणि अगदीं लहान मुलांना दूध देतात. शिवाय शेतांत निघणारें सर्व उत्पन्न ऊस, केळीं, फळफळावळ, भाजी-पाला आणि धान्यें यापैकीं एक पैचीहि विक्री न करतां तें सगळें ते मुलांनाच खायला घालतात. राष्ट्राच्या भावी पिढीची त्यांनीं किती काळजीपूर्वक जोपासना चालविली आहे !

आज भाऊरावांचें वय पासष्ट वर्षांचें आहे. त्यांचा उत्साह कोणाहि तरुणाला लाजविण्यासारखाच आहे. १९१० ला म्हणजे वयाच्या ऐन पंचविशींत त्यांनीं सार्वजनिक कार्याला सुरवात केली. सतत एक्केचाळीस वर्षे झगडून त्यांनीं धार्मिक, सामाजिक, राजकीय आणि प्रामुख्यानें शैक्षणिक कार्य केलें व आपला प्रचंड देह कामाच्या गर्दीनें घाईला आणला. तरी पण त्यांचा उत्साह आणि कार्य हीं शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें वाढलीच लागलीं आहेत. इतक्या उतार-वयांत सुद्धां छाती काढून चालणें, सगळ्या जगाला गवसणी घाल-ण्याचें सामर्थ्य या मनगटांत आहे या आविर्भावानें दुसऱ्याकडे थोड्या कुऱ्यांतच पहाणें, धन्याच्या अडचणीची जाणीवच जणूं करून देणारी ती हातांतील वेडीवाकडी व ओबडधोबड काठी, दुष्मानाला एकाच धावांत चीत करीन या आत्मविश्वासानें तिची धरण्याची ऐट, समुद्रमंथनांतून काढलेलें हलाहल वीष पचवि-णाऱ्या नीलकंठाप्रमाणें जगांतील सर्वच कृष्णकृत्यें आपल्या शिरावर घेतल्यामुळेंच कीं काय लाभलेला कृष्ण वर्ण आणि त्यावर रुळ-

णारी पांढरी शुभ्र दाढी, पहाडी आवाज, स्पष्ट आणि सडेतोड बोलणें, अधून मधून विनोद आणि मधून अधून हृदयाची विशालता दाखविणारें मोकळें हास्य असे भाऊराव पाहिलें कीं, शेंकडों तरुण वाटेल तें दिव्य करायला तयार होतात. म्हणून भाऊराव हे ब्रह्मदेवापेक्षांहि [ असेल तर ] सातारच्या तरुणांना मोठे वाटतात. धनिणीच्या बागेंत असलेल्या शाहू बोर्डिंगमधून राजवाड्यावरून चार भिंतींकडे जातांना भाऊराव एखाद्या विजयी नरकेसरीसारखे वाटतात. त्यांच्यावर प्रेम करणारे अनेक लोक आहेत. त्यांपैकीं कोणी रस्त्यांत भेटलाच तर, "कायरे, कसं काय चाललंय तुझं ?" अशी ते आपुलकीच्या भावनेनें त्यानें चौकशी करतील आणि पुन्हां गंभीरपणानें पावलें टाकीत पुढें चालूं लागतील. जणूं काय जगांतील संकटांना प्रत्येक पावलागणीक ते पाताळांतच ढकलीत आहेत, असा त्या वेळीं भास होतो.

भाऊरावांची राहणी अगदीं साधी आहे. खाणेंपिणें सुद्धां मोजकें व सर्वसाधारण. आज भाऊराव भारतीय कीर्तीचे झाले असतांहि त्यांची ही राहणी. मग लहानपणीं तर महारामांगांच्या व गुराखी पोरांच्या बरोबर फिरणारा भाऊ अगदींच साधा असेल यांत नवल नाहीं. मोठ्या माणसांच्या कर्तबगारीवरून ज्योतिषी त्याची कुंडली तयार करतो व अमूक अमूक ग्रह उंचीचे असल्यामुळें हा माणूस पुढें मोठा होणारच होता, असा आपला होरा वर्तवितो. पण भाऊराव पाटलांच्या लहानपणावरून असें कांहीं अचाट भविष्य वर्तविणारा वेडा ज्योतिषी भेटला होता असें वाटत

नाहीं. अगदींच चारचौघांसारखें साधें जीवन. त्यांतल्या त्यांत अधिक खोडकर व उनाडक्या करणारा हेंच त्यांचें लहानपणींचें वर्णन. एखादा माणूस आपल्या कर्तबगारीवर पुढें आला, तर त्याचा एखाद्या राजघराण्याशीं अगर एखाद्या थोर पूर्वजाशीं संबंध जोडण्याचें वेडच आमच्या लोकांना लागलेलें आहे. प्रस्तुत लेखकहि या वेडापासून मुक्त नाहीं. पण यामुळें त्या व्यक्तीच्या कार्याला गौणत्व येतें, ही गोष्ट आपल्याला मान्य करावी लागेल. शिवछत्रपति आपल्या कर्तबगारीवर मोठे झाले, पण आमचे इतिहासकार त्यांचा संबंध शिसोदिया वंशाशीं जोडून आणि त्यांच्या यशाचें माप रामदासाच्या झोळींत टाकून मोकळे झाले. पूर्वजांची पुण्याई किंवा सज्जनाच्या संगतीचा लोभ होत असेलहि. पण खरा वाटा त्या व्यक्तीच्या कर्तृत्वाकडे असतो. तिकडे डोळेझाक केली जाते. त्यामुळें सामान्य माणसाला तें चरित्र आकर्षक वाटलें तरी ते आपल्यांतील वाटत नाहीं. त्यामुळें त्याला ती व्यक्ति मार्गदर्शक न वाटतां पूजनीय वाटते.

भाऊरावांच्या कार्याची तरफदारी करावयास ज्योतीषाची मुळींच गरज नाहीं. त्यांचें मनगट हेंच त्यांचें ज्योतिष. त्या मनगटाच्या भीमपराक्रमावरच त्यांनीं हा हिमालय हलविला. मूर्तीपूजा, भिक्षुकशाहीचें बंड, अनिष्ट रूढि, खोट्या धार्मिक समजुती, अस्पृश्यता, मजुरांची पिळवणूक यांवर त्यांनीं कठोर हल्ले चढवून बहुजनसमाजाला जागें केलें. जुन्या मताचे आईबाप व सनातनी वळणाची पत्नी यांना त्यांनीं आपल्या कार्यानें वश करून सहभागी केलें. निरनिराळ्या जातिधर्माच्या बाळगोपाळांना एकत्र आणून त्यांना

त्यांनीं मानवी धर्माचें शिक्षण दिलें. मानापमानाच्या अगर सत्ता-संपत्तिच्या मार्गे न लागतां दरिद्रीनारायणाचें व्रत स्वीकारून त्यांनीं स्वबांधवांचा सेवा केली. दारिद्र्याची दीक्षा घेऊन अकिंचन राहण्यापेक्षां मनांत आणलें असतें तर भाऊराव एक प्रसिद्ध कारखानदार झाले असते. पण त्यांनीं घरीं चालून आलेल्या कारखानदारीवर लाथ मारून सेवेचा खडतर मार्ग स्वीकारला आणि 'रयतसेवक' ही पदवी सार्थ केली. मराठा आणि महार या जमातींच्या भवितव्याबद्दल भाऊराव दांडगा आशावाद बाळगून आहेत. म्हणूनच "मराठा आणि महार या दोन जमातीं एकत्र आल्या तर राजकारणांत किंवा समाजकारणांत आजची दिसणारी शैथिल्यता कुठच्या कुठें पळून जाऊन महाराष्ट्र आणि त्याचबरोबर हिंदुस्थान बलशाली झाल्याशिवाय राहणार नाहीं." अशी कर्मवीरांना खात्री वाटते. कर्मवीर द्रष्टा असतो. उद्यांच्या गोष्टी त्याला आज कळतात. त्यावरून वर्तविलेलें हें भविष्य खरें होणारच, असें धरून चालावयास हरकत नाहीं.

आधीं केलें व मग सांगितलें, या कर्मवीरांच्या वागणुकीमुळें संस्थेला फारशी प्रसिद्धी आजपर्यंत मिळाली नव्हती. पण कर्मवीरांच्या चाळीस वर्षांच्या दीर्घ तपश्चर्येनें त्यांच्या कार्याला लागलेल्या मधुर फळाफुलांचा सुगंध चहूं दिशांना दरवळूं लागल्यानें जाहिरातीविनाच संस्थेची जाहीरात आज जनतेच्या हृदयापर्यंत जाऊन पोंचली. पण त्यासाठीं त्यांना किती खपावें लागलें आणि आजहि खपावें लागत आहे; आतां वयोमानानें त्यांची प्रकृति थोडी स्थूल व बोजड झालेली आहे. त्यामुळें डॉक्टरनें त्यांना विश्रांतीच घ्यावयास सांगि-

तलें आहे. पण ज्या वेळेस विश्रांति घ्यावयाची त्याच वेळीं त्यांनीं आपल्या कामाचा व्याप आणि धडाडी इतकी वाढविली आहे कीं, ती पाहून तरुणहि तोंडांत बोटें घालतील. लहानपणापासून कोण-त्याहि कामांत माघार ही त्यांना ठाऊकच नाहीं. विद्यार्थीदशेंत कोल्हापूरच्या रंकाळा तलावांत पोहतांना एकाच दमांत ते त्याचा वेढा काढीत. त्या वेळेचा उत्साह आणि सातार्‍याहून निघून सोला-पूरचें हायस्कूल बघायचें व येतां येतां दौंडवरून नगर जिल्ह्यांतील शाखा पाहून पुन्हां पुण्याला युनियन बोर्डिंग हौसमधें वस्तीला यायचें, हा शेकडों मैलांचा फेरफटका मारण्याचा त्यांचा आजचा उत्साह दोन्हीहि अगदीं सारखेंच. हाच त्यांचा उत्साह आणि उमेद त्यांना शतायुषी करो, अशीच आपण परमेश्वराजवळ प्रार्थना करूं.

ज्योतिरावांनीं ही महाराष्ट्राची खडकाळ जमीन आपल्या सत्यशोधकी नांगरानें नांगरली. महर्षि शिंदे यांनीं शुद्ध मानवतावाद व जहाल राष्ट्रवाद यांचा कुळव घालून ती जमीन कुळवली. जेधे-जवळकर, बागल–भागडे, पाटील–यादव या सत्यशोधकी मंडळींनीं त्या जमिनींतील दगडधोंडा, काशाकुंदा वेंचून ती साफसूफ केली. आणि कर्मवीर भाऊरावांनीं त्या जमिनींत स्वावलंबनाचें खत व समतेचें पाणी घालून शिक्षणाचा मळा पिकविला. तीन तपांनंतर त्या मळ्यांतील फळाफुलांचा आस्वाद महाराष्ट्र चाखूं लागला आहे. महाराष्ट्र या महापुरुषाचें ऋण कधींहि विसरणार नाहीं. महारा-ष्ट्राच्या भाग्यविधात्या देवतांनो, मराठ्यांचा हा महाराष्ट्र तुम्हांला वंदन करीत आहे. कर्मवीर अमर होवोत !

---

## : १९ : शाहू बोर्डिंग

आतांपर्यंत या वसतिगृहांतून ४०० विद्यार्थी मॅट्रिक पास झाले असून त्यांपैकीं ५० जण निरनिराळ्या ठिकाणीं उच्च शिक्षण घेत आहेत. येथूनच आतांपर्यंत २०० पदवीधर झाले. पैकीं २० जण संस्थेचे आजीव साभासद आहेत. त्यांनीं संस्था सांगेल तें काम व देईल तें वेतन घ्यावयाचें स्वखुषीनें कबूल केलें आहे. या आजीव सभासदांत १० मराठे, २ ब्राह्मण, २ साळी, २ जैन, १ कोष्टी, १ मुसलमान, १ धनगर व १ गुजर असे आहेत. हल्लीं वसतिगृहांत २७५ मराठे, २५ ब्राह्मण, २ प्रभू, १५ लिंगायत, १८० हरिजन, १५ जैन, १० मुसलमान, ५ ख्रिश्चन व बाकीचे इतर जमातींपैकीं असे ५५० विद्यार्थी राहतात. यांतील १५० मुलें रिमांड होम-मधून आलेलीं आहेत. त्यांच्यापैकीं १ उच्च शिक्षण, २ ट्रेनिंग कॉलेजचें शिक्षण, १ धंदेशिक्षण, २४ दुय्यम शिक्षण व १२२ प्राथमिक शिक्षण घेत आहेत.

वसतिगृहांतील साफसफाईपासून ते हिशेब ठेवण्यापर्यंतचीं सर्व कामें मुलेंच करतात. स्वयंपाकाचें काम मात्र आळीपाळीनें. सर्वांचा स्वयंपाक एकत्र.जेवण एकाच पंक्तींत व सर्वांना एकाच प्रकारचें चालतें. शिक्षण आणि राहणें एकाच ठिकाणीं. त्यामुळें कसल्याहि प्रकारचा भेदाभेद तेथें मानला जात नाहीं. प्रस्तुत लेखकास इतर ठिकाणीं

चाललेल्या कांहीं बोर्डिंगमधून प्रत्यक्ष राहाण्याचा व बरीचशीं पहाण्याचा लाभ मिळाला आहे. पुण्यासारख्या सुधारलेल्या शहरांत सुधारकाग्रणी म्हणून नांवाजलेल्या एका फार थोर व्यक्तीनें चालविलेली स्त्रीशिक्षण संस्था मीं पाहिली. तेथेंहि जेवणाचे व राहणीचे दोन वर्ग पाडलेले प्रत्यक्ष पहावयास मिळाले. याच पुण्यांत खास मराठ्यांसाठीं चालविलेलीं शेजारीं शेजारीं असलेलीं दोन वसतिगृहें भिन्न वर्गांतील मराठ्यांसाठीं आहेत, असें चौकशी करतां समजलें. तीच परिस्थिति कोल्हापुरांतहि अनुभवावयास मिळाली. श्रीमंत वर्गासाठीं एक व सर्वसाधारण जमातींसाठीं एक अशीं दोन वसतिगृहें मराठे व तत्सम यांसाठींच चालविलेलीं पहावयास मिळालीं. जात आणि वर्ग नष्ट करण्यासाठीं ज्या एका थोर माणसानें एक अखील भारतीय पंथच स्थापन केला त्या पंथामार्फत चाललेल्या एका वसतिगृहांत जेवणांतील हे भेद अगदीं ठळकपणें केले जातात, हें प्रत्यक्ष अनुभविण्यास मिळालें. खास अनाथ विद्यार्थ्यांसाठीं चालविलेल्या पुण्यांतील एका संस्थेंत अगदीं ठराविक जातीचेच लोक घेतात. नाहीं म्हणायला नांवासाठीं थोडींफार मुलें इतर जातींची असतात. पण त्यांच्या जेवण्याच्या व कामाच्या बाबतींत चांगलाच भेदाभेद केला जातो, असें तेथें राहून प्रत्यक्ष अनुभव घेतलेल्या विद्यार्थ्यांकडून कळलें.

कृष्ण, सुदामा आणि सांदिपनी अशीं उदाहरणें आम्हीं पोथ्यापुस्तकांतून वाचतों व पाठ्यपुस्तकांतून ठेवलेले त्यांचे धडेहि अभ्यासितो. पण व्यवहारांत मात्र अनुभव वेगळाच

येतो. विद्यार्थी म्हटला कीं तो विद्यार्थीच. मग त्याचे जसे जाती-वरून वर्ग नकोत तसेच परिस्थितीवरूनहि नकोत. त्याला एकच प्रकारच्या सुखसोयी असल्या पाहिजेत. ज्यांना सर्वसाधारण विद्यार्थ्यांचें जेवण आवडत नसेल व राहणी खालच्या प्रतीची वाटत असेल त्यांनीं आपली सोय मोठमोठ्या गेस्ट हाऊसमध्यें करावी. त्यांची सोय व मिजास वसतिगृहांत नको. आमच्या सरकारनें वसति-गृहांना असलेलीं जातिवाचक नांवें काढून टाकण्यास सांगितलें. त्याप्रमाणें बऱ्याच शिक्षणसंस्थांनीं चालविलेल्या वसतिगृहांचीं नांवें बदललीं, पण व्यवस्था मात्र पूर्वींचीच राहिली. या अंतर्गत व्यवहाराकडेहि आमच्या सरकारचें लक्ष पाहिजे, असें म्हणण्याची पाळी येते. वसतिगृहामध्यें ही स्थिति मग शिक्षणसंस्थांतून एकाच वर्गाची भरती होत असेल तर नवल नव्हे. तरीहि नावांच्या भारद-स्तपणावर आमचें सरकार या शिक्षणसंस्थांना ग्रँटस् देत असते.

इतकें विस्तारानें लिहिण्याचें कारण कीं, भाऊरावांच्या संस्थेंत असला कोणत्याच प्रकारचा भेदाभेद चुकूनहि पहावयास मिळणार नाहीं. विद्यार्थी ब्राह्मण असो अगर मांग असो. तो कॉलेजमधील असो अगर प्राथमिक शाळेंतील असो. तो श्रीमंताचा असो अगर गरीबाचा असो. जातीच्या, शिक्षणाच्या किंवा परिस्थितीच्या नांवावर त्याला सवलत मिळणार नाहीं. सवलत एकाच अटीवर. फक्त वयोमानावर. बाकी मग नेमून दिलेलें कसलेंहि काम त्यानें केलेंच पाहिजे. त्यानें सर्वांसाठीं असलेल्या साध्यासुध्या इमारतींतच राहिलें पाहिजे व सर्वांसाठीं व सर्वांनीं मिळून केलेलें जेवणच

घेतलें पाहिजे, असा संस्थेचा दंडक आहे. स्वयंपाक करणें, भांडीं घांसणें, संडास साफ करणें, शेती करणें हीं सर्व कामें प्रत्येक मुलाच्या वाट्यास येतात. सगळीं कामें कशीं अगदीं यंत्रासारखीं चालतात, तें प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय समजावयाचें नाहीं. ज्यांनीं त्या धनिणीच्या बागेंतील वटवृक्षाखालीं बसलेल्या मुलांच्या जेवणाच्या पंगती पाहिल्या असतील त्यांना तर ऋषिकालीन गुरुकुलांची आठवण झाल्याशिवाय खास राहणार नाहीं.

हें बोर्डिंग सातारा शहराच्या पश्चिम भागांत छत्रपतींच्या मालकीच्या असलेल्या ' धनीणीच्या बागेंत ' आहे. छोट्या छोट्या बांधलेल्या इमारती सोडल्या तर बरीच जमीन शेतीच्या उपयोगाची आहे. सालभर लागणारा भाजीपाला याच जमिनींतून स्वतः मुलेंच खपून निर्माण करतात. बोर्डिंगसमोरच एक प्रचंड विहीर आहे. तिच्यावर इंजिन बसविलें आहे. तें कै. सर धनजी शहा कूपर यांच्याकडून देणगी म्हणून मिळालें आहे. त्यांतून शेतीला पाणी पुरविलें जातें व सर्व संस्थांना लागणारें दळण दळलें जातें. शेतींतून निघणाऱ्या सर्व उत्पन्नाचा उपभोग मुलांनींच घेतला पाहिजे, असा भाऊरावांचा कटाक्ष आहे. गेल्या सालची गोष्ट. जवळ जवळ दोन तीन एकर ऊंस मुलांनींच लावला होता. तो विकला असता तर सपाटून पैसा मिळाला असता. पण तो सर्व मुलांनीं खाल्ला. तीच स्थिति केळींची किंवा आंब्यांची. आंब्याचीं तर बरींच झाडें आहेत व त्यांना दरसाल आंबेहि भरपूर लागतात. तरीहि ते सर्व

मुलेंच फस्त करतात. या आंब्यांच्या मोसमांत तर फार मजा होते. आंबे येतात उन्हाळ्यांत आणि त्या वेळीं तर मे महिन्याची सुट्टी असते. मग कांहीं विद्यार्थी अभ्यासाची सबब सांगून आपल्या गांवीं न जातां तेथेंच मुक्काम करतात. कांहीं जरी आपल्या गांवीं गेले तरी मोसम संपण्याच्या आंत परत येतात. आंबे मिळविण्यासाठीं फार मजा मजा चालतात. संस्थेंतील एक विद्यार्थी खालच्या बागेंत झाडावरून पडून वारल्यापासून झाडावर कुणी चढायचें नाहीं, अशी सक्त ताकीद आहे. ( संस्थेच्या स्थापनेपासून हाच एक अपघात झाला. त्या वेळीं भाऊरावांना फार दु:ख झालें.) फक्त खालीं पडलेले आंबे खायचे हीच सवलत. त्यामुळें सगळे आंबे झाडावरच पिकतात व हळू-हळू खालीं पडतात. अशा वेळीं पहाटे उठावयास कुरकुर करणारे विद्यार्थीहि भल्या पहाटे उठून आंबे खात असतांना दिसतील. अगदींच जे ‘ सूर्यवंशी ’ असतील ते जेवणानंतर दुपारची वामकुक्षी या आंब्याच्या झाडाखालींच ठोकतील. थोडे तरी आंबे खाऊन झाल्यावर मगच स्वारी खोलीकडे वळायची. अशा प्रकारें आंब्यांच्या मोसमांत स्वयंपाकघरापेक्षां आंबराईकडेच बहुतेक विद्यार्थ्यांचा फेरफटका होतो.

सर्व कामें व इतर गमती जमती करूनहि शाहू बोर्डिंगमधील विद्यार्थी शाळाकॉलेजांतून वरच्या श्रेणींतून पास होतात. विलायतला थोड्याच दिवसांपूर्वी गेलेले व १९४५ सालच्या बी. ए. च्या परिक्षेंत इंग्रजी विषय घेऊन पहिल्या वर्गांत पहिले आलेले पी. जी. पाटील हें याच संस्थेंतील विद्यार्थी. सतत ( १९४८ व ४९ ) दोन वर्षें

पुण्याला लॉ कॉलेजमध्यें अभ्यास करून वकिलीच्या परिक्षेंत पहिल्या वर्गांत पहिल्या नंबरनें उत्तीर्ण होणारे बी. के. पाटील व बाळ पाटील हेहि याच संस्थेंतील विद्यार्थी. प्राथमिक शाळेपासून तहत महाविद्यालयापर्यंत हुशार, अभ्यासू व चुणचुणीत असे किती तरी विद्यार्थी भेटतील! हायस्कूल व मिड्लस्कूल स्कॉलरशिपस् बहुतेक याच संस्थेतील विद्यार्थ्यांच्या मालकीच्या. संस्कृतसारख्या कठीण विषयांत शेंकडा ९५ गुण मिळविणारे मांग व मुसलमान समाजांतील विद्यार्थी इथल्याशिवाय अन्यत्र कुठें पाहावयास मिळणार! सातार्‍यांत भरणार्‍या आंतरशालेय सांघिक व वैयक्तिक सामन्यांतील बक्षिसें दरवर्षी मोठ्या प्रमाणांत शाहू बोर्डिंगकडेच असावयाचीं. याशिवाय सार्वजनिक सभा, राष्ट्रीय उत्सव किंवा समारंभ या सगळ्या कार्यक्रमांत हिरीरीनें भाग घेऊन काम करणारे येथील अनेक विद्यार्थी भेटतील. सेव्यभाव त्यांच्या रोमरोमीं भिनलेला आहे. मात्र त्यांना उच्चनीचता किंवा विषमता खपायची नाही. त्याचा अनुभव येथील सरकारी हायस्कूल व न्यू इंग्लीश स्कूल यांच्या स्नेहसंमेलनप्रसंगीं आला. या वेळीं जेवणाच्या भिन्न पंक्ति होत. हलकीं सलकीं कामें खालच्या वर्गांतील विद्यार्थ्यांनाच करावीं लागत. एके वर्षी येथील विद्यार्थ्यांनीं योजना आंखून ही अनिष्ट प्रथा बंद पाडली.

अशा प्रकारें संस्थेतून बाहेर पडलेला विद्यार्थी सुविद्य, सुविचारी, विनयशील पण स्वाभिमानी, सेवाधारी व पडेल ते काम करण्याची सर्व तयारी असणारा बनून बाहेर पडतो. संस्थेचा गेल्या सालचा अंदाजें खर्च एक लाख रुपयांचा होता.

## : २० : वाघिणीचें दूध

राज्यकर्ते म्हणून इंग्रजांचा या देशाशीं संबंध आल्यावर त्यांनीं ज्या बऱ्यावाईट गोष्टी आमच्यावर लादल्या त्यांपैकीं इंग्रजी शिक्षण हें एक होय. माल सुबक व टिकाऊ असो अगर नसो. त्याचा भाव प्रमाणांत वाढविण्यांत इंग्रज लोकांचा हातखंडा आहे. कोणतीहि गोष्ट घ्या. ती इतरांपेक्षां अधिक भावानें कशी विकली जाईल याची अगोदरपासूनच जाहिरातबाजी करण्यांत हे लोक फार पटाईत आहेत. त्यांचे क्रिकेट, फुटबॉल, टेनीस इत्यादि खेळ जरी पाहिले तरी ते अति महाग व मिजासीचे म्हणून सामान्य माणसाला न परवडणारे असेच आहेत. मग हें तर 'वाघिणीचें दूध!' तें थोडेंच स्वस्त मिळणार आहे? त्यामुळें इंग्रजी अमदानीपासून आजपर्यंत बहुजनसमाज या दुधाला पारखाच राहिला आहे. शिक्षण हेंच ज्यांचें जीवित होऊन राहिलें आहे, अशा पांढरपेशा समजानें हें वाघिणीचें दूध आपलेंसें केलें. पण त्यामुळें त्यांच्या अंगीं वाघाचें बळ येण्याऐवजीं त्यांना कारकुनीचा छळ मात्र सोसावा लागला. किंबहुना इंग्रजी शिक्षण घेऊन पोशाखी बनलेले हे विद्यार्थी नोकरीशिवाय इतर उद्योगधंद्यांना नालायक ठरले.

सव्वाशें वर्षांपूर्वी इंग्लंडमध्यें बसून पंडित मेकॉले आदि मंडळींनीं इंग्रजी राज्ययंत्र सुरळीतपणें चालविण्यासाठीं ही पाश्चात्य

शिक्षणपद्धति अंमलांत आणली. त्यांचा हेतु सफल झाला. थोडी फार जागृतीहि झाली. पण ती वरिष्ठ आणि मध्यमवर्गांतच! पण अधिक खोल विचार करतां ज्यांना या दुधाची तहान हजारों वर्षांपासून लागली आहे, अशा दलितांच्या पदरांत काय पडलें? वरिष्ठवर्ग हें शिक्षण आत्मसात् करीत असतां त्यांच्या तोंडाकडे अधाशासारखे पाहण्यापेक्षां आमच्या हातांत काय होतें? आम्ही दुबळे ते दुबळेच राहिलों.

मध्यंतरींच्या काळांत स्वदेशीच्या नांवावर विदेशी शिक्षण देण्यासाठीं मध्यमवर्गियांनीं अनेक शाळा व कॉलेजें स्थापन करून आपल्या मुलांमुलींचा प्रश्न सोडविला. सरकारी विद्यालयांतील भरमसाट फी, वसतिगृहांतील ऐषारामी राहणी, इत्यादि गोष्टींचा भाव थोड्या फार प्रमाणांत यांनीं खालीं आणला. पण तो हल्लींच्या काळांत त्यांनाहि झेपण्यासारखा नाहीं. मग आम्हांला-नुकत्याच कुठें अज्ञानाच्या रोगांतून बऱ्या झालेल्या रोग्याला—तो कसा झेपणार? सामान्य माणसास प्राप्त करून घेतां येऊं नये हाच या भाषेच्या अन्नदात्याचा उद्देश होता. तोच त्यांनीं कमी-जास्त प्रमाणांत उचलला. गेल्या वर्षापासून या वर्गानें चालविलेल्या शिक्षण—संस्थांमधून एवढी जबर फी वाढविण्यांत आली आहे कीं, ती पाहून सामान्य स्थितींतील पालकांनीं आपल्या मुलांना घरींच ठेवावें. फ्रीशिप्स किंवा स्कॉलरशिप्स यांचा मक्ता या वर्गाकडेच! आतांपर्यंत वर्गवारीप्रमाणें सरकारी शिष्यवृत्त्या आमच्यांतील हुशार आणि होतकरू मुलांना मिळत असत. पण त्याचें

दारहि यापुढें आम्हांस बंदच राहणार आहे. कारण मुंबई सरकारनें वर्ग आणि शासनविरहित समाजरचना करण्याची नुकतीच प्रतिज्ञा केली आहे. आजपर्यंत शेंकडा १० पुढारलेल्या वर्गास, २० मागासलेल्या वर्गास व ज्यांना मध्यम असें समजण्यांत येतें (पण तोहि मागासलेलाच आहे.) अशा शेतकरी आणि कामगार वर्गातील मुलांना शेंकडा ७० शिष्यवृत्त्या दिल्या जात असत. नोकरीमध्यें हेंच प्रमाण ठरविण्यांत आलें होतें. पण यामुळें जातिद्वेष वाढून राष्ट्राचें नुकसान होत आहे, असें आमच्या मुंबईसरकारास नुकतेंच कळून आल्यामुळें त्यांनीं शिक्षणांतील आणि नोकरींतील ही विषमता काढून टाकण्याचें ठरविलें आहे. जो अधिक योग्यतेचा असेल त्याची जातपात लक्षांत न घेतां त्यासच अगोदर नोकरी किंवा शिष्यवृत्ति दिली जावी, असा 'पवित्र' हेतु या कायद्याच्या मुळाशीं आहे. यामुळें कोणत्या जमातीचे विद्यार्थी अधिक शिष्यवृत्त्या मिळवितील अगर कोणत्या जातींतील उमेदवार नोकरीस.अधिक योग्य ठरतील तें भविष्यकाळ सांगेल. शेजारच्या मद्रास राज्यांत मागासलेल्या व मध्यम वर्गातील जमातीस शिक्षणांत व नोकऱ्यांत विशेष सवलती दिल्या जात असतां मुंबई राज्यात मात्र असलेल्या सवलती काढून टाकण्यांत येत आहेत हें 'समानतेचें' लक्षणच समजलें पाहिजे. सरकारच्या या 'उदार' धोरणामुळें व संस्थांच्या चालकांच्या विशाल दृष्टिकोनामुळें आमच्या हातांतील खोरेंपाटी आणखी कांहीं दिवस तरी खालीं ठेवण्यांस आम्हांस सवड होणार नाहीं, हें उघड आहे. आमची

तीं शेतीवाडी व तीं गुरेंढोरें यांतच आम्ही गुरफटले जाणार आणि मग 'ना धनी ना मालक' अशी आमची वनवासी परिस्थिती होणार, असें भेसूर चित्र परवांच एका शिक्षणाधिकाऱ्यानें रंगविलें.

भाऊरावांनीं काळाचीं पावलें दहा वर्षांपूर्वींच ओळखलीं आणि जनताशिक्षणाचा प्रश्न सहजसाध्य व्हावा म्हणूनच १९४० सालीं सातारा येथें 'महाराजा सयाजीराव हायस्कूल' काढलें. हें विद्यालय सर्वस्वी मोफत आणि स्वावलंबनावर चाललें असून त्यास एक वसतिगृहहि जोडलें आहे. 'स्वावलंबन, शिस्त आणि शील-संवर्धन' हेंच या संस्थेचें वैशिष्ट्य आहे. येथील विद्यार्थ्यांना दर-रोज एक तास शारीरिक श्रम करावे लागतात. त्याचप्रमाणें 'भोज-नादि सर्व कामेंहि त्यांना स्वत:च उकरावीं लागतात. सर्वांनीं वस-तिगृहांतच राहिलें पाहिजे, असें विद्यार्थ्यांवर बंधन आहे. 'साधी राहणी आणि उच्च विचारसरणी' हीं विद्यार्थ्यांच्या अंगीं पूर्ण-पणें बाणण्यासाठीं कसोशीनें प्रयत्न केला जातो.

या विद्यालयांत शिकणारे शेंकडा ९५ टक्के विद्यार्थी खेड्यां-तील शेतकरी आणि कामगार वर्गांतील आहेत. बृहन् महाराष्ट्र आणि शेजारील मराठी भाषा चालत असलेलीं संस्थानें यांतील १३५ गांवांहून आलेले विद्यार्थी येथें शिक्षण घेत आहेत. 'मरा-ठ्यांच्या' मनगटावर उभ्या होणाऱ्या संयुक्त महाराष्ट्राची ही पाया-भरणीच म्हणा ना! जातपात लक्षांत न घेतां विद्यार्थ्यांची शिक्ष-णाची हौस पाहून त्यांना प्रवेश दिला जातो. येथील शिक्षकवर्गहि भिन्नधर्मीय व भिन्नपंथीय असून एकविचाराचा आहे.

हल्लीं विद्यार्थ्यांची संख्या २६८ पर्यंत आहे. त्यांतील १०१ हरिजन, १३१ मराठे व तत्सम आणि ४ पुढारलेले आहेत. हल्लीं शहरांतून येणाऱ्या विद्यार्थ्यांनाहि प्रवेश दिला जातो. असे विद्यार्थी आज ४६ आहेत.

या विद्यालयांतील गरीब आणि होतकरू विद्यार्थ्यांना संस्थेच्या लक्ष्मीबाई पाटील फंडांतून मदत दिली जाते व कांहीं मदत डेअरी, इमारतकाम व खडी फोडणें इत्यादि कामांच्या रूपानें होते. छत्रपती शिवाजी कॉलेजमधील टी. डी. विद्यार्थ्यांचे पाठ देण्यासाठीं प्रॅक्टिसिंग स्कूल म्हणून या शाळेचा उपयोग करण्यांत येतो. या विद्यालयास जोडलेल्या वसतीगृहास 'सर्टिफाईड स्कूल फॉर जुवेनाईल्स' म्हणून मान्यता देण्यांत आली आहे. सरकारमार्फत पाठविलेले अनाथ व बालगुन्हेगार असे विद्यार्थी या शाळेंत शिक्षण घेत आहेत. गेल्या वर्षी या सर्टिफाईड स्कूलचा डोंबे नांवाचा एक विद्यार्थी एस. एस. सी. परीक्षा उत्तीर्ण झाला. सबंध इलाख्यांत या मुलांपैकीं एस. एस. सी. होणारा हाच पहिला मुलगा होय; आणि हा मान मिळवून देणारें सयाजीराव विद्यालय हेंहि पहिलेंच होय.

याशिवाय शैक्षणिक सहली, हस्तलिखितें, नामवंतांचीं व्याख्यानें, करमणुकीचे कार्यक्रम इत्यादि गोष्टींचा लाभ विद्यार्थीवर्गाला भरपूर प्रमाणांत कसा होईल याची योग्य ती काळजी घेतली जाते. दोन कांदिवली ट्रेंड अध्यापक व एक मिलिटरी पेन्शनर हे जातीनें विद्यार्थ्यांच्या शारीरिक उत्कर्षाकडे लक्ष पुरवितात. भोजनगृहाशेजारीं असलेल्या बगिच्यांतून विद्यार्थीगण थोडेंफार धान्य

व भाजीपाला निर्माण करून सरकारच्या ‘ अधिक धान्य पिकवा ’ या मोहिमेस सक्रीय पाठिंबा देत आहेत. हायस्कूलची इमारत शहरापासून दूर पूर्वेला कोरड्या माळावर व हवेशीर ठिकाणीं असल्यानें मुलांचा आनंद आणि उत्साह कायम राहतो. चालू सालचा या शाखेचा खर्च २०,००० रुपये आहे.

या विद्यालयास बडोद्याचे महराज सर सयाजीराव गायकवाड यांचें नांव देण्यांत आलेलें आहे. तो इतिहास शाहू छत्रपतींच्या सारखाच आहे. तो आपण समजाऊन घेऊंच, पण त्याअगोदर सर सयाजीरावांचें जीवन आणि त्यांनीं आपल्या संस्थानांत केलेल्या सुधारणा या गोष्टी आपण अगोदर पाहूं.

संस्थानें म्हणजे गोऱ्या सनदी नोकरांना चरण्याचें कुरण आणि संस्थानिक म्हणजे वेळप्रसंगीं उपयोगी पडण्यासाठीं राखून ठेवलेला ‘ हातचा ’. बड्या लाटसाहेबाला खूष ठेवून प्रजेवर वाटेल तसे जुलूम नि अत्याचार करण्यांतच या संस्थानांची आजपावेतों ‘ प्रसिद्धि ’ असे. पण भांगेमध्यें ज्याप्रमाणें पवित्र आणि आदरणीय अशी तुळस असते त्याप्रमाणें सर्व संस्थानांत बडोदा हें एक खरेखुरें सुधारलेलें संस्थान म्हणून प्रसिद्ध आहे. शैक्षणिक, सामाजिक, धार्मिक व राजकीय या सर्व बाबतींत इतर संस्थानांपेक्षांच काय, पण शेजारच्या खालसा मुलुखापेक्षांहि हें किती तरी पुढें आहे ! याची जाणीव विलिनीकरणानंतर तेथील लोकांना व आम्हांलाहि आलेली आहे. कोठून आम्ही या विलिनीकरणाच्या फंदांत पडलों, असा तेथील गुजराथी भाईबंधांना आतां पश्चात्ताप होतो आहे. ही

झालेली प्रगति चारदोन वर्षांची नाहीं, तर यासाठीं कै. सर
सयाजीराव गायकवाड यांनीं आपली सारी हयात खर्च केलेली
आहे. सबंध हिंदी संस्थानिकांत सुविद्य, सुविचारी, सुसंस्कृत, सूज्ञ,
गुणज्ञ आणि पुरोगामी विचासरणीचा सर सयाजीराव महाराजां-
वेरीज दुसरा संस्थानिक सांपडणें कठीण!

१९०६ सालीं कलकत्ता येथें भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांत
महर्षि दादाभाई नौरोजी यांनीं केलेली 'वासहातिक स्वराज्याची' व
१९२९ सालीं लाहोर कॉंग्रेसच्या व्यासपीठावरून पं. जवाहरलाल
नेहरूनीं केलेली 'संपूर्ण स्वराज्याची' घोषणा त्याच वेळीं मूर्त स्वरूपांत
जर कोठें आकारली असेल तर ती बडोदें संस्थानांतच. आम्हीं स्वरा-
ज्यांतील सुखांचा थोडा फार उपभोग आज घेत आहोंत. पण बडोदा-
निवासी हे स्वराज्याचाच नाहीं, तर सुराज्याचा उपभोग आमच्या
अगोदर पन्नास वर्षे घेत आलेले आहेत. खेडोपाडीं सक्तीचें व मोफत
शिक्षण, सार्वजनिक मोफत वाचनालयें, प्रौढशिक्षण, अस्पृश्यतेची
हकालपट्टी, मद्यपान बंदी, शेतीसुधारणा, पाटबंधारे, औद्योगिक
केंद्रें, द्विभर्याप्रतिबंधन, शालागृहें, रस्ते, सार्वजनिक उद्यानें, पाणी-
पुरवठा, लोकमतानुवर्ति राज्यकारभार इत्यादि राष्ट्रोद्धारक व समाजो-
न्नतिकारक गोष्टी सर सयाजीरावांनीं आपल्या संस्थानांत कधींच
करून ठेवलेल्या आहेत. बडोद्याची जुम्मादादा व्यायाम शाळा, कमिटी
बाग, नगर वाचनालय (सबंध हिंदुस्थानांत याच्या एवढें दुसरें वाचना-
लय नाहीं.), ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय, कीर्तिमंदिर, आजवा तलाव,
लक्ष्मी पॅलेस, कलाभुवन, संस्थानभर पसरलेला प्रचंड रेल्वे मार्ग हीं सर्व

सर सयाजीरावांचीं चिरंतन व बोलकीं स्मारकें आहेत. योग्य आणि कर्तबगार माणसांना हाताशीं धरून त्यांच्यावर हळूहळू जबाबदाऱ्या सोपवून शेवटीं त्यांना नांवारूपास चढवावयाचें हा त्यांचा सततोद्योग. मग तिथें जात, धर्म, किंवा प्रांत यांचा भेद आड येत नसे. योगी अरविंद घोष, रमेशचंद्र दत्त, रियासतकार सरदेसाई, महर्षि शिंदे, डॉ. आंबेडकर, प्रो. माणीकराव, नुकतेच दिवंगत झालेले जनरल शिंदे, राजरत्न माने पाटील, टी. कृष्णाम्माचारी, दि. ब. धामणस्कर, जागृतीचे संपादक पाळेकर अशीं किती तरीं माणसें संग्रहीं ठेवून त्यांनीं बडोद्याला आजचें स्वरूप प्राप्त करून दिलें.

ही झाली संस्थानांतील स्थिति. पण संस्थानाबाहेरहि त्यांनीं अनेक संस्थांना व कार्यकर्त्यांना सक्रीय प्रोत्साहन देऊन त्यांना कार्यक्षम बनविलें आहे.

सर सयाजीरावांच्या अध्यक्षतेखालीं मुंबईस कोळिवाड्यांत सभा भरवून सत्यशोधक समाजाचे संस्थापक ज्योतिराव फुले यांना जनताजनार्दनानें महात्मा ही पदवी अर्पण केली. हें एकच उदाहरण सयाजीरावांची गुणग्राहकता दर्शवील. आजचा केसरी कार्यालयाचा वाडा—जेथून ब्रिटिश सरकारचे वाभाडे काढणारा टिळकांचा 'केसरी' प्रसिद्ध होत असे—तो सर सयाजीरावांच्या मालकीचा. तो त्यांनीं केसरीकारांस बक्षिस देऊन टाकला. ज्या वेळीं महर्षि शिंदे सरकारी रोषास बळी पडून येरवड्यास पाहुणचार घेत होते त्या वेळेस त्यांच्या कुटुंबाच्या योगक्षेमासाठीं त्यांनींच आर्थिक साहाय्य केलें. हीं उदाहरणें महाराजांच्या धैर्याची परीक्षा तसेंच उज्वल देशप्रेम

दाखवितात. साधा शेतकऱ्याचा मुलगा हातीं अनियंत्रित सत्ता आल्यावर एक प्रजाहितदक्ष राजा, धडाडीचा समाजसेवक व सनदशीर देशभक्त या निरनिराळ्या भूमिका एकनिष्ठेनें व धिम्मे-पणानें कशा पार पाडतो याचें हें ढळढळीत उदाहरण आहे.

अशा गुणज्ञ राजाच्या दृष्टींतून भाऊरावांचें नांव कसें सुटेल? भाऊरावांचें नांव ते ऐकून होतेच. १९३३ सालीं ते महाराष्ट्रांत आले असतां त्यांनीं मुद्दाम होऊन छत्रपति शाहू बोर्डिंगास भेट देण्याची इच्छा दर्शविली व त्याप्रमाणें प्रत्यक्ष भेट दिली. बडोद्यांत भिन्न ठिकाणीं चालविलेल्या कार्याचें हें एकत्रित दृश्य आपण पहात आहोंत कीं काय असें त्यांना वाटलें. त्यांना फार समाधान वाटलें. त्यांनीं भाऊरावांच्यावर आशिर्वादपर प्रेमाचा वर्षाव केला. ते म्हणाले, "हिंदुस्थानच्या प्रगतीस लागलेल्या अत्यंत जुलमी आणि जातिविशिष्ट रूढीच्या मुळावर भाऊरावांनीं कुऱ्हाडीचा घाव घातल्यामुळें ती समूळ नष्ट होणार हें उघड आहे. अशा प्रकारें जातीभेदांतीत व आदर्श वसतीगृह सबंध हिंदुस्थानांत कोठेंच दिसून येत नाहीं. इतक्या थोड्या खर्चांत नीटनेटकेपणा, टापटीप, शिस्त, उत्साह, ऐक्य, अभ्यास व परस्परांतील अकृत्रिम प्रेम पाहून असें वाटतें कीं, वाटेल तितका खर्च करून एखाद्या राजामहा-राजाकडूनहि असली संस्था इतक्या पद्धतशीरपणें चालविली जाणें अशक्य आहे. याबद्दल भाऊराव पाटलांना मी शतशः धन्यवाद देतों."

या भाषणाच्या आधीं महाराजांनीं धनिणीच्या बागेंत फिरून

मुलांच्या झोपड्या, त्यांची राहणी, कामें, शेती इत्यादि सर्व गोष्टी पाहिल्या होत्या. स्वयंपाकगृहाकडे येऊन तेथील काम पाहिल्यावर महाराज थक्क झाले. छोटीं छोटीं मुलें एवढ्या मुलांचा स्वयंपाक करण्यांत गढून गेलेलीं आहेत, असें पाहून त्यांना आपल्या बाळपणींची आठवण झाली. मुलांनीं तयार केलेल्या झुणकाभाकरीचा—सुदाम्याच्या पोह्यांचा—त्यांनीं आस्वाद घेतला. मगच ते सभास्थानाकडे आले.

महाराज स्थानापन्न होतांच भाऊरावांनीं खालील शब्दांत त्यांचें स्वागत केलें. "भगवान श्रीकृष्णाची द्वारका ज्याच्या आधीन आहे अशा द्वारकाधिशाचें स्वागत माझ्यासारखा सुदामा कसें करूं शकेल? आज छत्रपति असतो तर आपलें स्वागत वेगळ्या प्रकारानें झालें असतें. समशेरबहाद्दर, सेनाखासखेल सेनापति आले म्हणून आपल्यावर छत्रचामरें ढाळून आपलें स्वागत केलें गेलें असतें. पण छत्रपति जरी नसले तरी आज छत्रपतींच्या बागेंतील या आमराईच्या चवऱ्यांनीं आम्ही आपलें स्वागत करीत आहोंत. आमच्या स्वागताचा आपण स्वीकार कराल. नाहीं, केलाच आहे हेंहि दिसून आलें. भगवान श्रीकृष्णानें ज्याप्रमाणें सुदाम्यानें आपल्या फाटक्या धोतरांतून आणलेल्या पोह्यांचा आस्वाद घेतला तद्वतच निसर्गानें नटलेल्या या छत्रपतींच्या आम्रराजींतील झोपड्यांत मुलांनीं तयार केलेल्या झुणकाभाकरीचा आस्वाद मोठ्या चवीनें महाराजांनीं घेतला, हें पाहिल्यावरच आमचें रांगडें स्वागत त्यांना आवडलें, असें आम्ही समजलों. हें पाहून आम्ही धन्य झालों."

नंतर महाराज विलायतेस गेले. मायभूमीस परत येत असतां त्यांनीं जिबुटी बंदरावरून ता. २६ नोव्हेंबर १९३७ रोजीं तार करून भाऊरावांना मुंबईस भेटावयास बोलाविलें. भेटीअंतीं भाऊरावांनीं आपली दुय्यम शिक्षणाची योजना महाराजांपुढें ठेवली. ती अशी.—

"सातारा जिल्हा हें पश्चिम महाराष्ट्राचें केंद्रस्थान व मराठ्यांचें माहेरघर आहे. जिल्ह्यांत मराठे हेच बहुसंख्य आहेत. जिल्ह्याचें क्षेत्रफळ ५३८४ चौरस मैल असून लोकसंख्या सुमारें १३॥ लाख आहे. पैकीं जवळ जवळ १२॥ लाख बहुजनसमाज अज्ञानी आहे. या जिल्ह्यांत १२।१३ शहरें असून खेड्यांची संख्या जवळ जवळ १३०० आहे. याच खेड्यांतून खरा बहुजनसमाज वसती करून राहिलेला आहे. या शहरांच्या ठिकाणींच असलेल्या १०।१२ इंग्रजी शाळांचा फायदा फक्त शहरवासियांनाच मिळतो. खेडोपाडीं राहणारा विद्यार्थीगण इच्छा असूनहि ऐपत नसल्यामुळें व दूर अंतरामुळें शिक्षणास मुकला आहे. दारिद्र्यामुळें सरस्वतीच्या दालनांत पाऊल न टाकतां आल्यानें कित्येक विद्यार्थीरत्नें आज धुळीला मिळत आहेत. अशा विद्यार्थ्यांना स्वतःच्या श्रमानें स्वतःचें शिक्षण घेतां आलें तर महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत पडून राहिलेल्या रत्नाना उजाळा देऊन त्यांच्या भाग्योदय जवळ आणल्यासारखें होणार आहे. आणि बुकर टी. वॉशिंग्टनच्या तालमींत तयार झालेल्या विद्यार्थ्यांप्रमाणें आपल्या देशांतील विद्यार्थ्यांना शिक्षणाचीं दारें आपोआप मोकळीं होतील. यामुळें महाराष्ट्रांतील-विशेषतः सातारच्या-

मराठा केवळ शिपाईगडीच न राहतां तो आपल्याच सारखा मुत्सद्दीहि होईल."

महाराजांना ही योजना एकदम पसंत पडली हें सांगावयास नकोच. त्यांनीं भाऊरावांच्या पाठीवर थाप मारली व या योजनेच्या पूर्ततेसाठीं लागणारें साहाय्य देण्याचें अभिवचन दिलें. पण इच्छा आणि फळ यांची नेहमीं गांठ पडते, असें व्यवहारांत तरी फारसें दिसून येत नाहीं. पुढें महाराज आजारीच पडले व थोड्याच दिवसांत हा इहलोक सोडून गेले. त्यांच्या इच्छा अपूर्णच राहिल्या. पण अपूर्ण इच्छांना मूर्तस्वरूप देणें व न दिलेल्या दानाचें स्मारक उभारणें हा तर कर्मवीरांच्या स्वभावधर्म ! म्हणून महाराजांच्या नांवचें हायस्कूल काढून त्यांनीं त्यांची इच्छा पूर्ण केली.

१९३९ सालीं सर सयाजीरावांचे नातू श्रीमंत प्रतापसिंह महाराज यांच्या हस्तें या संस्थेच्या चार भिंतींवरील जागेचा उद्घाटनविधि झाला. त्यांनीं चारपांच हजार रुपये देणगीचें अभिवचन दिलें. लगेच तेथेंच हजर असलेले फलटणचे राजे श्रीमंत नानासाहेब निंबाळकर यांनीं आपला वाडा देण्याचें कबूल केलें. आज हायस्कूल त्याच जागेंत आपलें पवित्र कार्य करीत आहे.

## : २१ : जिजामाता अध्यापिका विद्यालय

भाऊरावांचे स्नेही श्री. हमीद ए. अली यांच्या प्रोत्साहनानें ज्याप्रमाणें पुरुष शिक्षकांसाठीं ट्रेनिंग कॉलेज निर्माण झालें त्याप्रमाणें कलेक्टर साहेबांच्या पत्नी सौ. हमीद अली यांच्या हट्टामुळें जिजामाता अध्यापिका विद्यालय ही स्त्रीशिक्षकांसाठीं शिक्षण देणारी संस्था निर्माण झाली. एकदां सौ. हमीदअलींनीं संस्थेस अचानक भेट देऊन असें लिहून ठेवलें कीं, "तुम्ही आतांपर्यंत पुष्कळ काम केलेलें आहे. पण तें सर्व पुरुषांसाठींच झालेलें आहे. स्त्रियांसाठीं तुम्ही अद्याप कांहींहि केलेलें नाहीं. तेव्हां तें जोंपर्यंत तुम्ही करीत नाहीं तोंपर्यंत मला तोंड दाखवूं नये."

बहिणीचा हट्ट तो. भावाला चैन पडेना. शिवाय महर्षि शिंद्यांनीं पण १९३९ सालीं चार भिंतीवरील जागेच्या उद्घाटनसमयीं "भाऊराव, जोंपर्यंत तुम्ही मुलांबरोबरच मुलींच्या शिक्षणाची सोय करीत नाहीं तोंपर्यंत तुमचें कार्य एकांगी आहे." असें बजावून सांगितलें होतें. सहा सात कोटी अस्पृश्यांना आम्ही दूर ठेवलें आहेच. त्याचप्रमाणें घरांत राहूनहि शिक्षणाशिवाय अस्पृश्य राहिलेला स्त्रियांचा केवढा मोठा वर्ग आहे, याची भाऊरावांना जाणीव होती. वेदकालीन ऋषींबरोबर विदुषी म्हणून चार दोन स्त्रियांचीं नांवें

आम्हीं वाचतों किंवा त्यानंतरच्या काळांतहि थोड्याफार विद्या-विभूषित स्त्रियांचीं नांवें आमच्या कानांवर येतात. पण हा प्रयत्न म्हणजे जाणून बुजून खास स्त्रियांसाठीं केलेला नसून राजघराण्यांतील अगर अन्य वरिष्ठ जमातींतील लोकांनीं हौस म्हणून हें कार्य केलेलें दिसतें. कांहीं थोड्याफार प्रमाणांत जरी स्त्रीशिक्षणांत या लोकांनीं लक्ष घातलेलें दिसलें तरी त्या स्त्रिया हाताच्या बोटांवर मोजण्या-इतक्याहि नव्हत्या. सामान्य स्त्रीपर्यंत शिक्षणाची गंगा सबंध हिंदु-स्थानांत सर्वांआधीं जर कोणी आणली असेल तर ती महात्मा ज्योतिराव फुल्यांनीं होय. त्यानंतर निरनिराळ्या ठिकाणीं स्त्रियां-साठीं थोड्याफार प्रमाणांत शिक्षणाची सोय केलेली दिसून येते. पण त्यांमधून शेंकडा ५ टक्के स्त्रियाहि सामान्य जनसमूहांतील नाहींत, असेंच आपणांस म्हणावें लागेल. मग अफाट अशा पसर-लेल्या बहुजनसमाजाचें अर्धें अंग जें अनादि कालापासून विद्ये-शिवाय निकामी झालें आहे तें तसेंच ठेवावें काय, हा भाऊरावां-पुढें प्रश्न पडला.

ता. २८।५।४७ ला साताराचे बालछत्रपति कै. शाहू राजे यांचे हस्तें प्रॅक्टिसिंग स्कूलच्या मुलांचा बक्षिस-समारंभ करण्यांत आला. धनिणीची बाग ही भाऊरावांची स्फूर्तिदेवता आहे. मराठी राज्याची खरी धनीण—जिनें शिवरायासारखा महाप्रतापी पुत्र देऊन बहुजनसमाजाला जागें केलें ती—मातोश्री जिजामाई यांच्या नांवचें स्त्रियांना शिक्षण देण्यासाठीं एक ट्रेनिंग कॉलेज काढण्याची प्रतिज्ञा भाऊरावांनीं या बक्षिस-समारंभाच्या वेळीं केली.

ता. १५ जून १९४२ सोमवार या दिवशीं भाऊरावांनीं 'जिजामाता अध्यापिका विद्यालय' हें खास स्त्रियांना ट्रेनिंग शिक्षण देण्यासाठीं ट्रेनिंग कॉलेज सुरू केलें. सौ. हमीदअल्लींनीं सुरवातीला ५०० रुपये देणगी देऊन भाऊरावांचें अभिनंदन केलें. प्रारंभीं २० विद्यार्थिनी आल्या. आज १०० विद्यार्थिनी शिक्षण घेत आहेत. आजपर्यंत या ट्रेनिंग कॉलेजमधून ९२ शिक्षिका ट्रेंड होऊन गेल्या. त्यांपैकीं ७८ विद्यार्थिनी निरनिराळ्या स्कूलबोर्डामार्फत आल्या होत्या. बाकीच्या २२ स्वतंत्र रीत्या आपला शिक्षणक्रम पुरा करीत आहेत. सरकारी ट्रेनिंग कॉलेजप्रमाणें या ठिकाणींहि मूलोद्योग शिक्षण सुरूं असून त्याला जोडून बागकाम हा सहाय्यक विषय ठेवला आहे. आजपर्यंत या कॉलेजमधून खालीलप्रमाणें स्त्रिया शिक्षण घेऊन गेल्या. ख्रिस्ती ५, पुढारलेल्या २२, मराठे व तत्सम ४९, मागासलेल्या ९, मुसलमान २ व जैन ५. सध्यां शिकत असलेल्या विद्यार्थीनी पुढीलप्रमाणें आहेत. ख्रिस्ती २, पुढारलेल्या ४०, मराठे व तत्सम ४४, मागासलेल्या ९, मुसलमान १ व जैन ४. चालू सालचा या विद्यालयाचा खर्च सुमारें १६००० रुपये आहे.

या विद्यालयांतून शिकून बाहेर पडणाऱ्या शिक्षिका नुसत्या शिक्षिका म्हणून न राहतां त्या जिजाऊमातोश्रीप्रमाणें आदर्शवत् व्हाव्यात यासाठीं संस्था अहोरात्र श्रम करीत असते. शाखाप्रमुख म्हणून श्री. बा. म. ठोके बी. ए., बी. टी., डी. बी. एड्. हे काम पहातात.

---

## : २२ : रयत शिक्षण संस्थेच्या इतर पारंब्या

### लक्ष्मीबाई पाटील ग्रंथालय, सातारा.

प्राथमिक शिक्षिक व शिक्षका ट्रेनिंग कॉलेजमध्यें शिकत असतांना व शिकून आपलें कार्य करीत असतांना त्यांना आपलें सामान्य ज्ञान वाढवितां यावें व मिळविलेलें ज्ञान ताजेंतवानें ठेवतां यावें म्हणून ही ग्रंथालयाची योजना भाऊरावांनीं १९४१ पासून सुरू केली आहे. हें ग्रथालय महात्मा फुले अध्यापक विद्यालयास जोडलें आहे. पुस्तकांची देवाण घेवाण येथूनच होते. या ग्रंथालयांत सध्यां १५०० ग्रंथ आहेत.

### लक्ष्मीबाई पाटील वसतिगृह, सातारा.

ज्यांनीं आपल्या मंगलसूत्रांतील जीवन ओतून संस्थेचा महान् वृक्ष वाढविला त्या भाऊरावांच्या पत्नी कै. सौ. लक्ष्मीबाई पाटील यांचें नांव या वसतिगृहास दिलें आहे. १९४२ पासून हें वसतिगृह आपलें काम करीत आहे. हें जिजामाता अध्यापिका विद्यालयास जोडलेलें आहे. या वसतिगृहांत सध्यां ५१ मुली असून त्यांत मराठादि बहुजनसमाजाच्या अवघ्या १७ मुली शिक्षण घेत आहेत. नुकत्याच जाग्या झालेल्या अस्पृश्य समाजापैकीं २७, खिस्ती १, मुसलमान १, पुढारलेले ४ व इतर १ अशी जातवारी आहे. सदर विद्यालय सरकारमान्य असून यास सर्टिफाईड स्कूल म्हणूनहि

सरकारनें मंजुरी दिलेली आहे. अशा २४ मुली रिमांडहोममार्फत आलेल्या आहेत. मुलांच्या वसतिगृहाप्रमाणें येथेंहि सर्व कामें मुलीच करतात. वसतिगृहाची व्यवस्था प्रा. एस्. उनउने बी. ए. ( ऑनर्स ) बी. टी. हे पहातात.

रिमांडहोममार्फत येणाऱ्या मुलांमुलींचा खर्च सरकारतर्फे भागविला जातो. अशीं मुलें आणि मुली इतरत्र चाललेल्या निरनिराळया शिक्षणसंस्थांच्या वसतिगृहामध्यें पाठविलीं जातात. पण त्यामध्यें सुद्धां कसा भेदाभेद केला जातो हें पहाण्यासारखें आहे. चालू वर्षी जीं मुलेंमुली भाऊरावांच्याकडे आलीं आहेत, त्यांपैकीं शेकडा ८० टक्के खालच्या वर्गांतील आहेत. याच्या उलट हिंगणें येथील महर्षि कर्वे यांनीं चालविलेल्या स्त्रीशिक्षणसंस्थेंत शेकडा ८० टक्के मुली आणि छोटींछोटीं मुलें ब्राह्मणादि पुढारलेल्या वर्गांतील आहेत. भाऊरावांकडे पाठविलीं जाणारीं मुलें बहुतेक बालगुन्हेगार म्हणून ठरलेलीं असतात. उलट कर्वे यांच्याकडे पाठविलीं जाणारीं मुलें अनाथ म्हणून ठरलेलीं असतात. यामुळें या गुन्हेगार मुलांवर भाऊरावांची संस्था फारच काळजीपूर्वक देखरेख करीत असते. मुलगा अनाथ असला तरी त्यावर वाईट संस्कार झालेले नसतात. त्यामुळें त्याला सुधारणें सोपें असतें. पण गुन्हेगार म्हणून ज्यांच्या कपाळावर शिक्के मारले जातात त्यांची सुधारणा करणें म्हणजे एक दिव्य असतें. शिवाय त्यांच्यापासून इतर मुलांनाहि वाईट वळण लागण्याचा संभव असतो. हा धोका सांभाळून रयत शिक्षण संस्था या मुलांना सुधारण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करीत आहे. रिमांडहोम ही खास

बालगुन्हेगार व खऱ्या अनाथ असणाऱ्या मुलांसाठीं चालविलेली सरकारी संस्था आहे, पण पुढारलेला वर्ग याहि संस्थेचा कसा फायदा घेतो आहे. हें पाहिल्यावर त्यांच्या बुद्धीचें कौतुक वाटतें. आणि बहुजनसमाजांतील शेंकडों अनाथ आणि भुकेकंगाल पोरें गल्लोगल्लीं भीक मागीत हिंडतांना अगर चोऱ्यामाऱ्या करतांना पाहिलीं कीं, आमच्या समाजाची कींव करावीशी वाटते. हल्लीं जुवेनाईल कोर्टाकडे येणाऱ्या संख्येंत ब्राह्मणादि पुढारलेल्या वर्गांचीच संख्या अधिक आहे, असे उद्गार प्रस्तुत लेखकाजवळ या कोर्टाच्या एक माननीय सदस्य सौ. प्रमिलाबाई गाडगीळ यांनीं काढले होते. यावरूनहि हेंच सिद्ध होत नाहीं काय ?

## महात्मा गांधी विद्यालय, अष्टें ( द. सातारा ).

हें विद्यालय भाऊरावांनीं १५ जून १९४४ मध्यें 'सव्वा लाखाचें अष्टें' या इतिहासप्रसिद्ध गांवीं सुरू केलें. प्रथम लिमये यांच्या वाड्यांत नंतर तळवलकरांच्या आणि शेवटीं प्लेगची साथ सुरू झाल्यावर श्री विठोबाच्या देवळांत व झाडाखालीं अशी जागेच्या बाबतींत या शाळेची त्रिस्थळी यात्रा झालेली आहे. पण गांवाबाहेर मिळालेल्या जागेवर नवीन बांधलेल्या इमारतीमुळें जागेचा प्रश्न थोड्यांफार प्रमाणांत सुटला आहे. पण विद्यार्थ्यांची संख्या एकसारखी वाढत असल्यानें तीहि जागा अपुरी वाटूं लागली आहे.

१९४५ सालीं या विद्यालयांत ७५ विद्यार्थी शिक्षण घेत होते. आज तीच संख्या ६०० चे वर गेली आहे. ही शाखा सुरू करण्यांत कै. खैरमोडे यांनीं फार श्रम घेतले. पण त्यांच्या अकालीं

निधनानें संस्थेचें बरेंच नुकसान झालें. त्यानंतर श्री. जी. टो. जोशी बी. ए. (ऑनर्स) बी. टी. टी. डी., राष्ट्रभाषाकोविद हे मुख्याध्यापक म्हणून काम पहात असत. १९४६ मध्यें ही संस्था रजिस्टर झाली. त्या वेळीं ? ली, ४ थी, ५ वी व स्पेशल क्लास असे चार वर्ग होते आणि विद्यार्थी ५० होते. १९४७ सालीं ७ वर्ग झाले व विद्यार्थ्यांची संख्या २०० च्या वर गेली. १९४८ ला मॅट्रिकचा वर्ग काढला. त्यास सरकारी मान्यता पण मिळाली.

सध्यांच्या अध्यापकवर्गांत ५ बी. ए., बी. टी, १ एम्. एस्. सी., ४ बी. एस्. सी., ४ बी. ए., २ अंडर ग्रॅज्युएट, २ एस्. टी. सी., एक काव्यतार्थ, २ मॅट्रिक, २ सेकंडियर ट्रेन्ड व कोविद, १ ड्रॉइंग इंटरमिजिएट व १ सुपरिंटेंडेंट असे २४ शिक्षक काम करतात.

## विद्यालयाचीं काहीं ठळक वैशिष्ट्यें

( १ ) गरीब व होतकरू विद्यार्थ्यांस फीशिपस् व हाफ् फीशिप्स् दिल्या जातात.

( २ ) परगांवच्या विद्यार्थ्यांसाठीं राजा विजयासिंह वसतिगृह, हें १९४६ पासून सुरू केलें आहे. सर्व जातींच्या विद्यार्थ्यांना येथें प्रवेश मिळतो. तसेंच संस्थेच्या नियमाप्रमाणें सर्व कामें विद्यार्थीच पहातात. मागासलेल्या जमातींतील विद्यार्थ्यांना जेवण, राहणें व फी इत्यादि सर्व सोयी मोफत केल्या आहेत. इतर विद्यार्थ्यांची सोयहि फारच थोड्या खर्चांत केली आहे.

( ३ ) विद्यार्थ्यांना स्वतःचे विचार धीटपणें मांडण्याची संवय लागावी म्हणून प्रत्येक वर्गासाठीं वादविवाद सभेची व्यवस्था

केली आहे. वरचेवर वक्तृत्वाच्या चढाओढी ठेवल्या जातात. यशस्वी विद्यार्थ्यांना पारितोषकें देण्यांत येतात.

( ४ ) प्रत्येक वर्षी ऐतिहासिक, भौगोलिक व इतर प्रसिद्ध ठिकाणीं सर्व वर्गांच्या सहली काढण्यांत येऊन विद्यार्थ्यांच्या जीवनांत व्यापकता आणि विविधता निर्माण केली जाते.

( ५ ) विद्यार्थ्यांच्या प्रतिभाशक्तीस चालना देण्यासाठीं हस्तलिखित त्रैमासिकें तयार करण्यांत येतात. विविध प्रसंगीं निबंधांच्या चढाओढी ठेवण्यांत येऊन बक्षिसें वाटलीं जातात.

( ६ ) जागतिक घडामोडींचें ज्ञान घेण्यासाठीं ग्रंथालय व वाचनालय यांची व्यवस्था केली आहे. त्याचा विद्यार्थ्यांना भरपूर फायदा होतो.

( ७ ) हायस्कूलमध्यें वर्धा व पुणें राष्ट्रभाषा सभांचें केंद्र आहे. यांतील प्रत्येक परिक्षा विद्यार्थी देतात. त्यासाठीं विद्यार्थ्यांची खास तयारी करून घेण्यांत येते.

( ८ ) चित्रकलेच्या चढाओढी ठेवून योग्य बक्षिसें वाटलीं जातात. त्यासाठीं वर्गहि चालविलेला आहे.

( ९ ) मातृभाषेंत विद्यार्थ्यांची उत्तम प्रगति व्हावी म्हणून बऱ्याच विद्यार्थ्यांना महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या परीक्षांना बसविलें जातें. असे विद्यार्थी निरनिराळ्या परिक्षांना मिळून चालू सालीं ५० बसले आहेत.

( १० ) बौद्धिक प्रगतिबरोबरच शारीरिक प्रगतिकडेहि लक्ष दिलें जातें. कुस्ती, मलखांब, आट्यापाट्या, हुतूतू, खोखो इत्यादि

देशी व क्रिकेट, फुटबॉल, हॉकी, इत्यादि विदेशी खेळ मुलांकडून खेळले जातात. प्रत्येक आठवड्यांतून एकदां सामुदायिक काम करून घेतलें जातें. यात्रेच्या दिवसांत शेजारच्या गांवांतून भरणाऱ्या आखाड्यावर येथील कांहीं मुलें सुंदर कुस्त्या करतात.

( ११ ) शाळेच्या जमिनींत दोन विहिरी काढल्या आहेत. योगायोग असा कीं, या विहिरींना अगदीं जवळच पाणी लागलें आहे. यांतील पाणी शेजारच्या शेतांना देऊन त्या शेतांमधून विद्यार्थी सर्व प्रकारचीं पिकें काढतात. शिवाय शाळेची स्वच्छता, सारवण वगैरे मुलेंच करतात.

चालू वर्षी विद्यार्थ्यांची संख्या बरीच वाढल्यानें श्री. कदम यांनीं दिलेल्या नव्या जागेंत, नव्या इमारतींत वर्ग भरतात. सहा ब्लॉक्स बांधून झाले. बाकीचें बांधकाम चालू आहे. महत्वाच्या कामाखेरीज इमारतीचीं सर्व कामें विद्यार्थीच करतात. आतांपर्यंत या इमारतीचें ३००० रुपये किंमतीचें काम मुलांनींच केलेलें आहे. आतांपर्यंत ३०००० रुपये खर्च आला आहे. सध्यां या विद्यालयाचे मुख्य अध्यापक म्हणून श्री. शं. ब. सुखटणकर, बी. ए. बी. टी. डिप्. एड्. (एडिंबरो) हे काम पहातात.

## अष्टें ट्रेनिंग कॉलेज, अष्टें.

हायस्कूलच्या इमारतीशेजारींच या वर्षापासून प्राथमिक शिक्षकांसाठीं एक ट्रेनिंग कॉलेज सुरू केलें आहे. अभ्यासक्रम संपूर्ण बेसिकचा असून दोन तुकड्या आहेत. विद्यार्थ्यांची संख्या सुमारें ८० आहे. अष्टें ट्रेनिंग कॉलेजसाठीं जी इमारत बांधली तिला

लागणाऱ्या २० हजार विटा हायस्कूल व ट्रेनिंग कॉलेज यांतील विद्यार्थ्यांनीं तयार केल्या व भाजल्या. शिवाय गवंडी व सुतार यांच्या हाताखालींहि विद्यार्थ्यांनींच आळीपाळीनें काम केलें. त्यामुळें १४ हजार रु. किमतीची इमारत फक्त ८ हजार रुपयांत झाली. हें स्वावलंबनाचें विद्यार्थ्यांनीं घालून दिलेलें उदाहरण त्यांना भूषणावह तर आहेच, पण इतर संस्थांनाहि मार्गदर्शक आहे.

या विद्यालयासाठीं लागणारें संपूर्ण बेसिक सामान—चरखे, टकल्या वगैरे पुणें येथील प्रसिद्ध औषधांचे व्यापारी श्री. अमृतराव केशवराव ढेरे यांनीं आपल्या मुलाच्या लग्नानिमित्त देणगी म्हणून दिलें ( किंमत ५०१ रुपये ). या कामीं प्रस्तुत लेखकानें बरीच मेहनत घेतली. महाराष्ट्राचा धनिक वर्ग श्री. ढेरे यांचें अनुकरण करील काय? अशा प्रकारच्या लग्नविधींतून गेल्या वर्षी प्रस्तुत लेखकानें १७५१ रुपये देणगी संस्थेसाठीं मिळविली.

## मालोजीराजे विद्यालय, लोणंद.

सातारा जिल्ह्यांतील खेड्यांच्या केंद्रस्थानीं असणाऱ्या गांवांत सुरू केलेल्या शाळांपैकीं अत्यंत मागासलेल्या भागांतील पण व्यापारी दृष्टया महत्व पावलेल्या लोणंद गांवीं (एम्. एस्. रेल्वे) हें विद्यालय १९४४ पासून सुरू केलें आहे. चालू सालापासून या विद्यालयाचें रूपांतर पूर्ण हायस्कुलांत झालें आहे. या हायस्कूलला फार महत्व आहे. कारण लोणंदपासून १७ मैलांवर असलेल्या फलटणखेरीज ३०।४० मैलांवर दुसरें हायस्कूल नाहीं. त्यामुळें या विद्यालयाचा फायदा शेजारच्या २५।३० गांवांना मिळतो. या विद्यालयामुळेंच

या मागासलेल्या भागांतील लोकांचें दुय्यम शिक्षणाबाबतचें स्वप्न सत्यसृष्टींत येईल.

फलटणचे राजे व हल्लींचे मुंबई राज्याचे विकासमंत्री श्रीमंत नानासाहेब निंबाळकर यांचें प्रथमपासूनच या संस्थेवर पुत्रवत् प्रेम आहे. त्यांच्या प्रेमाचे उतराई होण्यासाठीं या विद्यालयास 'मालोजी राजे' विद्यालय असें नांव दिलें.

हल्ली या विद्यालयांत पुढारलेले २४, मध्यम १५३, मुसलमान ६, गुजर व जैन २८ असे २५५ विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. यांपैकीं ६५ विद्यार्थ्यांना गरीबीमुळें फीमध्यें सवलत दिली आहे. त्याचप्रमाणें मागासलेल्या जातींतील विद्यार्थ्यांकडून फी घेतली जात नाहीं. स्वावलंबनानें शिक्षण घेऊं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना काम देऊन त्यांचा अभ्यासक्रम पुरा केला जातो. शाळेंतील सर्व विद्यार्थ्यांना दररोज १ तास सांघिक काम करावें लागतें. त्या वेळीं गरीब व हा श्रीमंत असा भेद केला जात नाहीं.

## राणी लक्ष्मीदेवी वसतिगृह.

परगांवच्या विद्यार्थ्यांना शाळेचा फायदा घेता यावा म्हणून ता. २६-६-४९ पासून फलटण संस्थानच्या राणीसाहेब सौ. लक्ष्मीदेवी यांच्या नांवानें एक वसतिगृह उघडण्यांत आलें आहे. त्यांत सर्व धर्मांचीं व सर्व जातींचीं ३९ मुलें आहेत. यासाठीं फलटण तालुक्याच्या सरहद्दीवरील बंगला ता. १३-१२-४८ रोजीं वसतिगृहासाठीं संस्थेच्या ताब्यांत देऊन फलटण बोर्डानें शिक्षण प्रसारच्या कामांत संस्थेस जी मदत केली ती अभिनंदनीय आहे. सदर वसतिगृहास बॅकवर्ड

क्रॉस ऑफिसकडून सरकार मान्यता मिळविली आहे. भोजनखर्च दरमहा ११ ते १२ रुपये येतो. गेल्या सालीं येथील ३ विद्यार्थ्यांनीं हायस्कूल स्कॉलरशिप्स् मिळविल्या. त्यानंतर या वर्षासाठीं १६ विद्यार्थी स्कॉ. परीक्षेस बसले होते.

शाळेचा नामकरण समारंभ दि. ब. जगताप यांच्या हस्तें ता. ४।५।४९ रोजीं करण्यांत आला. याच वेळीं बक्षिस–समारंभहि उरकून घेण्यांत आला. विद्यालयांत एकूण ११ शिक्षक काम करतात. त्यांपैकीं २ बी. ए., बी. टी., २ बी. ए., बी. एस्. सी. (ऑनर्स), १ कांदिवली शॉर्टटर्मर, १ डी. टी. सी., ३ प्रायमरी ट्रेंड व हिंदी भाषा प्रवीण आणि एक मॅट्रिक्युलेट असे शिक्षक आहेत. विद्यार्थ्यांनींच विद्यार्थी–वस्तुभांडार चालविलें आहे. गेल्या वर्षांत सुमारें २००० रुपयांची उलाढाल झाली. येथून शालोपयोगी सर्व साहित्य मिळण्याची सोय होते.

विद्यालयाच्या शिक्षणकार्यांत स्थानिक व्यापाऱ्यांनीं अमोलिक सहाय्य केलेलें आहे. ती योजना अशी आहे. लोणंद हें व्यापारी क्षेत्राचें गांव आहे. सबंध फलटण चौऱ्यांऐंशी व खंडाळा भाग एवढ्या मोठ्या टापूंतील देवघेव येथूनच चालते. त्यामुळें व्यापाऱ्यांची वस्ती या गांवीं फार. येथें होणाऱ्या व्यापारावर शेंकडा एक आणा या दरानें शिक्षणफंड जमविला जातो व तो दरसाल या संस्थेस देण्यांत येतो. अशा प्रकारें लोणंद येथील शिक्षण साहाय्यक मंडळ या विद्यालयास दरवर्षीं ३००० रुपये जमवून देते. मंडळाचे अध्यक्ष शेट वालचंद दलूचंद शहा व सेक्रेटरी श्री.

हणमंतराव जाधव व इतर कार्यकर्ते जातीनें लक्ष घालून या कामीं मेहनत घेतात, ही अभिनंदनीय गोष्ट आहे.

## श्रीसद्गुरु गाडगेमहाराज फ्री हायस्कूल, कुसूर.

हें विद्यालय जून १९४५ पासून सुरू करण्यांत आलें. मॅट्रिक अखेर सर्व वर्ग असून शिक्षण सर्वांना मोफत दिलें जातें. या विद्यालयाच्या स्थापनेच्या कामीं दानशूर बंडोबा गोपाळराव मुकादम यांचें सहाय्य झालेलें आहे, हें येथें नमूद करणें अति अगत्याचें आहे.

श्री. बंडोबा मुकादम हे अगदीं गरीब शेतकरी कुटुंबांतील गृहस्थ रोज दोन आण्यांवर मजुरी करीत असत. पण पुढें मुंबईस जाऊन लकडी बंदरांत काम करूं लागल्यावर त्यांच्या नशिबानें त्यांना चांगलाच हात दिला. ते मजुराचे मुकादम झाले. मुकादमीच्या जोरावर त्यांनीं बराच पैसा मिळविला आणि त्याच बरोबर निरनिराळया व्यसनांच्या नादीं लागून घालविलाहि. पण सुसंगतीनें वाल्या कोळयाचा वाल्मिकी ऋषि झाला, त्याचप्रमाणें आधुनिक ऋषि संत गाडगे महाराज यांच्या सहवासाचा थोडाफार लाभ मुकादम यांना झाल्याबरोबर त्यांचीं चटसारीं व्यसनें पळून गेलीं. आज बंडोबा धोतराशिवाय अंगावर कांहींहि वस्त्र वापरीत नाहींत. त्यांनीं आपली जवळ जवळ सर्व इस्टेट भाऊरावांच्या ताब्यांत दिली आहे म्हणा ना. त्यामुळेंच त्यांच्या गांवीं, कुसूर, तालुका कऱ्हाड येथें वरील शाळा काढली.

वास्तविक शाळा काढण्याचा त्यांचा मूळचा उद्देश नव्हता. श्री. मुकादमांनीं कुसूरला ११००० रुपये खर्चून एक देवालय बांधलें.

त्याचा उद्घाटनविधी करण्यासाठीं संत गाडगे महाराज व कर्मवीर भाऊराव पाटील यांना बोलविलें उद्घाटनप्रसंगीं भाऊरावांनीं भाषण करतांना, " आज दगडाधोंड्याच्या देवासाठीं मंदिरें बांधण्यापेक्षां चालत्या बोलत्या गोपाळांसाठीं शाळा बांधणें, त्याना शिक्षण देणें हीच राष्ट्राची खरी गरज आहे; आणि ही खरी देवपूजा आहे. या चालत्या बोलत्या देवाला ज्ञानाविना दगड बनवावयाचें व दगडाला देव समजून त्याची पूजाअर्चा करीत बसावयाचें हा खरा धर्म नाहीं. आजच्या खऱ्या धर्माचें नांव 'माणुसकी'. ती फक्त शिक्षणानेंच प्राप्त होते. त्यासाठीं मुकादमांनीं यापुढें या देवभक्तीकडे आपलें लक्ष वाढवावें." भाऊरावांच्या या बोलण्याला संत गाडगे महाराजांनाहि आशीर्वाद दिला. या दोघांचा आशीर्वाद असल्यावर मग श्री. मुकादमांना दुसरा कोणता मार्ग सुचणार? त्यांनीं त्याच सभेंत जाहीर केलें, " मित्रहो, मी हें देऊळ ज्या भावनेनें बांधलें ती भावना खरी वा खोटी असो, तिकडे मी लक्ष देत नाहीं. पण आतांच कर्मवीरांनीं जो मार्ग दाखविला आणि बाबांनीं जो आशीर्वाद दिला त्याच मार्गानें जाण्याचें मी आजपासून ठरवीत आहे. हें देऊळ उद्यांपासून खऱ्याखुऱ्या देवाचें मंदिर बनवावयाचें. "

५०० वस्तीच्या खेडेगांवीं श्री. मुकादम यांच्या दिलदारपणानें मॅट्रिकपर्यंतचें एक सुंदर हायस्कूल आज चाललें आहे. यासाठीं आतांपर्यंत जमीन, इमारती व रोख या रूपानें जवळ जवळ ६०,००० रुपये देणगी म्हणून श्री. मुकादमांनीं खर्च केले आहेत.

केवढें हें औदार्य ! एक मजूर आपल्या निढळाच्या घामानें मिळविलेल्या संपत्तीचा राष्ट्राच्या कल्याणासाठीं उदार अंतःकरणानें वापर करीत असतांना मान अभिमानानें ताठ होते. आज श्री. मुकादम रयत शिक्षण संस्थेचे प्रेसिडेंट आहेत.

२३१ विद्यार्थी या शाळेंत शिकत आहेत. त्यांत २०३ मराठा व तत्सम, ९ मागासलेले, ९ मुसलमान व १० पुढारलेले आहेत. अध्यापकवर्गांतहि अशीच जातिभिन्नता आहे. २ मुसलमान, २ ब्राह्मण, २ मराठे व १ जैन याप्रमाणें शिक्षकवर्ग आहे. वसतिगृहांत ४० विद्यार्थी आहेत. सर्व काम मुलांनींच करावयाचें आहे. दरमहाचा खर्च ११ ते १२ रुपयांपर्यंत येतो. इमारतीचें बांधकाम चालू आहे. अजूनहि ५०,००० रुपयांपर्यंत खर्च येईल. आतांपर्यंत शाळेनें शास्त्रीय सामानासाठीं ५००० रुपये खर्च केले आहेत. चालू सालचा अंदाजी खर्च ३२००० रुपये आहे.

## ठक्करबाप्पा इंग्लिश स्कूल, गांधीटेकडी.

ज्याची लोकप्रियता आणि देशभक्ति वादातीत आहे, असे नुकतेच दिवंगत झालेले दलितांचे एक थोर कैवारी पूज्य ठक्कर बाप्पा यांच्या स्मरणार्थ ही शाळा १९४५ पासून गांधीटेकडी या ठिकाणीं पाटण तालुक्यांतील बहुलें गांवाजवळ स्थापन केलेली आहे. १९४५ सालीं ठक्करबाप्पांचा महाराष्ट्रांत दौरा असतांना ते भाऊरावांच्या बरोबर हें कोयनेचें खोरें पायांखालीं घालून गेलेले आहेत. त्यांना भाऊराव आणि त्यांची संस्था याबद्दल निस्सीम आणि निर्मळ प्रेम वाटत असे. सबंध भारतवर्षांत सच्चे देशभक्त

म्हणून जीं फार थोडीं माणसें होऊन गेलीं त्यांत ठक्करबाप्पांचें स्थान फार वरच्या प्रतीचें आहे. त्यांचें नांव या विद्यालयास देऊन संस्थेनें आपली दलितांबद्दलची कळकळच व्यक्त केलेली दिसते.

लांबवर प्रवास करून आलेली कोयना नदी या गांधीटेकडीला वळसा घालून जाते. अशा ठिकाणीं उंच टेकडीवर या शाळेचे वर्ग भरतात. येथें इंग्रजी ४ थी अखेर शिक्षण दिलें जातें. यांस जोडूनच मराठी ५ वी, ६ वी व ७ वीचे वर्ग चालविले आहेत. ही सर्वांत मोठी मराठी शाळा असून नामांकित शिक्षक व शैक्षणिक साहित्य यांनीं सज्ज आहे. मराठी विभागाकडे १२० मुलें असून इंग्लिश शाळेंत ६५ विद्यार्थी आहेत. सुमारें ३५०० रुपये अंदाजी खर्च आहे. येथील सर्व व्यवस्था श्री. लालासाहेब पाटणकर हे पहातात.

## भवानीदेवी इंग्लिश स्कूल, सावर्डें

तासगांव तालुक्यांतील सावर्डें गांवीं ही शाळा जून १९४५ मध्यें सुरू केली आहे. इंग्लिश ५ अखेर शिक्षण दिलें जातें. शाळेसाठीं इमारत म्हणून तेथील एक दानशूर नागरिक श्री. हरळे यांनीं आपला वाडा संस्थेस बक्षिस देऊन टाकला आहे. चालू सालीं या शाखेनें अजमासें ३००० रुपये खर्च केले आहेत.

## इंग्लिश स्कूल, माहुली ( खानापूर ).

विटें-मायणी रस्त्यावर हें माहुली गांव आहे. तेथील प्रमुख पुढारी श्री. विठ्ठलराव देशमुख यांच्या सक्रीय सहानुभूतीनेंच ही शाळा निर्माण झाली आहे. त्यांचे बंधू श्री. दत्ताजीराव यांनीं आपल्या मालकीची ७५ एकर जमीन अत्यंत उदार अंतःकरणानें संस्थेस दिलेली आहे.

शिवाय दत्ताजीरावांच्या लग्नप्रसंगीं हुंडा म्हणून आलेली ६००१ रुपये रक्कम देशमुखांच्या मातोश्रींनीं भाऊरावांच्या पदरांत टाकली. या मायलेकरांच्या त्यागाचें फळ म्हणजेच माहुलीचें विद्यालय होय. येथें इंग्रजी ५ वी अखेरचे वर्ग आहेत.

## महात्मा गांधी विद्यालय, उंब्रज.

उंब्रज हें गांव पुणें-बंग-लोर रस्त्यावर असून मध्यवर्ती ठिकाण आहे. चिपळूण—पंढरपूर रस्ताहि येथूनच जातो. शिवाय कृष्णा, तारळी आणि मांड या नद्यांचा संगमहि याच ठिकाणीं झालेला आहे. त्यामुळें व्यापारहि थोडा फार चालतो. मराठेशाहींतील प्रसिद्ध सेनापति धनाजी जाधव याच गांवचे होत. लोकहि थोडे जागृत आहेत. त्यांन विनंति केल्यावरून भाऊरावांनीं ही शाळा १९४५ पासून या ठिकाणीं सुरू केली आहे.

## नाना पाटील इंग्लिश स्कूल, बिचूद, भवानीनगर.

या शाळेंत हल्लीं ९० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत, त्यांपैकीं ७ पुढारलेले, ७० मराठे व तत्सम, ७ मागासलेले, ५ जैन व १ मुसलमान असे आहेत. शिक्षकांपैकीं २ ब्राह्मण व ३ मराठे आहेत. आसपास १०—२० मैलांवर कऱ्हाडशिवाय दुय्यम शिक्षणाची कांहींहि सोय नसल्यामुळें विद्यार्थ्यांची संख्या यापुढें चांगलीच वाढणार आहे. त्या दृष्टीनें इमारतीचें काम चालू आहे. रावसाहेब शिराळकर यांचा वाडा व डि. लो. बोर्डानें दिलेली धर्मशाळा या ठिकाणीं हल्लीं वर्ग बसतात. चालू सालीं या विद्यालयासाठीं ७००० रुपये खर्च आला. श्री. बेडकीहाळ बी. ए., बी. टी. हे प्रमुख म्हणून काम पहातात.

साताऱ्च्या ग्रामराज्याचे संस्थापक व १९४२ च्या क्रांतिलढ्यांतील महाराष्ट्राचे आघाडीचे नेते क्रांतिसिंह नाना पाटील यांचें नांव या शाळेस दिलें आहे. भाऊराव पाटील आणि नाना पाटील या दोन पाटलांनीं साताऱ्याच्या इतिहासांत घडविलेली क्रांति महाराष्ट्र कधींच विसरणार नाहीं.

या शाळेंत ४ थी पर्यंतचे वर्ग आहेत. शिक्षण मोफत दिलें जातें. १९४५ पासून ही शाखा उघडण्यांत आली आहे. या शाळेसाठीं संस्थेला या वर्षीं ३००० रुपये खर्च आला आहे.

## स्वामी रामानंद विद्यालय, तुपेवाडी, रामानंदनगर.

१९४२ च्या क्रांतिवीरांना ज्यांचा आशिर्वाद असे ते स्वामी रामानंद महाराज आज सातारा जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष आहेत. त्यांचें विरागी जीवन जवळून पहाण्यासारखें आहे. त्यांचें नांव या शाळेला देऊन संस्थेनें स्वामीजींच्या त्यागाचा सन्मान केला आहे. हें गांव किर्लोस्करवाडीजवळ आहे. किर्लोस्करवाडीला हायस्कूल आहे. पण तरीसुद्धां या ठिकाणींहि शाळा काढावी लागली यावरून योग्य तो बोध घेतां येईल.

१९४६ पासून ही शाळा सुरू केली आहे. इंग्लिश ४ इयत्तांपर्यंतचा व मराठी ५, ६, ७ चा अभ्यासक्रम या ठिकाणीं पुरा केला जातो. शाळेच्या आसपास असलेल्या शेतींतून मुलांनीं स्वतः कष्ट करून गेल्या सालीं ७०० रुपयांचें उत्पन्न काढलें. येथील सर्व विद्यार्थ्यांना गणवेष आहे. या वर्षींचा खर्च ८००० रु. आहे. येथील व्यवस्था श्री. डी. बी चौगुले, बी. एस्. सी., बी. टी. हे पहातात.

## महात्मा गांधी विद्यालय, रुकडी.

२० जून १९४८ पासून ही शाळा सुरू केली आहे. कोल्हापूरचे छत्रपति शहाजी राजे यांनीं आपल्या भागांत रयत शिक्षण संस्थेचें कार्य प्रसृत व्हावें म्हणून आपला रुकडी येथील लाखो रुपये किंमतीचा १३६ एकरांचा कँप इमारतीसह देणगीच्या रूपानें संस्थेच्या हवालीं करून आपल्या आजोबांची इच्छा पूर्ण केली. हें गांव वीस गांवांना मध्यवर्ति ठिकाण शोभण्यासारखें आहे. कँपपासून गांव दोनतीन फर्लांग आत आहे. कँप स्टेशनच्या नजीक असून विस्तीर्ण अशा माळरानावर वसविलेला आहे. गांवचे लोक इतके हौशी कीं, गेल्या एकदोन वर्षांत सातआठ हजार रुपयांचें सहाय्य त्यांनीं या संस्थेला केलें.

राजर्षि शाहू छत्रपतींनीं हा कँप उन्हाळ्यांत मुक्काम करतां यावा अशा हवेशीर ठिकाणीं मुद्दाम तयार करवून घेतला. आधुनिक सुखसोयींनीं युक्त अशा अनेक इमारती येथें बांधून ठेवलेल्या आहेत. त्यांच्या पश्चात् हें सुंदर ठिकाण उध्वस्त व वैराण होऊन वाया चाललें होतें. त्याला संस्थेनें नवजीवन द्यावयाचें ठरविलें. आतां जरी या ठिकाणीं फक्त हायस्कूलच दिसत असलें, तरी थोड्याच दिवसांत शेतकी शाळा, औद्योगिक शाळा, ट्रेनिंग संस्था, व्यापार-विषयक शाळा वगैरे निरनिराळ्या शिक्षणसंस्था काढून महाराष्ट्रां-तील हें एक नमुनेदार शिक्षणकेंद्र बनविण्याचा भाऊरावांचा विचार आहे.

या शाळेंत पहिल्या वर्षीं ३८ विद्यार्थी होते. आतां ती संख्या

शंभरच्या वर गेली आहे. संस्थेच्या स्वावलंबनाच्या ब्रीदाप्रमाणें दररोज एक तास विद्यार्थ्यांकडून अंगमेहनतीचीं कामें करून घेतलीं जातात. गेल्या सालीं शाळेच्या आसपास असलेल्या शेतांतून सहा मण बाजरी व चार मण भुईमूग विद्यार्थ्यांनीं तयार केला. शिवाय विद्यार्थ्यांनींच जुन्या इमारतींतील दहा खोल्या बोर्डिंगसाठीं दुरुस्त करून घेतल्या. दररोज अर्धा तास मौन—सूतकताई चालते.

शाळेला जोडून एक वसतिगृहहि उघडण्यांत आलें आहे. सरकारी मान्यता पण मिळाली. येथें हल्लीं तीस विद्यार्थी वास्तव्य करतात. हरिजन विद्यार्थ्यांस जेवण मोफत दिलें जातें. धर्मभेद किंवा जातिभेद यास येथें वाव नाहीं. येथें ९ वी पर्यंतचे वर्ग आहेत. शाळेची सर्व व्यवस्था श्री. जी. डी. ऊर्फ बापूजी साळुंखे बी. ए., बी. टी. हे बघतात. चालू सालचा संस्थेचा खर्च ९००० रुपये आहे.

याशिवाय खालील ठिकाणीं संस्थेनें निरनिराळ्या शाखा चालविल्या आहेत. विस्तारभयास्तव त्यांचा फक्त नामोल्लेख करतों.

(१) महात्मा गांधी विद्यालय, खानापूर सातारा (दक्षिण)
(२) महात्मा गांधी विद्यालय, कार्ले ,, (उत्तर)
(२) महात्मा गांधी विद्यालय, पुसेगांव ,, ,,
(४) महात्मा गांधी विद्यालय, सावळग ,, (दक्षिण)
(५) महात्मा गांधी विद्यालय, वडगांव हवेली ,, (उत्तर)
(६) छत्रपति शिवाजी विद्यालय, अपारींगे ,, ,,
(७) महात्मा गांधी विद्यालय, कडेगांव ,, (दक्षिण)
(८) कर्मवीर विद्यालय, ऐतवडें बु. ,, ,,

| | | | |
|---|---|---|---|
| (९) | इंग्रजी विद्यालय, | दहिवडी | ,, ,, |
| (१०) | ,, ,, , | पाचवड | ,, ,, |
| (११) | ,, ,, , | महाबळेश्वर | ,, ,, |
| (१२) | आदर्श विद्यालय, | शिरवळ | ,, ,, |
| (१३) | महात्मा गांधी विद्यालय, | कर्जत | अहमदनगर |
| (१४) | इंग्रजी विद्यालय, | लोणी | अहमदनगर |
| (१५) | इंग्रजी विद्यालय, | पिसर्वे | पुणें |
| (१६) | इंग्रजी विद्यालय, | तडसर | सातारा द. |
| (१७) | मॉडर्न कमर्शियल हायस्कूल, | सोलापूर | सोलापूर |
| (१८) | पद्माराजे विद्यालय, | शिरोळ | कोल्हापूर |
| (१९) | अध्यापक विद्यालय, | अष्टें | सातारा द. |
| (२०) | इंग्रजी विद्यालय, | पांचगणी | सातारा द. |
| (२१) | महर्षि शिंदे विद्यालय, | एणकूळ | सातारा द. |

## : २३ : रयत शिक्षण संस्थेच्या इतर पारंब्या (चालू)

### महात्मा फुले अध्यापक विद्यालय, सातारा.

१९३२ ते ३५ च्या दरम्यान सातारला कलेक्टर म्हणून आलेले श्री. हमीद ए. अली आय. सी. एस्. यांना खरें कार्य कुठें चाललें आहे व कार्याची नुसती जाहिरातबाजी कुठें चालली आहे हें बारकाईनें पाहण्याची हौस फार होती. त्यांनीं एके दिवशीं कोणासहि न कळवितां अचानकपणें शाहू बोर्डिंगास भेट दिली. नेहमींच्या साध्या वेषांत असल्यामुळें त्यांना कुणी ओळखू शकलें नाहीं. पण कुणी तरी बडा पाहुणा आपली संस्था पहावयास आला आहे, अशी त्यांची खात्री झाली. पण म्हणून कुणी पुढें धावला नाहीं किंवा कुणी बेपर्वाईहि दाखविली नाहीं. जो तो आपल्या कामांत गर्क. सकाळची वेळ होती. नित्यनियमाप्रमाणें झाडलोट करून कुणी अभ्यासाला बसला होता, तर कुणी आंघोळीच्या तयारीनें लंगोट बांधून विहिरीच्या कांठावर उभा होता. कांहीजण शाळेंतील विषयांवर चर्चा करीत बसले होते, तर कांहींजण शेतमाउलीशीं हितगुज करीत होते. कलेक्टरसाहेब सगळीकडे फिरले. कांहींची त्यांनीं चौकशी केली. कांहींना त्यांनीं इकडचे तिकडचे प्रश्न विचारले. कांहींच्या खोलींत शिरून त्यांनीं त्यांच्या ट्रंका उघडून पाहिल्या व शेवटीं ते स्वयंपाकगृहाकडे वळले. तेथें गेल्यावर यांत्रिक चलाखीनें व टापटिपीनें चाललेलें स्वयंपाकाचें

काम पाहून त्यांना समाधान वाटलें. स्वयंपाक करणाऱ्या मुलांकडे त्यांनीं त्यांच्या जातींची चौकशी केली, तेव्हां कोण मराठा, तर कोण महार, कोण भंगी, तर कोण चांभार, कोण ख्रिस्ती तर कोण मुसलमान अशी पंचमेळ खिचडी पाहिल्यावर त्यांना कौतुक व समाधान वाटलें.

दुसऱ्या दिवशीं त्यांनीं भाऊरावांना भेटण्यासाठीं बोलाविलें. 'मी तुमची संस्था पाहिली. ती पाहून मला फार आनंद वाटला' असें त्यांनीं सांगितलें. यानंतर हमीदअल्लींचा आणि भाऊरावांचा स्नेह वाढतच गेला. इतका कीं, त्यांनीं आपल्या कारकीर्दींत तीसपेक्षां अधिक वेळां संस्थेस भेटी दिल्या. त्याचप्रमाणें त्यांच्याकडे येणाऱ्या सरकारी किंवा बिनसरकारी पाहुण्यांस भाऊरावांचें जातिभेदातीत चालविलेलें कार्य ते दाखवीत असत. ते स्वतः घरंदाज मुसलमान समाजांतील असतांहि गोषा वगैरे खानदानीचीं लक्षणें त्यांच्या घरीं चुकूनहि दिसून येत नसत. इतकेंच काय, पण त्यांच्या पत्नी सौ. हमीदअल्ली या सार्वजनिक कार्यांतहि जातीनें लक्ष पुरवीत. भाऊरावांच्या कार्याकडे तर त्या अगदींच आस्थापूर्वक पहात असत. त्यामुळें भाऊराव त्यांना आपल्या वडील बहिणीप्रमाणें मान देत असत. या पैगंबरवासी दे. भ. अब्बास तय्यबजींच्या कन्या होत. बापाचें वळण थोड्याफार प्रमाणांत मुलीमध्यें असायचेंच.

१९३५ सालीं बादशाह पंचम जार्ज यांचा रजत महोत्सव (सिल्व्हर ज्युबिली) हिंदुस्थानांत ठिकाठिकाणीं साजरा केला गेला.

साताऱ्यांतहि तो तसा साजरा करावा, अशी कलेक्टरसाहेब श्री. हमीद ए. अली यांनीं भाऊराव आदि मंडळींकडे आपली इच्छा प्रगट केली. इतकेंच नव्हें, तर सदर उत्सव तुमच्या संस्थेंत धनिणीच्या बागेंतच साजरा केला जावा असा त्यांनीं आग्रह धरला. त्या वेळीं भाऊराव विनोदानें म्हणाले, "रजतोत्सव साजरा करायला माझी मुळींच आडकाठी नाहीं. मात्र अट एक आहे. रजत रुपये मिळाले पाहिजेत." हा भाऊरावांचा विनोद पुढें सत्यसृष्टींत उतरला. संस्थेला चार भिंतीवरील (सातारा शहर) दहा एकर जागा इमारतीसाठीं सरकारकडून देणगी म्हणून मिळाली.

रजतोत्सव थाटानें साजरा केल्यावर भाऊरावांनीं याच ठिकाणीं प्राथमिक शिक्षकांसाठीं ट्रेनिंग कॉलेज काढण्याची जाहीर प्रतिज्ञा केली आणि ती त्याच सालीं पुरीहि झाली. समारंभास हजर असलेले त्या वेळचे रयत शिक्षण संस्थेचे प्रेसिडेंट रा. ब. काळे यांनीं त्याच ठिकाणीं उद्गार काढले, "भाऊराव जर टेनिंग कॉलेज काढणार असतील तर मी दहा हजार रुपयांची देणगी त्यासाठीं जाहीर करतों." ट्रेनिंग कॉलेजसाठीं प्रिन्सिपॉल म्हणून मध्यभाग एज्यु. इन्स्पेक्टरच्या कामांतून नुकतेच सेवानिवृत्त झालेले श्री. के. एस्. दिक्षित यांची निवड करण्यांत आली.

ट्रेनिंग कॉलेज चांगल्या प्रकारें चालेलच, असा दिक्षितांनाहि आरंभीं विश्वास वाटत नसल्यामुळें त्यांनीं त्यांत मनापासून लक्ष घातलें नाहीं. त्यामुळें आरंभीं आलेल्या बावीस विद्यार्थ्यांपैकीं पंधरा विद्यार्थी निघून गेले. राहिलेल्या सात विद्यार्थ्यांची

समजूत घालतां घालतां भाऊरावांच्या नाकीं नऊ आले. शेवटीं त्यांना भोजन, कपडेलत्ते व पुस्तकें हीं मोफत देण्याचें त्यांनीं ठरविलें तेव्हां तें विद्यार्थी राहिले.

पुढील सालापासून मात्र दीक्षितांनीं चांगलेंच लक्ष घातलें. इतकें कीं, विद्यार्थ्यांसाठीं थोडीफार पदरमोडहि त्यांनीं केली.शेवटीं कॉलेज चांगलें नांवारूपाला आणून ते सेवानिवृत्त झाले. आज ते पुण्यांत वास्तव्य करून राहतात. संस्थेबद्दल असीम कळकळ व आपुलकी ते बाळगतात. "मी सरकारी नोकरींत असतां ट्रेनिंग कॉले-जचा प्रिन्सिपॉल व्हावें, अशी माझी फार इच्छा होती. पण ती अपुरीच राहिली. ती पूर्ण करण्याची संधि मला भाऊराव पाटलांनीं दिली. कॉलेजच्या प्रिन्सिपॉलची जागा देऊन भाऊरावांनीं माझा गौरवच केला आहे. या कॉलेजचा पहिला प्रिन्सिपॉल होणें हीच माझ्या आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाची अशी गोष्ट मी समजतों." हे दिक्षितांचे उद्‌गार आहेत.

यानंतर श्री. शं. ब. सुखटणकर यांच्यासारखे तरुण, तडफडदार आणि सुविद्य [ बी. ए. बी. टी. डि. पॉ. एड्. ( एडिंबरो ) ] प्रिन्सिपॉल मिळाल्यामुळें लौकरच या कॉलेजची भरभराट झाली. आज या एकाच कॉलेजचीं तीन कॉलेजें झालेलीं आपणांस पहा-वयास मिळतील. हल्लीं या कॉलेजचे प्रिन्सिपॉल म्हणून नानासाहेब माने बी. ए., बी. टी. हे काम पहातात.

१५ ऑगष्ट १९४७ रोजीं भारत स्वतंत्र झाला. तेव्हां हा राष्ट्रीय मुहूर्त पाहून या कॉलेजचें मूळचें नांव बदलून 'महात्मा फुले

अध्यापक विद्यालय' असें नवीन नांव देण्यांत आलें. महात्मा फुले यांनीं शिक्षणाच्या बाबतींत केलेली जागृति शिवाय समाज-सुधारणा, अस्पृश्यतानिवारण, स्त्रीशिक्षण इत्यादि गोष्टींत केलेल्या सुधारणांवरून ते बहुजनसमाजाचे पहिले क्रांतिकारक पुढारी वाटतात. म्हणून त्यांचें नांव आणि तेंहि स्वातंत्र्यदिनाच्या दिवशीं देण्यांत संस्थेनें खचित औचित्य प्रगट केलें आहे.

आजंपर्यंत या कॉलेजसाठीं संस्थेनें पावणेतीन लाख रुपये खर्च केले आहेत. गेल्या पंधरा वर्षांत येथून १७०० शिक्षक शिक्षण घेऊन गेलेले आहेत. एक शिक्षक ट्रेंड होण्यासाठीं दोन वर्षांचा काळ लागतो. एवढ्याच काळांत त्याच्यासाठीं १८००रुपये खर्च करावे लागतात. तो कॉलेजमध्यें गेला तरी त्याचा पगार चालू असतोच. शिवाय त्याच्या बदली काम करणाऱ्याचा पगार म्हणजे वर लिहिलेले १८०० रुपये निव्वळ पगारासाठींच खर्च केले जातात. याशिवाय शिक्षणसाहित्य, शिकविणाऱ्यांचा पगार इत्यादि गोष्टी निराळ्याच. या हिशेबानें पाहिल्यास पावणेतीन लाख रक्कम म्हणजे भारी नाहीं.

१९३४ सालीं ७ विद्यार्थ्यांवर सुरू केलेल्या या कॉलेजांत हल्लीं २४४ विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. त्यांपैकीं १४४ बोर्डानें पाठविलेले असून बाकीचे संस्थेच्याच प्राथमिक शाळांतील आहेत. प्राथमिक, दुय्यम, आणि बेसिक बोर्डाच्या नवीन अभ्यासक्रमा-प्रमाणें तज्ज्ञ आणि अनुभवी शिक्षकांकडून सूतकताई, विणकाम व शेती हे मूलोद्योग केंद्रस्थानीं समजून समवाय पद्धतीनें या ठिकाणीं शिक्षण दिलें जातें. आतांपर्यंत शिकून गेलेल्या व शिकत अस-

लेल्या विद्यार्थ्यांची वर्गवारी अशी आहे. पुढारलेले ४९४, मध्यम ५३१, मागासलेले २६७, मुसलमान ९४, जैन १०२ व इतर १०४. गेल्या पंधरा वर्षांत संस्थेनें केलेलें कार्य पाहिलें कीं, सातारा जिल्हा शिक्षणांत इतका पुढारलेला कां, हें जिज्ञासूंना आपोआप कळेल.

## रावबहादुर काळे प्रॅक्टिसिंग स्कूल, सातारा.

साताऱ्यास भूषणभूत असलेल्या ज्या निरनिराळ्या व्यक्ति होऊन गेल्या त्यांपैकीं रा. ब. काळे हे एक थोर पुरुष होत. कांहीं गोष्टी योगायोगानेंच घडून येतात. तसाच भाऊरावांचा आणि काळ्यांचा संबंध जुळून आला. त्या वेळीं श्री सत्येंद्रनाथ टागोर ( कवींद्र रवींद्रनाथांचे बंधु ) हे सातारला डिस्ट्रिक्ट जज्ज म्हणून काम पहात होते. त्यांच्या बरोबरच नाझरचें काम श्री. सीतारामपंत जव्हेरे हे पहात होते. सत्येंद्रनाथ ब्राह्मोसमाजी, सीतारामपंत प्रार्थनासमाजी आणि काळे प्रागतिक पक्षाचे अशा या त्रिवेणी संगमांतून सातारचा प्रार्थना समाज जन्माला आला. पुढें सत्येंद्रनाथ आणि जव्हेरे हे बदली झाल्यामुळें दुसरीकडे गेले. तेव्हां समाजाच्या कामासाठीं महर्षि अण्णासाहेब शिंदे हे मधून अधून साताऱ्यास येत. प्रार्थनासमाजिस्ट काळे आणि सत्यसमाजिस्ट भाऊराव या दोघांशींहि त्यांचा संबंध येई. शिवाय भाऊरावांचें पायाशुद्ध व तळमळीचें कार्य काळ्यांना जवळून पाहतां येत असल्यानें त्यांना त्यांच्याबद्दल एक प्रकारचें औत्सुक्य वाटूं लागलें होतें. याचेंच रूपांतर काळे–पाटलांच्या मैत्रींत झालें. पुढें भाऊरावांनीं आपलें कार्य अधिक नेटानें

व निष्ठेनें चालविलेलें पाहून काळे त्यांच्या कार्याकडे पूर्णपणें आर्कषून गेलें. इतकें कीं, ते नंतर रयत शिक्षण संस्थेचे अध्यक्ष झाले. त्यांचे जामात श्री. धनंजयराव गाडगीळ आज रयत शिक्षण संस्थेचे उपाध्यक्ष आहेत व त्यांच्या पत्नी सौ. प्रमिलाबाई गाडगीळ आपल्या पित्याच्या पावलावर पाऊल टाकून संस्थेच्या कामांत आस्थापूर्वक लक्ष घालतात.

रा. ब. काळे यांच्या स्मरणार्थ रयत शिक्षण संस्थेनें १९३६ सालीं 'रावब. काळे प्रॅक्टिसिंग स्कूल' ही संस्था काढली. ट्रेनिंग कॉलेजमधील शिक्षकशिक्षिकांना अभ्यासपाठ देण्यासाठीं या शाळेचा उपयोग करतात. ही शाळा ट्रेनिंग कॉलेजच्याच नियंत्रणाखालीं काम करते. या शाळेंत प्राथमिक इ. ७ वीपर्यंतचें शिक्षण संपूर्ण मोफत दिलें:जातें. येथें शेती व इतर मूलोद्योग यांस धरून असलेला संपूर्ण अभ्याक्रम शिकविला जातो. शाहू बोर्डिंगच्या आवारांत धनिणीच्या बागेंतच ही शाळा असल्यानें समोरच्या शेतीचा प्रयोगासाठीं व विस्तीर्ण पटांगणाचा खेळण्यासाठीं मुलांना चांगला उपयोग होतो. शिवाय शेजारच्या आम्रवृक्षांचा उन्हाळी वर्ग चालविण्यासाठींहि कधीं कधीं उपयोग केला जातो. मिडल् स्कूल स्कॉलरशिपचे विद्यार्थी याच शाळेंतून तयार केले जातात; आणि दरवर्षी जिल्ह्याच्या वाटणीच्या बहुतेक स्कॉलरशिपस् हेच विद्यार्थी पटकावितात. सर्व शिक्षक ट्रेंड असून मुख्याध्यापकाचें काम एक स्त्रीशिक्षिका पाहतात. चालू सालीं या शाळेंत २५३ विद्यार्थी असून त्यांपैकीं १४ मुली व ३२ मागासलेल्या जातीचे विद्यार्थी आहेत. या शाखेसाठीं आजपर्यंत संस्थेला पाऊण लाख रुपये खर्च करावा लागला आहे.

## दि युनियन बोर्डिंग हाऊस, पुणें.

वसतिगृह म्हटलें कीं, पुण्यामध्यें निरनिराळ्या संस्थांचीं जीं बादशाही थाटाचीं वसतिगृहें आहेत त्यांची आपणांस आठवण होईल. पण हें भाऊरावांनीं काढलेलें वसतिगृह आहे. दरिद्री-नारायणानें दरिद्र्यांसाठीं काढलेलें हें वसतिगृह आहे. त्याला ना इमारती, ना पाणी, ना संडास. फर्ग्युसन कॉलेजच्या आधुनिक सुखसोयींनीं सज्ज असलेल्या भव्य इमारतींच्या मागें वडार लोकांच्या वस्तीशेजारीं असलेल्या छोट्याशा झोपड्या हेंच तें युनियन बोर्डिंग. संडास म्हणाल तर आजूबाजूस पसरलेलें माळरान आहे. पाणी मात्र जवळपास नाहींच. आतां कुठें एक नळ नगरपालिकेनें तेथून बऱ्याच अंतरावर लाविला आहे. तोपावेतों पाण्याचे फारच हाल झाले विद्यार्थ्यांचे. फर्ग्युसन कॉलेजमधील नळाचा थोडा-फार उपयोग करण्यास मिळे तेवढाच.

सदर जागीं प्लेगमध्यें राहण्यासाठीं बांधलेल्या झोपड्या होत्या. त्याच या विद्यार्थ्यांना देण्यांत आल्या. अज्ञान आणि दारिद्र्याचा प्लेग झालेल्या हिंदु समाजांतील पददलितांना याशिवाय कुठें जागा मिळणार ! म्युनिसिपालिटी या जागेचें दरसाल एक रुपया भाडें घेत असे. आणि विशेष आनंदाची गोष्ट ही कीं, या जागेला धरूनच अडीच एकर जागा पुणें नगरपालिकेचे अध्यक्ष म्हणून श्रीमंत बाबूराव सणस असतांना नगरपालिकेनें उदार अंत:करणानें संस्थेस देण्याचा ठराव केला आहे. पुणें नगरपालिका आणि नगरपिते यांना ही गोष्ट खासच भूषणास्पदच आहे. सरकारी

चाकोरींतून हा ठराव बाहेर पडावयाचा असल्यानें एक वर्षांवर काळ लोटला. अद्यापहि ही जागा संस्थेच्या ताब्यांत मिळाली नाहीं, पण थोड्याच दिवसांत मिळेल असा विश्वास वाटतो.

याच जागेवर आधुनिक सुधारणांचे जनक महात्मा ज्योतिराव फुले यांच्या स्मरणार्थ ' महात्मा फुले ' वसतिगृह स्थापन करण्यांत येणार आहे, असेंहि समजतें. ती गोष्ट लवकर अमलांत येवो आणि महाराष्ट्रांतील विशेषतः पुणें जिल्ह्यांतील व पुणें शहरांतील बहुसंख्य विद्यार्थ्यांची आज होत असलेली हेळसांड थांबली जावो, अशीच इच्छा कुणीहि व्यक्त करील.

## डिप्रेस्ड् क्लासेस मिशन हॉस्टेल, परळ, मुंबई.

महर्षी अण्णासाहेब शिंदे यांनीं स्थापन केलेल्या डि. क्ला. मिशनमार्फत परळ, मुंबई या भागांत चाललेलें हॉस्टेलहि १९३२ पासून भाऊराव पाहतात. हल्लीं तेथें ३०–३५ विद्यार्थी शिक्षण घेतात. हल्लीं भाऊराव डी. सी. मिशनचे ट्रस्टी आहेत.

१९३२ सालापासून आजपर्यंत या वसतिगृहांत राहून सुमारें तीनशें विद्यार्थ्यांनीं कॉलेजच्या शिक्षणाचा फायदा घेतला. हल्लीं या ठिकाणीं पंचवीस विद्यार्थी असून ते येथील निरनिराळ्या कॉलेज-मधून आपला उच्च शिक्षणाचा अभ्यासक्रम पुरा करीत आहेत. जेवणखाण, झाडलोट, बाजारहाट वगैरे सर्व कामें छत्रपति शाहू बोर्डिंगप्रमाणेंच आळीपाळीनें येथेंहि विद्यार्थ्यांना करावीं लागतात. शाहू बोर्डिंग किंवा संस्थेच्या आज ज्या निरनिराळ्या शाखा आहेत. त्यांमधून उच्च शिक्षणासाठीं आलेले विद्यार्थीच फक्त या ठिकाणीं राहतात. गेल्या सालचा या शाखेचा खर्च ५००० रुपयांचा आहे.

## छत्रपति शिवाजी कॉलेज, सातारा.

प्राथमिक शिक्षणाची सांगता केल्यावर भाऊरावांनीं आपलें लक्ष दुय्यम शिक्षणाकडे वळविलें. त्याचा प्रसार सर्व सातारा जिल्ह्यांत केल्यावर आतां त्यांनीं आपली दृष्टि कॉलेजमधील उच्च शिक्षणाकडे वळविली. अगोदर इंग्रजी शिक्षण महाग. त्यांत कॉलेजमधील उच्च शिक्षण तर विचारूंच नका. फार थोडीं मुलें येथपर्यंतचा पल्ला गांठतात. अनादि कालापासून धार्मिक बंधनामुळें वरच्या शिक्षणाचीं द्वारें बहुजनसमाजास बंद होतीं; आणि आतां आर्थिक परिस्थितीनें तीं दारें आम्हांला आपोआपच बंद झालीं आहेत. पंख तोडलेल्या पक्षाला ज्याप्रमाणें स्वतंत्रता असूनहि फायदा होत नाहीं तशी आज आमची स्थिति झाली आहे. यांतूनहि थोडाफार मार्ग काढतां आला तर पहावा या हेतूनें आधुनिक महाराष्ट्राचे विश्वामित्र कर्मवीर भाऊराव यांनीं मराठ्यांच्या छत्रपतींचें नांव देऊन वरील कॉलेज उघडलें. १९४७ सालीं या कॉलेजची स्थापना करण्यांत आली.

दुसरें महायुद्ध संपलें तरी महागाईच्या राक्षसाचा जबडा अधिकच उग्र होत आहे. अशा वेळीं जीवनासाठीं सारखी धडपड चालली असतांना शिक्षणाकडे लक्ष कोण देणार ? मध्यम आणि वरिष्ठ वर्गीयांतील पालकांनाहि हें शिक्षण आतां परवडेनासें झालें आहे. मग ज्यांच्या घरीं अठरा विश्वें दारिद्र्य भरून राहिलें आहे त्या शेतकरी आणि कामगार वर्गाविषयीं बोलावयासच नको.

अशी परिस्थिति नष्ट होऊन शिक्षणाचीं दारें सर्वांनाच खुलीं आहेत, हें खरें करून दाखविण्यासाठीं भाऊरावांनीं या कॉलेजची

स्थापना केली. उच्च शिक्षण देणाऱ्या संस्था महाराष्ट्रांत कांहीं थोड्याथिडक्या नाहींत, पण त्यांचा प्रयत्न 'विमानांत बसून पायीं चालणारांना बरोबर चला' असें म्हणण्यापैकीं असल्यामुळें त्या संस्था खालच्या समाजाला असून नसून सारख्याच. कोणत्याहि प्रकारचें शिक्षण असो, तें कोणत्याहि वेळीं घेतां आलें पाहिजे, तरच तें शिक्षण! भाऊरावांनीं आपलें हें कॉलेज उघडल्यापासून शेंकडों विद्यार्थी आपले अर्ज घेऊन प्रवेशासाठीं येतात. पण एवढ्या विद्यार्थ्यांना एकदम कसा प्रवेश मिळणार? आज तरी संख्या नियमितच आहे.

हल्लीं कॉलेजमध्यें साठ विद्यार्थी शिक्षण घेत असून एफ्. वाय्. व इंटर आर्टसचे वर्ग चालू आहेत. त्याचप्रमाणें टी. डी. चाहि नवीन वर्ग सुरू केला आहे. गेल्या वर्षी टी. डी. ला पाठविलेले सर्व विद्यार्थी पास झाले. दुसरी एक महत्वाची गोष्ट ही कीं, इंटर ऑर्टसच्या परीक्षेचा या वर्षीचा कॉलेजचा निकाल मुंबई राज्यांत पहिल्या प्रतीचा आहे. २५ पैकीं २३ विद्यार्थी पास झाले आहेत.

गेलीं तीन वर्षे हे कॉलेज फ्री आणि वसतिगृहयुक्त असें चालविलेलें होतें व पुढेंहि तसेंच चालवावें, असा भाऊरावांचा हेतु होता. पण सरकारी आकुंचित धोरण व पुणें विद्यापीठाचा आडमुठेपणा यामुळें इतरत्र असलेल्या कॉलेजप्रमाणें याहि कॉलेजला भाऊरावांना नाइलाजानें फी ठेवावी लागली आहे. तरीसुद्धां पैशांच्या अभावीं आपणांस शिकतां येत नाहीं, अशी कोणाची तक्रार राहूं नये

म्हणून अशा विद्यार्थ्यांसाठीं संस्थेनें कर्ज किंवा काम देण्याची सोय केलेली आहे. त्यामुळें कुणालाहि अडचण निर्माण होण्याचें कारण नाहीं. आजपर्यंत विद्यार्थ्यांना वसतिगृहांतच राहावें लागे. पण यंदा शहरांतील विद्यार्थ्यांना प्रवेश दिल्यामुळें वसतिगृहांत राहण्याच्या नियमांत थोडी मोकळीक दिली गेली आहे. आपल्या देशांत अशा पद्धतीनें चालणारें हेंच एक कॉलेज आहे, असें मोठ्या अभिमानानें सांगावें लागतें.

या महाविद्यालयासाठीं फलटणचे राजे नानासाहेब नाईक निंबाळकर यांनीं आपला साताऱ्यांतील लष्कर विभागांत असलेला राहता वाडा व त्यालगतची दहा एकर जमीन संस्थेस देऊन टाकली. कॉलेजची इमारत बांधण्यासाठीं मुंबईचे प्रसिद्ध व्यापारी दानशूर शेट धोंडजी पाटलोजी भोसले, खोका मर्चंट नाझगिरीकर यांनीं आतांपर्यंत पाऊण लाख रुपये दिले आहेत. प्रिन्सिपॉल म्हणून आजपर्यंत श्री. जी. के. पाटील एम्. एल्. ए. व एल. एल. बी. हे काम पहात असत. या वर्षापासून श्री. मेथा हे पहाणार आहेत.

## महात्मा गांधी वसतिगृह, लंडन.

१९५० पासून संस्थेनें आपली एक शाखा लंडनला उघडली आहे. तिचें नांव 'महात्मा गांधी वसतिगृह' असें आहे. पाश्चात्य देशांतील अति महाग राहणीमुळें बऱ्याच हिंदी विद्यार्थ्यांना तेथें गेल्यावरहि जेवण्याचा खर्च झेपत नाहीं. यामुळें त्यांचें अभ्यासावर लक्षहि लागत नाहीं. त्याचा परिणाम भरमसाट खर्च करूनहि अपयशांत होतो. अशा विद्यार्थ्यांची गैरसोय दूर व्हावी व आपल्या

देशांतील 'साधी राहणी व उच्च विचारसरणी' या गोष्टींचा परिणाम पाश्चात्यांच्यावर व्हावा या हेतूनें साधेपणाची मूर्तिमंत प्रतिमा जे गांधीजी त्यांचें नांव देऊन संस्थेनें ही शाखा सुरू केली आहे.

इंग्लंडमध्यें इतरांसारखें राहावयाचें ठरविलें तर जेवण व घर· भाड्याचा दरमहा खर्च सुमारें ३५० ते ४०० रुपयांपर्यंत होतो. पण संस्थेनें स्वावलंबनाच्या तत्त्वावर सुरू केलेल्या या वसतिगृहांत फक्त १२५ ते १५० रुपये प्रत्येक विद्यार्थ्याला मासिक खर्च येतो. अर्थातच सर्व कामें विद्यार्थीच करतात.

या वसतिगृहांत हल्लीं तीन विद्यार्थी राहतात. १९४७सालीं मुंबई विश्वविद्यालयाच्या बी. ए. च्या परीक्षेंत सर्वांत जास्ती गुण मिळवून पहिल्या वर्गांत पहिले आलेले श्री. पी. जी. पाटील, १९४९ सालच्या एलएल्. बी. च्या परीक्षेत सर्वांत अधिक गुण मिळवून पहिल्या वर्गांत पहिले आलेले श्री. बी. के. पाटील आणि कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमध्यें एक हुशार आणि तडफदार विद्यार्थी म्हणून नांवाजले गेलेले श्री. बागवान एम्. ए. एल्. एल्. बी. असे हे तीन विद्यार्थी आहेत. तिघेहि बॅरिस्टरीचा अभ्यास करीत आहेत.

या वसतिगृहाची सर्व जबाबदारी भाऊरावांनीं स्वतःच्या अंगावर घेतली आहे त्यासाठीं ते यूरोपमध्यें व अमेरिकेंत दौरा काढणार आहेत आणि आपली योजना जाणत्या व आस्थेवाईक पाश्चात्य पंडितांपुढें मांडणार आहेत.

याप्रमाणें संस्थेच्या शाखांचा धावता आराखडा आपल्यापुढें ठेवला आहे. यानंतर आर्थिक दृष्ट्या संस्थेची परिस्थिति कसकशी बदलत गेली याविषयीं थोडाफार विचार करूं.

## अंदाजपत्रक

इ. स. १९२४ सालचें सुमारें—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| " | १९३५ | " | " | १०,००० |
| " | १९४० | " | " | १०,०००० |
| " | १९४५ | " | " | ३ लाखांवर |
| " | १९५१ | " | " | १० लाखांवर |

संस्थेच्या सर्व शाखांचे हिशेब वर्षअखेरीस श्री. ए. व्ही. देशपांडे, रजिस्टर्ड अकौंटट, मुंबई यांच्याकडून दरवर्षी तपासून घेतले जातात. त्याचप्रमाणें सरकारी ऑडिटरकडूनहि ते तपासले जातात. संस्थेला सध्यां ग्रँटरूपानें सुमारें पांच लाख रुपये मिळतात. तसेंच ट्रेनिंग फी, भोजन फी, शेती वगैरेंचे सुमारें दोन लाख रुपये मिळतात. बाकी सुमारें दोनतीन लाख रुपयांची येणारी तूट देणग्यांच्या रूपानें भरून काढावी लागते.

## पुढील योजना

जो विद्यार्थी, जें शिक्षण इच्छील तें त्याला घेतां आलें पाहिजे. एवढा व्याप व सर्व तऱ्हेचा शिक्षणप्रसार आपल्या देशांत संस्थेला करावयाचा आहे. त्यासाठीं संस्थेला दुय्यम शिक्षण देणारीं अनेक हायस्कुलें, उच्च शिक्षण देणारीं इंडस्ट्रियल, आर्टस्, सायन्स व ॲग्रिकल्चरल कॉलेजें काढावयाचीं आहेत. यासाठीं १९४८ सालीं महात्मा गांधींच्या श्रद्धांजलीच्या दिवशीं भाऊराव पाटील यांनीं रयत शिक्षण संस्थेतर्फे महाराष्ट्रांत १०१ दुय्यम शाळा व महात्मा गांधी विश्वविद्यालय स्थापन करण्याची घोषणा केली आहे.

आज प्राथमिक शिक्षणापासून उच्च शिक्षणापर्यंतच्या सर्व शाखा संस्थेनें काढल्या आहेत. सन १९५२ सालीं बी. टी. कॉलेज काढण्याचा संस्थेचा विचार आहे. आणि आपले संपूर्ण संकल्प १९५७ अखेर पुरे करावयाचेच, असा भाऊरावांचा दृढविश्वास आहे.

## अडचणी

संस्थेच्या बहुतेक शाखांना स्वत:च्या मालकीच्या इमारती नाहींत. त्यामुळें भाड्यासाठीं दरमहा शेंकडों रुपये खर्च होतात. इमारतीसाठीं म्हणून मुंबई सरकारकडून सातारा येथील चार भिंतीनजीकची दहा एकर जागा संस्थेस १९३९ सालीं मिळाली आहे. या जागेवर सुमारें ३०००० रुपये किंमतीची एक सुंदर इमारत नुकतीच बांधली आहे. याच ठिकाणीं वर्षअखेर एक लाख रुपयांच्या इमारती पुऱ्या करावयाच्या, असा संस्थेनें संकल्प केला आहे. त्यांत छत्रपति शाहू विद्यालय याच्या वसतिगृहाचा समावेश होणार आहे. या इमारतीसाठीं सरकारकडून ३५००० रु. ग्रँट म्हणून मिळाले आहेत. तसेंच सर डेव्हीड ससून ट्रस्ट फंड कडून १५००० रु. व एन्. एम्. वाडिया चॅरिटी फंडाकडून ५०० रु. देणगी मिळाली आहे. फलटणच्या महाराजांनीं सन १९४५ सालीं सातारा कँपमधील आपला बंगला व त्या सभोंवतालची दहा एकर जागा संस्थेस बक्षिस दिली आहे. त्या ठिकाणीं संस्थेनें ६०,००० रु. खर्च करून इमारती बांधल्या आहेत. छत्रपति शिवाजी कॉलेजच्या सायन्स विभागाच्या इमारतीचें बांधकाम चालू वर्षीं पूर्ण करण्याचा संस्थेचा विचार आहे. छत्रपति शिवाजी कॉलेजच्या इमारतीसाठीं दानशूर शेट धों. पा.

भोसले, नाजगिरीकर यांच्याकडून आतांपर्यंत रोख २५००० रुपये आले व ७५००० देण्याचें त्यांनीं आभिवचन दिलें आहे. याशिवाय कुसूर येथील संस्थेचे प्रेसिडेंट, दानशूर बंडोबा गोपाळराव मुकादम यांनीं तेथील हायस्कूलसाठीं इमारती बांधून दिल्या आहेत व वसतिगृहासाठीं इमारत बांधण्याचें काम चालू केलें आहे. अष्टें येथें नुकतीच एक इमारत बांधून घेतली. तिला ३०००० रु. खर्च करावा लागला. लोणंद येथेंहि एक छोटीशी इमारत बांधली आहे. अशा प्रकारें थोड्याफार प्रमाणांत इमारती बांधल्या असल्या तरी संस्थेचा व्याप दिवसानुदिवस वाढत असल्यानें या इमारती म्हणजे 'दर्यामें खसखस' ठरणार आहेत. तेव्हां हा प्रश्न फार मोठ्या प्रमाणांत सोडवावयाचा असल्यानें सरकार आणि जनता यांनीं एकरूप होऊन हें कार्य केलें पाहिजे.

---

## : २४ : प्राथमिक शिक्षण समिती

"'रयत शिक्षण संस्थेची ही सर्वांत मोठी शाखा आहे. रयतेचा खराखुरा उद्धार व्हावयाचा असेल, तर सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांतील व कडेकपारींतील खेडेगांवांत निदान प्राथमिक शिक्षण तरी सक्तीचें व मोफत झालें पाहिजे." असें महात्मा ज्योतिराव फुले यांचें स्वप्न होतें. त्याच हेतूनें १८८२ सालीं हंटर कमिशनपुढें साक्ष देतांना त्यांनीं आपलें मत ठासून मांडलें. त्यानंतर नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांनीं १९११ सालीं 'प्राथमिक शिक्षण सक्तीचें व्हावें' म्हणून विधिमंडळाकडे एक बिल आणलें होतें. तसाच प्रयत्न रँग्लर र. पु. परांजपे यांनीं शिक्षणमंत्री असतांना नामदार भास्करराव जाधव आदि सहकाऱ्यांच्या मदतीनें पुन्हां विधिमंडळांत खडा टाकून पाहिला (१९२३). पण या तिन्हीहि वेळां राजकर्ते परकीय असल्यानें त्यांनीं या बिलाला वाटाण्याच्या अक्षता लावल्या. त्यासाठीं १९३५ सालपर्यंत कळ काढावी लागली. या वेळीं मुंबई प्रांतांत काँग्रेसचें मंत्रीमंडळ अधिकारारूढ झालें होतें. काँग्रेसचे मंत्री जनतेंतूनच निवडून गेलेले असल्यामुळें जनतेचा हा निकडीचा प्रश्न डावलणें त्यांना शक्यच नव्हतें. त्यांनीं प्राथमिक शिक्षण सक्तीचें व्हावें, असा कायदा केला. त्याच कायद्यास धरून तेंच खेर मंत्रीमंडळ आजहि प्राथमिक शिक्षणाचा धूमधडाक्यानें प्रचार करीत

आहे. तरीहि त्याचें लोण अद्यापपावेतों ज्यांना शिक्षणाची खरी जरूरी आहे, अशा लहान लहान खेड्यांपर्यंत जाऊन पोंचलें नाहीं. कायद्यानेंच १००० लोकवस्तीवरील गांवांना शिक्षणाची सवलत दिली गेली असल्यानें त्याखालील लोकवस्तीचीं खेडीं ब्रिटिश राजवटींत जशीं होतीं तशींच आजहि कोरीं करकरीत आहेत. मात्र ब्रिटिश राजवटींतहि शेतसाऱ्याबरोबरच शिक्षणासाठीं म्हणून जो लोकलफंड जमा करण्यांत येत असे, तो आजहि अव्याहतपणें चालू आहे. 'मालाची किंमत घ्यायची, पण माल मात्र द्यायचा नाहीं' हीच वृत्ति यामधून दिसून येते. सातारा जिल्ह्याचा पश्चिम भाग डोंगराळ व पूर्वभाग नापीक माळरान. त्यामुळें या भागांत अशीं शेंकडो गांवें आहेत कीं, जीं शिक्षणाला पारखीं झालीं आहेत. १९१० पासून १९३५ पर्यंत भाऊरावांनीं या खेड्यांना अनेक वेळां निरनिराळ्या नात्यानें भेटी दिल्यामुळें येथील जागृत मंडळींनीं त्यांच्याकडे शाळांची मागणी केली. आपलें सरकार अधिकारावर असल्यामुळें भाऊरावांनाहि एक प्रकारचा काम करण्यास उत्साह आला होता. तशांत खेर मंत्रीमंडळानें १९३८ सालीं 'साक्षरता प्रसार' करण्याचा कायदा पास करून शिक्षणाच्या बाबतींत आणखी एक पाऊल पुढें टाकलें. त्याच वेळीं महर्षि अण्णासाहेब शिंदे यांच्या पुणें येथील राहत्या घरांत मुंबई राज्यांतील सर्व मंत्र्यांना भाऊरावांनीं एक छोटासा खाना दिला व त्यांचा सत्कार केला. त्याच वेळीं अशा प्रकारच्या शाळा काढण्याचें त्यांनीं ठरवून टाकलें.

नुसते ठराव करून राहिले तर ते भाऊराव कसले? लगेच १९३८

सालच्या दसऱ्याच्या शुभमुहूर्तावर साताऱ्यापासून पश्चिमेकडे तीन मैलांवर असलेल्या डोंगरावरील यवतेश्वर या क्षेत्राच्या ठिकाणीं त्यांनीं एक ' सेवा शाळा ' स्थापन केली. एवढी एकच शाळा स्थापन करून ते थांबले नाहींत, तर त्याच यवतेश्वरासमोर त्या भागांत अशाच आणखी ५० शाळा काढण्याची त्यांनीं प्रतिज्ञा केली. त्यांच्या पहिल्याच शाळेंत श्री. कृ. ता. खापे यांच्यासारखा हौशी व तडफदार शिक्षक काम करीत असल्यामुळें यवतेश्वरची शाळा थोड्याच दिवसांत चांगलीच नांवारूपास आली. आणि गांवांच्या लोकांत शिक्षणाची इतकी आवड निर्माण झाली कीं, अवघ्या सहा महिन्यांत तेथील ग्रामस्थांनीं संस्थेच्या ट्रेनिंग कॉलेजचे त्या वेळचे प्रिन्सिपॉल बाबासाहेब दिक्षीत यांच्या हस्तें श्री. खापे यांना पाडव्याच्या मुहूर्तावर पोशाख व सोन्याची आंगठी अर्पण केली. याचा परिणाम आजूबाजूला होऊन त्या वर्षाच्या अखेरीस अशाच ६१ शाळा काढण्यांत आल्या.

गेल्या बारा वर्षांत म्हणजे संपूर्ण एका तपांत प्राथमिक शिक्षण समितीनें जिल्ह्यांतून अशा प्रकारच्या ५७८ शाळा चालविलेल्या आहेत. येथील शिक्षणक्रम संपूर्ण मोफत ठेवण्यांत आलेला आहे. इतकेंच नव्हें, तर हुशार, होतकरू, पण गरीब विद्यार्थ्यांस पाट्या, पुस्तकें वगैरे शैक्षणिक साहित्यहि फुकट पुरविलें जातें. या शाळांमधून २५००० विद्यार्थीगण शिक्षण घेत असून त्यांवर ८२३ शिक्षक रात्रंदिवस राबून अध्यापनाचें कार्य करीत आहेत. अल्पवेतनावर व गैरसोयींच्या ठिकाणीं राहून राष्ट्राची भावी पिढी सुधारण्याचें

जें महान् कार्य या खेड्यांपाड्यांतून तरुण शिक्षकांनीं चालविलें आहे त्यांचें नांव उद्यांचा महाराष्ट्र कधींहि विसरणार नाहीं. " या उत्साही आणि तरुण शिक्षकांचा त्याग व ग्रामस्थांचा उदारपणा येवढ्याच भांडवलावर मी या इतक्या शाळा चालवूं शकलों." असें भाऊराव मोठ्या अभिमानानें म्हणतात. आणि म्हणूनच त्यांच्याकडे दुय्यम किंवा उच्च शिक्षणसंस्थांमध्यें काम करणाऱ्या शिक्षकांपेक्षां ते या मंडळींना फार महत्त्व देतात. या त्यांच्या त्यागाबद्दल संस्था त्यांना आपल्या ट्रेनिंग कॉलेजमधून लौकर व मोफत शिक्षण देऊन त्यांच्या ऋणांतून थोड्याबहुत प्रमाणांत का होईना मुक्त होण्याचा प्रयत्न करते.

कायम शिक्षकांस ट्रेंड झाल्यानंतर ३०–१–५० ही वेतन-श्रेणी दिलेली असून सरकारकडून येणारा महागाईभत्ताहि दिला जातो. आजपर्यंत या शाळेंतून काम करणाऱ्या २५० शिक्ष-कांना महात्मा फुले ट्रेनिंग कॉलेजमधून ट्रेनिंग देऊन तयार केलेलें आहे. आणि तरीहि गैरसोय होत आहे, असें पाहिल्यावर गेल्याच सालीं अष्टे येथें एक नवीन ट्रेनिंग कॉलेज उघडण्यांत आलें आहे. " येत्या दहा वर्षांत साताऱ्यांतील एक खेडेंहि शाळेशिवाय शिल्लक ठेवावयाचें नाहीं." असें भाऊराव बोलून दाखवि-तात. यापुढें समितीच्या सर्व शाळांतून ट्रेंड शिक्षकच असावेत, असा कटाक्ष असून त्या दृष्टीनेंच काम चाललेलें आपणांस दिसून येईल. पण अडचणी कमीच आहेत म्हणूनच कीं काय या वर्षीं मुंबई सरकारनें व्हॉलंटरी शाळांबाबत आपलें धोरण

बदललें आहे. त्यामुळें संस्थेला गेल्या तीन महिन्यांचा पगार देणें फार जिकिरीचें झालें. एका बाजूला शिक्षणासाठीं आम्हीं अमाप पैसा खर्च करतो, अशी जाहिरात करावयाची आणि दुसरीकडे अशा प्रकारचा प्रयत्न चालला असेल तर त्यांची ग्रँट कमी करून त्यांना निरुत्साही करावयाचें, ही गोष्ट जनहिताला डावलणारी आहे, असें मोठ्या दु:खानें म्हणावें लागतें.

सातारा जिल्ह्याचा पश्चिम भाग अगदीं डोंगराळ, जंगलमय व अतिपावसाचा म्हणून प्रसिद्ध आहे. त्याच्या उलट पूर्वभाग कमी पावसाचा, रखरखीत व दुष्काळी आहे. यामुळें या दोन्हीहि भागांत बोर्डाच्या शाळा नाहींतच, असें म्हटलें तरी चालेल. त्यामुळें याच भागांत संस्थेच्या शाळा जास्त प्रमाणांत असल्याचें दिसून येईल. अडचणी असल्यामुळें या भागांत शिक्षक मिळणें फार कठीण जातें. मराठी सातवी पास झालेले तरुणहि मिळावयास मारामार पडते. मग ट्रेंड शिक्षकांचें नांवच नको. शिवाय जे सातवी पास झालेले शिक्षक त्या भागांत काम करीत होते तेहि १९४४–४५ मध्यें जादा तलाठ्यांच्या नेमणुका करण्याच्या सरकारी धोरणामुळें शाळा सोडून चालते झाले. यामुळें त्या शाळांवर काम करण्यासाठीं सरकार-मान्यतेनुसार सातवी नापास झालेल्या शिक्षकांची नेमणूक केली. मात्र शिक्षणाची आवड व समाजसेवेची तळमळ असणाऱ्यांनाच या संधीचा फायदा मिळवून दिला आहे. पण खात्याच्या नियमा-प्रमाणें या शिक्षकांनीं तीन वर्षांत सातवी पास झाले पाहिजे, अशी त्यांच्यावर अट घातली जाते. नुसती अट घालून संस्था थांबत

नाहीं, तर त्यांच्यासाठीं असा एक वर्गच संस्थेमार्फत उघडला आहे. गेल्या तीन वर्षांत सदर वर्गामधून २२ शिक्षक परीक्षेस बसले. त्यांपैकीं १७ पास झाले. या वर्षीं २५ शिक्षकांचा वर्ग चालू आहे. हा वर्ग गांधी टेकडी, तालुके पाटण या ठिकाणीं चाललेला आहे.

अशाप्रकारें ट्रेंड, अनट्रेंड व सातवी नापास अशा शिक्षकांनीं चालविलेल्या शाळा खालीलप्रमाणें आहेत. पाटण ११३, माण ७६, जावळी ६६, कऱ्हाड ६१, खटाव ५५, सातारा ५१, वाई ४९, वाळवें ३६, खानापूर ३४, तासगांव २२ व कोरेगांव १५.

या शाळांतून काम करणाऱ्या शिक्षकांची वर्गवारी खालीलप्रमाणें आहे. पुढारलेले ८९, मध्यम ६४६, मागासलेले ७२ व मुसलमान १६. एकूण ८२३.

## वसतिगृह व प्रौढांचे वर्ग

समितीच्या ५७८ शाळांपैकीं ६ शाळांना जोडून संस्थेनें वसतिगृहें चालविलीं आहेत. संस्थेच्या नियमाप्रमाणें या वसतिगृहांतून सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जातो. त्यांची कमींत कमी खर्चात राहण्याची व जेवण्याची व्यवस्था केली जाते. विशेषत: मागासलेल्या विद्यार्थ्यांना सदरचा खर्च माफ केला जातो. वसतिगृहांतील मुलांकडून शारीरिक मेहनतीचीं कामें करून घेतलीं जातात. याशिवाय सहली, हंगामी यात्रांमधील कुस्त्यांचीं मैदानें, सामने इत्यादि विविध प्रकारच्या गोष्टींत भाग घेऊन विद्यार्थी आपली उन्नति करून घेत असतात.

शाळेंतील काम चोख करून शिक्षकांनीं प्रौढांचे ६९ वर्ग

चालविले आहेत. त्यांतून शेंकडों शेतकरी बांधवांना साक्षर करण्याचें काम धूमधडाक्यानें चाललें आहे.

या नवीनच साक्षर झालेल्या प्रौढांचें अक्षरज्ञान कायम टिकविण्यासाठीं, त्यांच्या ज्ञानांत भर घालण्यासाठीं आणि शिक्षकांच्या मार्गदर्शनासाठीं २३ शाळांना जोडून वाचनालयें चालविलेलीं आहेत. या सर्व कार्यावर समितीच्या सुपरवायझरांची देखरेख राहते.

## गट संमेलन

समितीकडे नोकरीस लागलेले बहुतेक शिक्षक दरवर्षी नवीनच आलेले असतात. त्यांच्यांत शैक्षणिक प्रगति व्हावी व शाळेच्या कागदपत्रांची त्यांना माहिती व्हावी या हेतूनें समितीनें ५७८ शाळांचे ६५ गट पाडले आहेत. त्या त्या गटांतील शाळांवर काम करणारे शिक्षक महिन्यांतून एकदां नियोजित शाळेंत जमतात. त्या ठिकाणीं ते एखाद्या तरी अनुभवी शिक्षकाचा पाठ पहातात व एखाद्या विषयावर चर्चा करतात. अशा प्रकारें शिक्षणांतील अडीअडचणींचें निराकरण ते करून घेतात. शिवाय बाहेरच्या पाहुण्यांचे शिक्षणावरील विचार ऐकून ते घेतात. अशा प्रकारें इतर शाळांपेक्षां आपल्या शाळा अधिक कार्यक्षम कशा होतील यासंबंधींचा खल या ठिकाणीं चालतो.

## रयत सेवक कोऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायटी, सातारा.

अल्प वेतनावर काम करणाऱ्या समितीच्या शिक्षकांची आर्थिक अडचणीच्या वेळीं गरज भागावी, त्यांतल्या त्यांत त्यांना ट्रेनिंग कॉलेजमधील शिक्षण घेतांना घरच्या मदतीवर अवलंबून राहावें लागूं नये, या उद्देशानें संस्थेनें ही सोसायटी स्थापन केलेली आहे. या सोसा-

यटीमधून समितीच्या शिक्षकांना लागणारी आर्थिक मदत अगदींच अल्प व्याजानें दिली जाते.

ही सोसायटी रजिस्टर झालेली असून दरवर्षी सरकारी ऑडिटरकडून ती तपासली जाते. सुरवातीपासून सरकारी ऑडिटरनें तिला 'अ' वर्ग दिला आहे. यावरून तेथील काम किती व्यवस्थित चालतें हें दिसून येईल. सोसायटीचें शेअरच्या रूपानें भांडवल २०,००० रुपयांचें असून एकूण सभासदांची संख्या ७५० आहे. सभासदांना दरसाल दरशेंकडा ६। रुपये दरानें कर्ज देण्याची सोय केलेली आहे.

## रयत सेवा कोऑपरेटिव्ह स्टोअर्स लि. सातारा.

वरील सोसायटीस लागूनच या स्टोअर्सची योजना केलेली आहे. या स्टोअरचें भांडवल १०,००० रुपये असून सभासदांची संख्या ५० आहे. स्टोअर रजिस्टर्ड असून त्यालाहि सरकारी ऑडिटरकडून 'अ' वर्ग दिला गेला आहे. अलिकडे या स्टोअरला 'रेशनिंग दुकानहि' सरकारकडून मिळालेलें आहे.

## कार्याची व्यवस्था

अशा प्रकारें चाललेलें समितीचें कार्य पार पाडण्यासाठीं एक शिक्षणाधिकारी–ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर, १५ समीक्षक–सुपरवाझर्स, ७ कारकून व ३ शिपाई असा स्टाफ असून या सर्वांवर देखरेख ठेवण्यासाठीं संस्थेतील तज्ज्ञ मंडळींचें एक सल्लागार मंडळ असते. या शाखेला दरसाल ३॥ लाख रुपये खर्च करावा लागतो. अशा प्रकारें इतक्या विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय करणारी खासगी संस्था आपल्या देशांतील तरी हीच असावी.

## : २५ : परिशिष्ट

### धनिणीचा बाग

हल्लीं धनिणीच्या बागेंत दिसणाऱ्या इमारती मुलांनींच आपल्या श्रमावर बांधल्या आहेत. अगदीं दगडविटा पाडण्यापासून ते चिखल-पाणी करून बांधकाम करण्यापर्यंतच्या सर्व गोष्टी मुलांनींच केलेल्या आहेत. फक्त पत्रा आणि लाकूडच काय तें बाहेरून आणलेलें. अशा प्रकारें आज जरी यांना इमारतीचें स्वरूप असलें तरी दहा वर्षांपूर्वीं याच ठिकाणीं निव्वळ गवताच्या आणि बांबूंच्या झोपड्या होत्या. सुमारें पंधरा वर्षें मुलांनीं याच झोपड्यांतून आपला अभ्यास केला.

बागेंत सुरवातीपासूनच खडा पहारा करणारे उंच उंच आम्रवृक्ष, त्यांच्या जोडीला ओढ्याच्या बाजूनें उंच, धिप्पाड आणि कर्तव्यनिष्ठ पंजाबी शिपायांप्रमाणें उंचच्या उंच अशीं वाढलेलीं नारळाचीं झाडें आणि मुलांच्या बरोबर आपणहि हसत खिदळत व दुडुदुडु उड्या मारीत धावणारा ओढा,हें सर्व सौंदर्य आपल्याला खास मोह पाडल्याशिवाय राहणार नाहीं. शेजारच्या यवतेश्वराच्या डोंगरांतून हा ओढा वाहात असल्यामुळें हा आपली इतरांना जीवन देण्याची नौकरी वर्षभर बजावीत असतो. निरलस सेवाभाव व कष्ट करावयाचें सातत्यच जणूं हा जवळच्या बालकांना शिकवितो. यांतूनहि एखादा चुकार मुलगा कांहीं शिकला नाहीं तर सर्वांच्या मध्यभागीं तापसाप्रमाणें

शोभणारा विशाल वटवृक्ष आपले अजस्र बाहू पसरून ठाण मांडून बसला आहे. विशाल देह, अंगावर पर्णांचा व फळांचा भार आणि लांब रुंद हात पसरून हा आसमंतांत वावरणाऱ्या छात्रगणांवर आपली मायेची पाखरच घालीत आहे कीं काय, असा भास होतो. मातेच्या वात्सल्यानें विचारपूस करणारा हा कोणी पितामहच असावा अशी खात्री वाटते. या वटवृक्षाकडे पाहूनच संस्थेच्या बोधचिन्हाची भाऊरावांना स्मृति झाली असावी. दोघेहि तापसीच, दोघांचीहि शरीरयष्टि सारखीच, दोघांचाहि अतुलनीय त्याग सारख्याच प्रमाणांत. एक घर सांभाळतो. दुसरा आपल्या पिलांना बाहेरून चारापाणी आणून भरवितो. एक तेथेंच सतत मुलांवर देखरेख करून सेवा, समता आणि स्वावलंबन यांचे पाठ मुलांना पढवीत असतो, तर दुसरा निरनिराळ्या ठिकाणीं फिरून मिळालेले अनुभव, आलेल्या अडचणी व त्यांतून काढलेला मार्ग यांची शिदोरी बांधून आणून ती मुलांच्यापुढें ठेवीत असतो. एक ' मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास कठीण वज्रासी भेदूं तैसे ' या तुकारामाच्या अभंगाचें प्रवचन दररोज आपल्या स्वभावदर्शनानें मुलांना ऐकवीत आहे, तर दुसरा मनगटाच्या जोरावर जग जिंकण्याची शिकंदरी महत्त्वाकांक्षा बाळगोपाळांना शिकवीत आहे. कोणीहि येवो. मग तो साव असो अगर चोर असो. तो येथें आला कीं कर्तबगारीचे धडे शिकून गेलाच पाहिजे. स्वावलंबन, स्वाध्याय, स्वाभिमान आणि स्वातंत्र्य या चार महान् तत्वांचा महायज्ञ आज पंचवीस वर्षें एकसारखा या ठिकाणीं धडधडतो आहे.

ह्यां दोन तापशांनीं आपल्या जीवन-ज्योतींचा आदर्शच विद्यार्थ्यांपुढें ठेवला आहे. पण त्याशिवाय सर्व मुलांवर प्रत्यक्ष देखरेख करण्यासाठीं दोन व्यवस्थापक सहकुटुंब येथेंच वास्तव्य करीत असतात. हे संस्थेंतीलच ज्येष्ठ विद्यार्थी असतात. शिवाय प्राथमिक शाळेंतील शिक्षकहि याच ठिकाणीं रहातात. त्यामुळें कौटुंबिक जीवनाचा आदर्शहि विद्यार्थ्यांपुढें राहतो व त्यांना आपलें जीवन एकाकी वाटत नाहीं. अगदींच लहान विद्यार्थ्यांवर लक्ष देण्यासाठीं दोन (Metrons) व्यवस्थापिका ठेवलेल्या असतात. त्या लहान मुलांची सर्व प्रकारची काळजी वाहतात. दररोज सकाळीं पांच ते साडेपांचच्या दरम्यान सर्व मुलांना उठावें लागतें. मग सर्वांची मिळून प्रार्थना घेतली जाते. या वेळीं बहुश: गांधीजींची सामुदायिक प्रार्थना म्हटली जाते. यानंतर ज्ञानदेव, तुकाराम यांच्या अभंगांवर प्रवचन केलें जातें. संस्थेंत निरनिराळ्या धर्मांचे विद्यार्थी असल्यामुळें प्रार्थनेच्या वेळींहि एक प्रकारचा वैचित्र्यपूर्ण आनंद उपभोगावयास मिळतो. एखादा ख्रिस्ती मुलगा बायबलांतील भगवान येशूचें वचन म्हणून दाखवील, तर एखादा मुसलमान मुलगा कुराणांतील महात्मा पैगंबराचे शेरे म्हणून दाखवील आणि एखादा हिंदु विद्यार्थी गीतेंतील भगवान श्रीकृष्णाचे श्लोक म्हणून दाखवील. अशा प्रकारें प्रार्थनेंतसुद्धां सर्व धर्म साधलेले आपणांस दिसून येईल व उद्यांच्या भारताच्या भवितव्याबद्दल चिंता वाटणार नाहीं. मधून मधून सत्पुरुषांच्या चरित्रांतील विशेष आठवणी व उपदेश यांवर विवेचन केलें जातें. यामुळें विद्यार्थ्यांच्या—विशेषत: ज्युवेनाईल

कोर्टाकडून आलेल्या बालगुन्हेगार म्हणून शिक्का मारला गेलेल्या मुलांच्या—नैतिक विकासास मदत होते. शिवाय विद्यार्थ्यांत सदभिरुची व सद्विचार यांची वाढ होऊन सर्व धर्मांतील चांगल्या व वाईट गोष्टी कळतात. दरमहा प्रत्येक विद्यार्थ्यांची शारिरिक तपासणी केली जाते. त्यासाठीं संस्थेनें एका खास डॉक्टरची नेमणूक केली आहे. अशा प्रकारें शारिरिक, मानसिक, बौद्धिक, वैचारिक व आत्मिक संस्कारांनीं तयार झालेला विद्यार्थी संस्थेंतील शिक्षणक्रम संपवून बाहेर पडल्यावर आदर्श नागरिक न होईल तरच नवल!

याच संस्थेकडून तयार झालेले विद्यार्थी दुसरीकडे शाखाप्रमुख किंवा अन्य जागेवर काम करण्यासाठीं पाठविले जातात. त्यामुळें येथेंच त्यांच्यावर सर्व प्रकारचे संस्कार करून चांगलीच प्रगती करून घेण्याचा प्रयत्न अहोरात्र केला जातो. त्यामुळें येथील विद्यार्थ्यांत अगर येथून बाहेर पडलेल्या कार्यकर्त्यांत कामचुकारपणा असा दिसणारच नाहीं. याचें प्रत्यंतर आपणांस सन १९४२ च्या लढ्यांत पहावयास मिळालें. नागनाथ नायकवाडी, शाम पाटील, शाम जाधव, प्रताप पाटील, शंकर शिंदे, कोकाटे वगैरे अनेक प्रसिद्ध अप्रसिद्ध कार्यकर्ते एके काळीं याच संस्थेचे विद्यार्थी होते.

दुसरी एक लक्षांत ठेवण्यासारखी व वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट हीं कीं, येथून बाहेर पडलेले छोटे मोठे विद्यार्थी संस्थेला कधींहि विसरत नाहींत. याचें प्रत्यंतर सौ. लक्ष्मीबाई पाटील फंडावरून आपणांस चांगलेंच येईल. हा फंड निव्वळ संस्थेच्या माजी विद्यार्थ्यांनीं आपल्या पगारांतील ठराविक भाग दरमहा देऊन सांठविला आहे.

याच फंडांतून परदेशांत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचा खर्च भाग-विला जातो. जे कोणी पैसे देऊं शकत नाहींत ते हस्तें परहस्तें मदत करण्याचें आपलें व्रत चालवीत असतात. कांहींजण लग्नाचें पौरोहित्य करून शेकडों रुपयांची मदत संस्थेला मिळवून देतात. शिवाय दुसरें एक उदाहरण म्हणजे आज भाऊराव पाटील ज्या मोटारींत बसतात ती भारी किंमतीची मोटार आजी व माजी विद्यार्थ्यांनींच त्यांना घेऊन दिलेली आहे व तिचा चालू खर्चहि तेच देतात.

---